॥ श्रीविठ्ठलप्रसन्न ॥

# मुमुक्षूचें सिंहावलोकन

म्हणजेच

# मुमुक्षूंतील निवडक निबंध



## भाग दुसरा.




संपादक व प्रकाशक

लक्ष्मण रामचंद्र पांगारकर, बी. ए.

मुमुक्षु कचेरी, पुणें शहर.





किंमत रु. १॥८,

# मुमुक्षूचें सिंहावलोकन.

## दुसऱ्या भागाची प्रस्तावना.

मुमुक्षूंतील निवडक निबंधांचा हा दुसरा भाग स्वतंत्र पुस्तकरूपानें आज प्रसिद्ध होत आहे पहिला भाग पांच सहा महिन्यांपूर्वी प्रसिद्ध झाला. पहिल्या भागांत २८ निबंध प्रसिद्ध झाले व ह्या दुसऱ्या भागांत एकंदर ३५ लेख आले आहेत. कदाचित् तिसरा भाग पुढें केव्हां तरी प्रसिद्ध होईल. ह्या सर्व भागांची सविस्तर प्रस्तावना पहिल्या भागाला दिली आहे तीच होय. प्रत्येक भाग २०० पृष्ठांचा असून दोन्ही भागांत मिळून एकंदर ४०० पृष्ठें मजकूर आला आहे. मुमुक्षूच्या पहिल्या १०।१२ वर्षांच्या अंकांतील निवडक लेख या दोन भागांत मिळून आले आहेत, तेव्हां हे दोनही भाग जवळ केले म्हणजे दहा वर्षांचे 'मुमुक्षू'चे अंक संग्रहीं असल्यासारखें होणार आहे असें म्हटल्यास फारसें वावगें होणार नाहीं.

२ ह्या भागांतील पहिले सात लेख म्हणजे प्राय: 'घडलेल्या' व समक्ष पाहिलेल्या अशा मनोरंजक व बोधप्रद गोष्टीच आहेत. नवव्या लेखांत 'कुनऱ्या थमालले थमाल आपुल्या गाई' या नामदेवाच्या लोकप्रिय पदाचें—कथाभाग व रहस्यभाग हे दोन्ही भरून—विवरण आलें आहे. 'धर्माकडे केव्हां वळणार?' या प्रश्नाला महाराष्ट्र काय उत्तर देईल त्यावर त्याचा भाग्योदय अवलंबून आहे. १४ वा लेख 'पतिपत्नीसंबंध' व ३४ वा 'बालविवाह व प्रौढ विवाह' हे दोन लेख सामाजिक असून त्यांत माझीं सामाजिक मतें स्पष्टपणें सांगितलीं आहेत. नूतन विचारांच्या लोकांस त्यांतील विचार आज न पटले तरी ते समाजहितबुद्धीनें प्रगट केले आहेत. 'गोपाळराव आगरकर' व 'नामदार गोखले' हे माझे विद्यालयीन गुरू होते. पहिले समाजसुधारक व दुसरे राजकीय पुढारी या नात्यानें सुप्रसिद्ध आहेत. तेव्हां त्यांवरील लेखांत त्यांच्याविषयींचीं माझीं मतें प्रथित झालीं आहेत. 'भागवत धर्माचें मंदिर' व 'मातृभाषेचें प्रेम' हे लेख मातृभाषेच्या प्रेमाचे द्योतक आहेत. 'गीतारहस्य' हा लेख टीकापर आहे. 'अश्वत्थ उर्फ संसारवृक्ष' हा लेख कै. त्र्यं. गु. काळे यांचा असून बाकीचे दोन्ही भागांतील सर्व लेख स्वत:चेच आहेत. 'सर्वांघटीं राम' 'राष्ट्रीय प्रार्थना' 'वाङ्मय तप, 'संत व सत्संग' 'सुखाची दिवाळी' वगैरे इतर लेख धर्मबुद्धिप्रबोधक आहेत. शेवटचें ३५ वें प्रकरण 'बोध आणि विनोद' हें असून त्यांत अनेक मनोरंजक व बोधप्रद स्फुटें आहेत.

३ मुमुक्षु प्रथम १४ वर्षें साप्ताहिक होता. त्याचें १९२१ पासून मासिकांत रूपांतर झालें आहे. साप्ताहिक केवळ अंगावर होता, म्ह. १४ वर्षें त्याचा खर्च त्यावरच भागणें मुष्किलीचें होतें. मासिक झाल्यापासून तो आपल्या पायावर उभा आहे. संपादकाचा चरितार्थ पहिल्यापासून मुमुक्षूवर नव्हता व नाहीं. हें केवळ आवडीचें व धर्मसेवेचें काम म्हणूनच त्यानें चालविलें आहे.

पुणें, मुमुक्षु कचेरी.
माघ शुद्ध १ शके १८४५

साधुसंतांचा दासानुदास,
**लक्ष्मण रामचंद्र पांगारकर.**

# अनुक्रमणिका.



# १ आईचा पराक्रम !



( श्रीमती गं. भा. ताईबाई वाळवेकर ह्या नांवाच्या एक ६२ वर्षें वयाच्या वृद्ध बाई गेल्या आठवड्यांत (आगष्ट १९११) पुण्यास आल्या होत्या. त्यांची कांहीं मौजेची हकीकत आम्ही ऐकल्यावरून त्या हकीकतीची शहानिशा करून घेण्यासाठीं आम्ही परवां त्यांच्या भेटीस गेलों होतों. समक्ष भेट प्रहरभर होऊन त्यांची गोष्ट त्यांच्याच मुखानें ऐकल्यावरून ती ' मुमुक्षु ' च्या वाचकांस मोठी मनोरंजक व बोधप्रद होईल असें आम्हांस वाटलें. एखाद्या कादंबरींत किंवा मनोहर काव्यांत शोभण्यासारखी सदर गोष्ट आहे. काव्याचा मनोहरपणा त्या बाईच्या इतिहासांत आहे. Truth is stranger than fiction अशी इंग्रजींत एक म्हण आहे. कल्पित कादंबऱ्यांतही न आढळणारा चटकदारपणा रोजच्या व्यवहारांत घडून येणाऱ्या गोष्टींत पुष्कळ वेळां आढळून येतो. )

१ ताईबाई:-प्रयागापासून १०० कोसांवर असलेल्या चित्रकूटाजवळ टोला, संजाना, इत्यादि गांवें बाजीराव पेशव्यांचे बंधु विनायकरावसाहेब पेशवे यांजकडून वाळवेकर यांस जहागीर मिळाली होती. हे पूर्वीचेच कुलीन व सुखवस्तु असून पांच गांवांची जहागीर मिळाल्यापासून तर गेल्या पाऊणशें वर्षांत यांचे घराण्यानें बरीच सुखस्थिति भोगली. ताईबाई ह्या तुकारामपंत दादांच्या सूनबाई होत. यांचें माहेर नगर जिल्ह्यांतलि संगमनेर येथील आणे यांचें घराणें होय. ही बाई दयारामपंत आणे ह्यांच्या मुलाची मुलगी असून सासरींमाहेरीं ताईबाईनीं चांगलीच श्रीमंती भोगली. वयाच्या ४० वर्षांपर्यंत मेण्याशिवाय बाई हालली नाहीं. नंतर कालगतीनें कांहीं गावें जाऊन दोन गांवची तीन हजारांची जहागीर, सोनेंनाणें, चारपांच वाडे, २०० गुरें इतक्या स्थितींत बाईनीं आपल्या वयाचीं ५२ वर्षें काढलीं.

२ आपत्तींस सुरुवात:-इ. स. १९०० मध्यें चित्रकूट व कवा

येथें प्लेग होऊन ताईबाईंचे यजमान आटोपले. पुढें ८ महिन्यांनंतर त्यी टोला, जिल्हा बांधा, येथें राहत असतांना तेथेंही प्लेग सुरू झाल्यामुळें त्यांनीं दिवसा मुलाला पुढें रवाना केला व रात्रीं मागाहून आपण निघाल्या. सैंजना येथें त्या येऊन पोंहचतात तोंच त्यांस समजलें कीं, मुलगा आलेला नाहीं. मनुष्यें रवाना केलीं, धांवपळ केली, पुष्कळ शोध केला पण मुलाचा पत्ता लागला नाहीं. दोन दिवस झाले, चार दिवस झाले, महिना झाला, चार महिने झाले, मुलाचा कांहींच पत्ता लागेना! त्या मुलाचें नांव नरहरि असून त्याला घरांत नारायण म्हणत. नरहरीला यावेळीं १॥ वर्षाची एक बहीण असून त्याचें वय सुमारें १३ वर्षांचें होतें. मुलगा नापत्ता झाला तेव्हां पटवाऱ्यानें यजमान फोत (मृत) झाले व मुलगा नापत्ता झाला असें वर कळविलें. 'मुलगा परागंदा झाला, आतां गांवची वाट काय करावयाची' असें त्यानें सरकारास विचारलें. सरकारनें घराला ताले (टाळे, कुलपें) ठोकलें व मालमत्ता सर्व ताब्यांत घेतली आणि बाईस कळविलें कीं 'मुलास आणावें म्हणजे जाहगीर परत मिळेल, नाहींतर पोटाला अन्नवस्त्र मिळेल.' फुलें वेंचलीं तिथें गवऱ्या वेंचायला नकोत म्हणून बाई एका वस्त्रानिशीं मुलाच्या शोधार्थ बाहेर पडल्या!

३ **मुलाचा शोध**:—तेव्हांपासून मुलाच्या शोधार्थ बाई आठ वर्षें सर्व हिंदुस्थानभर हिंडल्या! त्यांच्या प्रवासाची सर्व हकीकत दिल्यास विस्तार होईल म्हणून थोडक्यांत ती देऊन दोन मुद्यांच्या गोष्टी सांगूं. बाईंचा कर्मठपणा फार असल्यामुळें व पूर्ववय श्रीमंतींत जाऊन नंतर हालअपेष्टा सोसण्याचा त्यांजवर प्रसंग आल्यामुळें त्यांना विलक्षण आपत्ती काढाव्या लागल्या. रोज दोन वेळ स्नान, पूजा, जप वगैरे करून बाकीच्या वेळेंत कधीं पायानें, कधीं बैलगाडीनें, कधीं रेल्वेनें, याचना करून, पदर पसरून, आर्जवें करून त्यांनीं आठ वर्षांत चारी धाम केले व बहुतेक उत्तरेकडील व दक्षिणेकडील तीर्थें पाहिलीं. वाटेंत त्यांना पुष्कळ सज्जनांनीं पैशाची, ओळखीचीं पत्रें देण्याची व सल्लामसलतीची मदत केली. झांशी, दिल्ली व इतर अनेक स्टेशनांवर

अनेकांनीं भूतदयान्वित होऊन बाईंचा चांगला समाचार घेतला. त्यांत बडोद्याच्या भागीरथीबाई गोखले व गुजाबाई माने, नवसरीचे बाळासाहेब पटवर्धन, पालघर येथील काशीबाई कर्वे व मुंबईचें गंगारामभाऊ रेळे वकील इत्यादिकांचीं नांवें बाई प्रेमपूर्वक घेतात.

४ **गोसाव्यांचा मेळाः**—दोनदां मुलगा त्यांच्या हाताजवळ आलेला गेला ! द्वारकेस आल्यावर त्यांस समजलें कीं आपला मुलगा हा संतरामजीच्या आखाड्यांत ( मेळ्यांत ) असून त्याला गोसाव्यांनीं पळवला आहे ! जेथें उतरावें तेथें समजावें कीं, मुलगा ४ तासांपूर्वी येथून गेला. असें दोन वेळां झालें ! त्याच्या शोधार्थ त्या दोनदां द्वारकेस गेल्या, व दोनदां हैद्राबादेस गेल्या. चांगल्या मनुष्याच्या मदतीनें गांवचे गांव शोधून काढले, पण मुलगा कांहीं दिसेना व प्रवासाचे श्रम सफळ होईनांत. शेकडों वेळ बाईंनीं रडावें, मुसमुसावें, आक्रोश करावा, भेटेल त्याच्या हातापायां पडावें, 'माझा नरहरि देखिला काय' म्हणून शोक करावा व बेशुद्ध पडावें ! आईच्या अंतःकरणांत परमेश्वरी प्रेमाचा पूर्णांश सदव दिसतो. पांच सहा वर्षं बाई हिंडल्या पण मुलाचा पत्ता लागला नाहीं !

५. **गाणगापूरचा साक्षात्कारः**—शेवटीं दमून निराश होऊन कांहीं दिवस बाई गाणगापुरास श्रीदत्तसेवेस येऊन राहिल्या. तेथें श्रीदत्तसेवेंत त्यांचें मन रंगलें. स्नानोत्तर त्या इतक्या वेगानें दत्तपादुकांजवळ गेल्या कीं, प्रेक्षकांस आश्चर्य वाटलें. एका प्रसंगीं तर त्यांनीं पादुकांजवळ डोकें आपटून श्रीदत्तांस प्रार्थना केली कीं "माझा मुलगा मला सांपडून दे, नाहींतर मी तुझ्यापाशीं डोकें फोडीन किंवा कृष्णाबाईत देहविसर्जन करीन." बाईस दृष्टांत झाला. 'येथून जा. मुलगा भेटेल !'

६. **दाजीमहाराजः**—बाई तेथून निघाल्या त्या नाशीक-करून गोदावरी स्टेशनावरून पूर्णा स्टेशनावर आल्या.तेथें एका ब्राह्मणानें सांगितलें कीं, 'चार कोसांवर दाजीबामहाराज सत्पुरुष आहेत, त्यांच्या दर्शनास जा, ते तुमचा मुलगा जिवंत आहे कां मेला आहे हें तावडतोब

सांगतील.' बाई यानंतर महाराजांच्या दर्शनास गेल्या. हे सत्पुरुष कृष्णवर्णाचे, उंच बांध्याचे असून फार साक्षात्कारी आहेत. धर्मशाळेंत व आसपास शेंकडों लोक महाराजांच्या दर्शनास जमले होते. बाई दारांत उभ्या होत्या. एवढ्या गर्दींत माझी दाद कशी लागते या विचारांत बाई होत्या, तों महाराज बोलले 'त्या बाई लांब उभ्या आहेत त्यांना इकडे येऊं द्या, त्या दुःखकिष्टी आहेत, त्यांना आधीं पुढें येऊं द्या.' बाईनीं नमस्कार केला तों ते अंतर्ज्ञानानें सर्व जाणून न सांगतां ते बोलले, "बाई, तुमचा मुलगा घर सोडून गेल्यामुळें तुम्ही कष्टी आहांत. तुमचा मुलगा जिवंत आहे. तुम्ही दक्षिण दिशेकडे जा. शैल्यमल्लिकार्जुनाकडे जा. पहाडावर गोसाव्यांच्या मेळ्यांत तुमचा मुलगा आहे." हें ऐकतांच बाईस पराकाष्ठेचें आश्चर्य वाटलें व फार आनंद झाला. मुलगा गोसाव्यांच्या मेळ्यांत आहे हें बाईस माहीत होतेंच, तेव्हां तीच गोष्ट महाराजांनीं पुन्हां सांगितली याचा अचंबा वाटून तिची त्यांच्यावर पूर्ण श्रद्धा बसली. नंतर मंडळीकडे पाहून महाराज म्हणाले 'इच्यावर सद्गुरु श्रीदत्ताची कृपा आहे. हिला हिचा मुलगा. मिळेल, पण या कामीं एका म्लेंछाचें साह्य होईल.' महाराजांच्या पायां पडून बाई निघाल्या. महाराजांनीं निघतांना एक रुपया व चार जोंधळे बाईच्या पदराला बांधून दिलें व 'हा प्रसाद जपून असाच ठेवा' असें बजावलें. त्यानंतर बाई दक्षिणचें तिकिट काढून जाण्यास निघाल्या.

७. **मुलगा सांपडला**:—दाजी महाराजांच्या दर्शनानंतर दहा महिन्यांनीं बाई श्रीशैलमल्लिकार्जुनाकडे आल्या. तेथें पहाडाच्या पायथ्यापाशीं त्यांना एक कुणबी भेटला. 'बाई कुठें जातेस!' या प्रश्नास 'चुलींत जातें' असा पहिला जबाब झाला, तरी त्या कुणब्यानें सांगितलें कीं "हा समोर सपाटूचा पहाड आहे यावर अनेक गोसावी आहेत, देवस्थानें आहेत. तेथें तुझ्या मुलाचा शोध लागेल; पण सावध रहा, नाहीं तर हे गोसावी तुझी चटणी करतील. मद्रूच्या नारायणरावांच्या आईस यांनीं अशीच नुसती पळवून नेली, तर तिचा मागमूस सुद्धां लागू दिला नाहीं. त्याला ३५० रुपये पगार होता. त्यानें १२०० रुपये आईच्या

शोधार्थ खर्च केले, पण व्यर्थ. येथें जवळ छावणी आहे. छावणीवरच्या साहेबाला भेटून त्याला सर्व हकीकत सांग, तो वृद्ध व दयाळू आहे. त्याची चांगली मदत होईल." हें त्या कुणब्याचें भाषण ऐकून ताईबाई त्या छावणीकडे गेल्या. साहेब खरोखरीच दयाळु होता. एक प्रहर उभा राहून त्यानें बाईची सर्व हकीकत ऐकून घेतली व बरोबर एक शिपाई देऊन तुमचा मुलगा वर आहे कीं काय हें स्वतः पाहून या असें सांगितलें. "मुलाची ओळख पटल्यावर ओळख देऊं नका,आपल्या मनोवृत्ति दाबून ठेवा व रडूं नका, मुकाट्यानें परत या. ह्या शिपायाशीं बोलूं नका. त्याला कांहीं सांगूं नका. उठा. मुलगा येथें आहे, एवढें कळल्यावर मग मी पाहून घेईन."ह्या साहेबाच्या म्हणण्याप्रमाणें बाई वागल्या. दहा पंधरा बैरागी जातांना थोडा पहाड चढल्यावर त्यांनीं पाहिलें. त्यांतच कानांत मोठी भिकबाळी,अंगावर रेशीमकांठी उपरणें, डोक्यावरचे कांहीं केंस व थोड्या मिशा किंचित् पांढऱ्या अशा वेषांत त्यांनीं मुलाला पाहिलें! त्यांना रडूं कोंसळलें; पण चटकन् पाठ फिरवून साहेबाकडे त्या धूम ठोकीतच आल्या. साहेब बाईच्या वाटेकडेच डोळे लावून बसला होता. बाईनीं मुलगा ओळखल्याचें सांगतांच पंचवीस गोऱ्यांची पलटण घेऊन व बाईला बरोबर घेऊन साहेब तत्काळ निघाला व सरोवराच्या तीरीं ते गोसावी स्नान करीत आहेत व मुलगा बाहेर स्नानोत्तर धोतर नेसीत आहे अशा स्थितींत अचानक जाऊन धडकला.मुलाला त्याची हकीकत विचारून व ती बाईच्या हकीकतीशीं जुळतीसें पाहून त्यानें आईला पुढें होण्यास सांगितलें. आई साहेबाला घेऊन आपल्याला सोडविण्यास आली आहे ही खात्री होतांच मुलानें धांव मारली व आईच्या गळां मिठी घातली. त्या वेळचा तो देखावा पाहून साहेबही गहिंवरला. अर्धा तास मायलेंकरें मूर्छित होतीं. १३ वर्षांचा मुलगा जो दृष्टीआड झाला होता तो आतां २२ वर्षांचा झालेला तिला पुनः दिसला!

८ शेवटीं:—मुलाला ताबडतोब फर्स्ट क्लासच्या डब्यांत बसवून प्रयाग हायकोर्टाकडे जाहगिरीची व इस्टेटीची सोडवणूक करण्यास पाठविलें व बाई देवांचे नवस फेडीत आतां परत चालली आहे. गोसा-

ज्यांनीं त्या मुलाला सुखांत ठेवलें होतें व त्याला मठपति करण्याचा त्यांचा विचार होता.

९. **तात्पर्य**:—बाईची वत्सलता, धैर्य व हुषारी, श्रीदत्त गाणगापुरवासी यांचा दृष्टांत, दाजी महाराजांचें साधुत्व, व साहेबाचें आणि लोकांचें सौजन्य ह्या गोष्टी येथें विचार करण्यासारख्या आहेत.

---

१

सच्चिदानंदवृक्षाला लगटलेला सुंदर मोहोर म्हणजे रामकृष्णादि अवतार होत !

२

संपदेनें जो हुरळून जात नाहीं तो आपदेनें कधीं जर्जरही होणार नाहीं. भाग्याचा उन्माद ज्याला चढत नाहीं, तो दुर्दैवाच्या फेऱ्यांत सांपडला तरी गांगरून जात नाहीं, "उदेति सविता ताम्रस्ताम्र एवास्तमेति च;" म्हणजे उदय व अस्त ह्या दोन्ही प्रसंगीं सविता ताम्रच असतो !

३

मन हें धनुष्यासारखें आहे. तें जितकें रोधावें तितकें टणक होतें, तेंच मोकळें सोडल्यानें ढिसूळ होतें.

४

ईश्वरेच्छेनें सर्व घडत असतें व ईश्वर जसा सर्वांचा नियामक व शास्ता आहे, तसाच तो सर्वांचा मायबाप व परम दयाळु आहे ही श्रद्धा दृढ ठेवल्यावर सुखदुःखें बापडीच होऊन राहतील.

५

जग हा एक स्वच्छ आरसा आहे. जसें आपण असूं तसें जग आपल्याला दिसतें.

---

# २. एक गांवढळ तत्त्वज्ञ.

१. नाशीक जिल्ह्यांत कानवई गांवाजवळ रानांत एका राममंदिरांत पांचपन्नास गाई बाळगून राहणारा एक 'रघुनाथदास' नांवाचा हठयोगी आहे असें ऐकल्यावरून त्याच्या दर्शनार्थ १९०० सालीं मीं एका मित्रास बरोबर घेऊन एके दिवशीं गेलों होतों. घोटी स्टेशनावरून सदर स्थान २।३ कोसांवर आहे. प्रभातकाळचा समय होता, वारा शीतल मंद वाहत होता, दिशा प्रसन्न झाल्या होत्या, चित्तवृत्ति निर्मळ होती व सद्दर्शनाची उत्कंठा होती. अशा सुसमयीं भगवन्नामप्रशंसापर अभंग व पदें ईश्वरदत्त वेड्यावांकड्या सुरानें गात गात आम्हीं मोठ्या आनंदानें चाललों होतों. माझ्या हातांत एक लहानशी बॅग होती व तींत मुकटाभांडें व दासबोधाची पोथी एवढेंच सामान होतें. पण ती बॅग सुद्धां घेण्यास कोणी गडी मिळेल तर तो मागेल तें त्यास वेतन देऊन आपण मोकळे होऊं असें माझ्या मनांत आलें. रानांत कांहीं कोणी हमाल मिळेना. अर्धी वाट चालून गेल्यावर एक लहानसें पांचसहा घरांचें खेडें लागलें. त्या सहा घरांत मिळून तांब्यापितळेचें एकही भांडें नव्हतें ! सगळीं भांडीं मातीचीं होतीं ! खानदेश जिल्ह्यांत जसे भिल्ल किंवा पुणें जिल्ह्यांत जसे कोळी तसे नाशीक जिल्ह्यांत वार्ली लोक आहेत. त्या वार्ली लोकांची तेथें सारी वस्ती होती. आम्हीं त्या स्थानीं गेलों तों सभोंवार वनदेवतेचें भव्य स्वरूप पाहून चित्तास फार आनंद झाला व त्या वार्ल्यांच्या स्त्रीपुरुषांस कांहीं प्रश्न केले. त्यांचीं त्यांनीं आपल्या सरळ स्वभावास अनुसरून सरळ उत्तरें दिलीं. हीं वनदेवतेचीं लेंकरें सुखी व निरोगी होतीं. दागदागिने, वस्त्रपात्रें त्यांजवळ बिलकुल नव्हतीं, त्यामुळें चोराचिलटांची त्यांना भीतिच नव्हती ! व कोणी एखादा चोर त्यांचीं मडकीं चोरून नेण्यास आलाच तर त्याचा समाचार घेण्यास त्यांच्यांतील एखादी बाईही पुरली असती! त्यांच्या झोपड्यांमधूनच

# मुमुक्षूचें सिंहावलोकन.

एक स्वच्छ निर्झरोदकाचा पाट सैरावैरा धांवत सुटला होता, त्याच्या लीला पाहत, त्याच्या कांठीं बसून कांहीं वेळ आम्हीं आनंदांत काढला. त्या झुळझुळ वाहणाऱ्या ओढ्याचें पाणी अमृतासारखें रुचकर व मधुर लागलें. सभोंवार दाट वृक्षांची गर्द छाया पसरली आहे, पाण्याचे पाट आपल्या निसर्गरमणीय बागडण्यानें व मंजुल ध्वनीनें नेत्रांस व कर्णांस आनंदवीत आहेत, स्वातंत्र्यसौख्य भोगणाऱ्या पक्ष्यांचे किलकिलाट कानांला मुलांच्या बोबड्या बोलांप्रमाणें संतोषवीत आहेत, कामक्रोध-मत्सरादि शहरांत यथेच्छ वावरणाऱ्या असुरांचा वाराही तेथें लागत नसून शमदमादि सुरांचें तें निवासस्थानच बसलें आहे, अशा त्या नितांतपावन व विविक्तस्थानीं घटकाभर बसल्यानें जीवास पराकाष्ठेचा आनंद वाटला. कांहीं काळ शांत व निर्मळ स्थानीं बसून काढल्यावर आम्हीं त्या हठयोग्याच्या आश्रमांत जाण्यासाठीं उठलों. इतक्यांत तेथें एक वाली आला. वर्णानें काळा, शरीरानें मजबूत व स्वभावानें मोकळा असा तो निमनागवा प्राणी पाहून आम्हांला मौज वाटली. स्वदेशविदेश, श्रीमंतगरीब, टाइम्सग्याझट, केसरीज्ञानप्रकाश, सुधारक-दुर्धारक इत्यादि गोष्टी त्याच्या कानावरूनही गेल्या नव्हत्या. तो आपला सृष्टीचा एक लाडका प्राणी होता. जगांत, हिंदुस्थानांत व कोठेंही चाललेल्या कसल्याही चळवळीचा त्यास वाराही लागला नव्हता. ढुंगास लंगोटी ह्यापेक्षां त्याजवळ वस्त्र नव्हतें. संग्रहाला तांब्यापितळेचें एकही भांडें नव्हतें. सोनें त्यानें डोळ्यांनींही पाहिलें नव्हतें. रुप्याची ओळख त्याला कधींकाळीं चवलीपावली हातीं आली तर व्हायची. मनुष्यानें अभिमानानें उत्पन्न केलेल्या कृत्रिम वस्तु, कृत्रिम कल्पना व कृत्रिम सृष्टि यांना तो पारखा होता. शहरांतला मनुष्य त्याला गांवढळ, अशिक्षित, रानटी, जंगली असें समजला असता. माझ्या एका मित्रानें एकदां विनोदानें " Pleaders, Physicians and Preachers are the enemies of the Natural man. Pleaders stand between man and man; Physicians between man and Nature and Preachers between man and God! " असा चुटका एका इंग्रजी ग्रंथांतून वाचून दाखविलेला मला स्मरला.

त्याचें तात्पर्य हें आहे कीं, "वकील, वैद्य व धर्मोपदेशक हे मनुष्याचे शत्रु आहेत! वकील माणसामाणसांत तंटे लावतात, वैद्य निसर्ग व मनुष्य यांत विरोध पाडतात व धर्मोपदेशक मनुष्य व देव यांच्या सहजसंबंधाचा बिघाड करितात!" सर्व राष्ट्रांत वकील, वैद्य व भट हे आहेतच; पण यांनीं मनुष्याचा स्वाभाविकपणा हरण केला असून मनुष्याला कृत्रिम यंत्र बनविलें आहे! आमच्या वार्ली मित्राला हे तीनही माहीत नव्हते, इतका तो निसर्गदेवीचा लाडका होता. त्याची बायको व एक मूल यांच्यावर त्याचें प्रेम होतें; परदार व परधन यांचा त्याच्या बुद्धीला विटाळही नव्हता. रोज सकाळीं उठून रानांतलीं चार लांकडें तोडावींत व घोटीच्या स्टेशनावर जाऊन विकावींत, चार पैसे मिळतील त्याचे तेथेंच दाणे विकत घ्यावेत व ते घरीं आणल्यावर बायकोनें भाकरी करावी असा त्याचा क्रम होता. दसरा आणि दिवाळी म्हणजे काय हें त्याला माहीत नव्हतें. सूर्य जसा उगवतो, प्रकाशतो व अस्त पावतो तसा त्याचा नित्यक्रम ठरीव होता. तो क्षेत्रसंन्यासी होता! कारण तो चार कोसांच्या पलीकडे जग ओळखीत नव्हता! 'उद्यां' ही कल्पनाच त्याच्या गांवीं नव्हती. त्याला 'आज' तेवढें माहीत होतें! त्याच्यापाशीं वर्तमानकाळच होता, भूतकाळ व भविष्यकाळ हे त्याला ठाऊक नव्हते! अशी ती सृष्टीची घडीव मूर्ति होती, मनुष्याच्या कृतीची पेन्सील या चित्रावरून फिरलेली नव्हती!! शास्त्र, धर्म, देश, व्यापार, आश्रम, वर्ण, सुधारणा, स्त्रीशिक्षण, देशोद्धार, पतितपरावर्तन, वरच्या जाती, खालच्या जाती, भाषा, वाङ्मय, स्वदेशविदेश, स्वजातपरजात, इ० इ० मनुष्यकृत कुलंगडीं त्याला बिलकूल माहीत नव्हतीं. तो देश व काल यांचा परिच्छेद जाणत नव्हता! देव आणि मनुष्य यांचा भेद कल्पून मग त्यांच्यांत चार मुक्ति शोधायच्या आणि मग द्वैताद्वैताचा कीस पाडायचा आणि बंधमोक्षाची वाटाघाट करायची इ० प्रकार त्याला माहीत नव्हते. त्याला मनुष्य म्हणा कीं देव म्हणा, जीव म्हणा कीं ब्रह्म म्हणा, बद्ध म्हणा कीं मुक्त म्हणा काय वाटेल तें म्हणा, तो त्याहून

वेगळा म्हणजे सहजपणांत होता. तुम्ही कराल ती कल्पना त्याच्यावर बसेल. 'तो स्वतः होता तसा सहज होता! असो; त्याला पाहून मी म्हटलें कीं, 'माझी एवढी बॅग घेऊन त्या आश्रमापर्यंत चल, तुला चार पैसे देतों!' सर्प अंगावर आल्यासारखा दचकून तो म्हणाला, 'कां? मी नाहीं यायचा!' मी त्याला दोन आणे देऊं केले, चार आणे देऊं केले, तो ह्मणून कबूल होईना! त्यानें चोख उत्तर केलें, 'मला पैसे नकोत. आजचे दाणे मी आणले आहेत. लांकडें विकून चार पैसे मिळाले, बायको आतां भाकर करील व आम्ही खाऊं. उद्यांचा विचार आज कोण करितो? उद्यांचें उद्यां!' मी त्याला पुष्कळ सांगितलें कीं 'तुला मी चार आणे देतों, तुला दोन दिवस काम करावें लागणार नाहीं' पण तो ऐकेना! 'उद्याचें उद्या' हें त्याचें कायम होतें. त्याची ती स्थिरमति पाहून माझा विद्येचा अहंकार जिरला. कोण संतुष्ट व सुखी प्राणी! उद्यांची, उत्तरवयाची, पोराबाळांची व पुन्हां त्यांच्या पोराबाळांची काळजी वाहून त्यांची तर्तूद करण्यासाठीं सारी अक्कल, सारा काळ, सारें आयुष्य खर्च करण्याची जी जनराहटी पडली आहे तिचें मूर्खत्व माझ्या त्यावेळीं मनावर उमटलें. 'देह प्रारब्धाच्या हातीं देऊन आत्मचिंतन करीत रहा' असें वेदांती सांगतो, व "अन्नआच्छादन हें तों प्रारब्धाआधीन ॥ तुका म्हणे वाणी। सुखें वेंचा नारायणीं" असें भक्त सांगतात; 'पण लक्षांत कोण घेतो!'

२ "निःस्वो वष्टि शतं शती दशशतं लक्षं सहस्राधिपो। लक्षेशः क्षितिपालतां क्षितिपतिश्चक्रेशतां वांछति।" ह्याप्रमाणें पुढें पुढें हांव ठेवून 'उद्या' च्या विचारांत 'आज' फुकट घालविणारे व मायामृगजळाच्या मागें लागून उरीं फुटणारे आह्मी सुशिक्षित लोक आपल्याला शहाणे समजतों पण त्या अडाणी वाल्यीं तत्त्वज्ञापेक्षां किती तरी मूर्ख आहोंत! त्याला उद्याचा विचार नाहीं, हांव नाहीं, लोभ नाहीं, मत्सर नाहीं, काम–अभिलाष नाहीं, सुखदुःख नाहीं, स्वर्गाची आकांक्षा नाहीं नरकाचें भय नाहीं; असा तो संतुष्ट पुरुष मोठा योगी आहे, असें मला वाटलें. विद्या व परीक्षा ही संतोषवृत्ति उत्पन्न करितात काय? मला तो

वाळीं गुरुसारखा वाटला. ' आशायाः परमं दुःखं' ' संतोषो नंदनवनं शान्तिरेव हि कामधुक् ' ' संतुष्टः संततं योगी यतात्मा दृढनिश्चयः ' ' योगक्षेमं वहाम्यहम् ' इत्यादि वचनें पोपटासारखीं पाठ ह्मणायला व लिहायला आह्मी सारे शिकलों, पण तें नैराश्य,,ती हरिचरणीं दृढनिष्ठा, ती संतोषवृत्ति लक्षांशानेंही आमच्या हृदयांत बसत आहे काय? निराशेनें व लाजेनें मानच खालीं घालावी लागते. नाहीं कां ? अभिलाषाचें भूत चित्तांत दडून बसलेलें आहे. तुह्मी ढोंग करून जगाला फसवाल पण कधींही आपलें आपल्याला फसवूं शकणार नाहीं. ' आशा ही समूळ खणोनी टाकावी.। तेव्हांची गोसावी व्हावें तेणें ' हा उपदेश ठसत नाहीं. आह्मी जें आपल्याला विद्वान्, ज्ञानी, सुशिक्षित, विचारी, नागर समजतों तें चित्तांतला काम, अभिलाष, हांव सुटत नाहीं तोंवर नुसतें ढोंग नव्हे काय? " बहु खोटा अतिशय। नाणा भले सांगों काय" संतोष कसा पाहिजे ?

योगियांचा आहारू घेणें । काय सेविलें हें रसना नेणें।
रसनापंगिस्त नाहीं होणें। आहारू सेवणें निजबोधें ॥ २८ ॥
ऐसीच योगियांची स्थिति। वाताशनें सुखें वर्तती ।
आहारालागूनि पुढिलांप्रती। न येती काकुळती सर्वथा ॥ ३१ ॥
अदृष्टीं असेल जें जें वेळें। तें तें मिळेल तेणें काळें।
यालागीं त्याचें ज्ञान न मैळे। धारणा न ढळे निजबोधें ॥३६॥

श्रीएकनाथीभागवत. अ. ८

३ त्या वाळीं गृहस्थाची ती समाधानाची वृत्ति पाहून माझ्या मनांत खेडेगावें व नगरें, ज्ञानी व अज्ञानी, संतोष व तळमळ, सहज आरोग्य व इस्पितळें यासंबधी विचारांच्या कितीतरी लहरी उठल्या. ऋषिआश्रमतुल्य त्या एकांतस्थानाची कल्पना मनांत येऊन नगरवासीयांपेक्षां येथील लोकांचें भाग्य मी मनांत वाखाणूं लागलों. मुंबईच्या नळांचें बेचव पाणी कोणीकडे व त्या नितांतरमणीय स्थळाचें अमृतमधुर उदक कोणीकडे ? तेथें उन्हाळ्यांत आधीं उकाडाच होत नाहीं व झालाच तर पंख्यांचें काम वृक्षवल्ली किती तरी आनंदानें व स्वकर्तव्यैकबुद्धीनें

बजावीत असतात ! पुण्यनगरीच्या रस्त्यांतून सकाळीं जाणाऱ्याला नाकाला पदर लावून व सडका झाडणाऱ्या बायांच्या खराट्यांनीं उड-णारा गुलाल अंगावर घेऊन वाट आटपावी लागते तसा प्रकार येथें नसून सर्वकाळ स्वच्छ हवेचा लाभ होतो. हवा चांगली, पाणी उत्तम, भूक सुरेख, शौचाला साफ. 'डिस्पेप्शिया'ची भीति नाहीं. चहाचें कढत पाणी सांजसकाळ घशाखालीं ओतून भूक मारलेले मूढ लोक तेथें सांपडायचे ना-हींत! डॉक्तरांचीं दुकानें नसल्यामुळें रोगांची परंपरा चालविणारीं औषधें नाहींत ! शिळीं व रोगोत्पादक फळें नाहींत. वाटेल तेव्हां करवंदीचीं झुडपें पहात पहात अर्धींकच्चीं फळें तोडून तोंडांत टाकावीत, पेरूच्या झाडावर चढून कच्चे पण अत्यंत रुचकर दोडे खावेत, जांभळें खावींत, आंबे रगडावेत, चिंचा दगडानें पाडून खाव्यात व सर्व खाल्लेलें पचवून निरामय व्हावें ! हा लाभ नगरांत कोठचा मिळणार ? जाडीभरडी भाकर व कांदालसूण खाऊन तेथील लोकांच्या तोंडावर सुखाची व आरोग्याची जी टवटवी दिसते ती रोज घृतकल्यामधुकल्येशीं गांठ ठेवणाऱ्या व दिवसांतून चारदां शौचास जाऊन डॉक्टरवैद्यांचा स्नेह संपादणाऱ्या परीटघडी नागरिकांच्या तोंडावर कधींही दिसायची नाहीं ! तेथें शाळा कॉलेजें नाहींत; तथापि विद्येच्या परिघांत पण कृत्रिम वातावरणांत वाढ-लेल्या मनोभूमींत अफाट उगवणाऱ्या मनोवृत्तींचीं दुष्ट रानें जेथें पस-रत नाहींत तेथें 'विद्येचें बंड' हीं काय करायचें आहे ! हात चिख-लांत घालून मग तो धूत बसण्यापेक्षां चिखलांतच न घातलेला काय वाईट ? ज्ञानप्रसार, विद्यावृद्धि, सक्तीचें शिक्षण इ. इ. ज्या गप्पा शहरांतून चालतात त्यांचा तात्विकदृष्ट्या विचार केला तर असल्या ह्या फोल ज्ञानाची जीवाला गरजच काय आहे हें कळेनासें होतें. स्त्रीसौंद-र्याच्या कल्पना मनांत ठसवून घेऊन व प्रणयकथा, नाटकें, तमाशे वगैरेंनीं त्या वाढवून घेऊन मग 'परस्त्री मातेसमान'च्या गोष्टी सांगायच्या व 'परस्त्रीतें म्हणतां माता । चित्त लाजवीतें चित्ता ॥' असा अनुभव घ्यायचा त्यापेक्षां त्या प्रणयाचें रोपच चित्तभूमीवर न उगवलेलें काय वाईट ? द्रव्याच्या लोभानें द्रव्य मिळव मिळव मिळवा-

यचें आणि मग रुपयांतली पै खर्चून स्वार्थत्यागाची व औदार्याची डिंडिमा पिटवून अहंकारसैतानाचा गुलाम बनायचें, त्यापेक्षां सोन्यारुप्याचा विटाळच धरलेला काय वाईट ? काम, क्रोध, लोभ, मोह, मद, मत्सर इ० दुर्विकारांचें चरित्र माहीत असून त्यांचा पगडा आपल्यावर बसूं देण्यापेक्षां हे दुर्विकारच जेथें उगवत नाहींत असा एकांतवास पत्करणें कसें गैर ?

४. अशा प्रकारचे विचार मनांत येऊन मी त्या सुखमय स्थितींत गुंगलों असतांना तुकोबारायांचा पुढील अभंग आठवलाः—

झाडा वोरपोनी खाऊनियां पाला ॥ आठवी विठ्ठला वेळोवेळां ॥ १ ॥
वल्कलें नेसोनी चिंधिया वेढोनी । सांडीं जवळूनी देहमान ॥ २ ॥
लोकमान वमनासमान मानणें । एकांतीं राहणें विठोसाठीं ॥ ३ ॥
सहसा करूं नये प्रपंचीं सौजन्य । सेवावें अरण्य एकांतवास ॥ ४ ॥
ऐसा हा निर्धार करी जो मनाचा । तुका म्हणे त्याचा पांग फिटे ॥५॥

तुकोबारायांचा हा भंडाऱ्यावरचा अनुभव मनांत येतांच माझ्या मनांत तीन चित्रें उभीं राहिलीं. एक तेथील वारली, दुसरे तुकोबा व तिसरे विविध मनोवृत्तींनीं गजबजलेला व अनंत चेष्टांत गुंगलेला सारा मनुष्यसमाज. तो वारली पुरा अज्ञ, तुकोबा पुरे सुज्ञ व सारा समाज धड अज्ञही नाहीं व धड सुज्ञही नाहीं असा अर्धवट ! हे तीन प्रकार एका दृष्टांतानें मला उलगडले. त्या वारलींची चित्तवृत्ति पांढऱ्या शुभ्र वस्त्रासारखी, सामान्य माणसांची चित्तवृत्ति अनेक रंगांचे डाग पडलेल्या मलिन वस्त्रासारखी व तुकोबासारख्या साधूंची वृत्ति सुंदर वेलबुट्टी काढलेल्या व विविध उच्च रंगांना चित्रित केलेल्या मनोहर व बहुमोल वस्त्रासारखी. किंवा कागदाचा दृष्टांत घेऊं.:—सांसारिकांची वृत्ति सर्वत्र चितारलेल्या कागदासारखी होऊन त्यावर सुंदर चित्र काढणें अशक्य होतें. तो कागद निरुपयोगी होऊन जातो, त्यापेक्षां साधा कोरा कागद बरा. कोऱ्या कागदावर कांहीं तरी लिहितां येतें ! त्यावर वाईटही चित्रें काढून तो निरुपयोगी करितां येतो किंवा उत्तम

चित्रही काढतां येतें. पुऱ्या अज्ञजीवाची चित्तवृत्ति या कोऱ्याकागदासारखी असते, तो विविध ज्ञानानें चितारलेल्या व निरुपयोगी झालेल्या कागदापेक्षां चांगला. कागदावर कांहीं तरी खरडून तो निरुपयोगी करून टाकण्यापेक्षां कोरा ठेवणें चांगलें नाहीं काय ! ' अर्धवट ज्ञानापेक्षां पुरें अज्ञान सहस्रपटीनें चांगलें. अर्धवट ज्ञानाचा कागद अहंकाराच्या शाईनें काळाकुट्ट होऊन जातो. पुरा अज्ञानी असेल तो विरुद्ध टोंकाच्या ज्ञान्याशीं गांठ पडतांच त्या ज्ञान्याचे सर्व शुभसंस्कार तत्काळ ग्रहण तरी करितो. वाल्ह्या कोळ्याचा वाल्मीकि होतो, पण एडव्होकेटचा ज्ञानीभक्त होणें कठिण ! ज्ञानी व अज्ञानी हीं दोन निरुद्ध टोंकें, पण त्यांची गांठ पडूं शकते ! भूमितींतही Two extremes meet हाच नियम आहे. परमार्थांत किंवा व्यवहारांत हाच नियम लागू पडतो. रामरायाला पूर्ण श्रद्धेनें झट्दिशी वानर मिळाले, कृष्णावतारांत गोपगोपींना कृष्णनाथाचें प्रेमसुख मिळालें, शिवरायाला राज्यस्थापनेच्या कामीं अडाणी मावळ्यांचीच मदत झाली ! बहुधाज्ञानानें तर झालले पंडित किंवा अभिमानी पदवीधर हे जसे स्वधर्माला प्रतिकूळ होतात तसे दरबारी लोक, श्रीमान् शेट किंवा वतनदार हे स्वराज्यस्थापनेला प्रतिकूळ असतात. याला अपवाद निघत नाहींत असें नाहीं, पण हा सामान्य नियम खरा. पांडित्यानें बहुधा तर्कट वाढतें व दरबारीपणानें भ्याडपणा वाढतो. समाजाची जी प्रगती होते तिला दोघेही प्रतिकूळच होतात. Vested Interests दोहींकडे अवरोधच करितात. उच्च मनोवृत्तींच्या प्रचंड लाटेला दोघांचाही विरोधच होतो. तात्पर्य काय कीं, पुरें अज्ञान किंवा पुरें ज्ञान पाहिजे. अर्धवटपणा वाढून समाजाचा सत्यनाश होतो व व्यक्तिशःही हित पदरांत पडत नाहीं. हें लक्षांत आणूनच आमच्या शास्त्रकारांनीं विद्या ब्राह्मणांच्या गळ्यांत बांधली व शूद्रांना सेवाधर्मांत ठेवलें. तथापि ' स्वे स्वे कर्मण्यभिरतः संसिद्धिं लभते नरः ' याप्रमाणें उद्धाराचा मार्ग दोघांनाही खुलाच आहे.

---

# मुमुक्षूचें सिंहावलोकन.

एक स्वच्छ निर्झरोदकाचा पाट सैरावैरा धांवत सुटला होता, त्याच्या लीला पाहत त्याच्या कांठीं बसून कांहीं वेळ आम्हीं आनंदांत काढला. त्या झुळझुळ वाहणाऱ्या ओढ्याचें पाणी अमृतासारखें रुचकर व मधुर लागलें. सभोंवार दाट वृक्षांची गर्द छाया पसरली आहे, पाण्याचे पाट आपल्या निसर्गरमणीय बागडण्यानें व मंजुल ध्वनीनें नेत्रांस व कर्णांस आनंदवीत आहेत, स्वातंत्र्यसौख्य भोगणाऱ्या पक्ष्यांचे किलकिलाट कानांला मुलांच्या बोबड्या बोलांप्रमाणें संतोषवीत आहेत, कामक्रोध-मत्सरादि शहरांत यथेच्छ वावरणाऱ्या असुरांचा वाराही तेथें लागत नसून शमदमादि सुरांचें तें निवासस्थानच बसलें आहे, अशा त्या नितांतपावन व विविक्तस्थानीं घटकाभर बसल्यानें जीवास पराकाष्ठेचा आनंद वाटला. कांहीं काळ शांत व निर्मळ स्थानीं बसून काढल्यावर आम्हीं त्या हठयोग्याच्या आश्रमांत जाण्यासाठीं उठलों. इतक्यांत तेथें एक वाली आला. वर्णानें काळा, शरीरानें मजबूत व स्वभावानें मोकळा असा तो निमनागवा प्राणी पाहून आम्हांला मौज वाटली. स्वदेशविदेश, श्रीमंतगरीब, टाइम्सग्याझट, केसरीज्ञानप्रकाश, सुधारक-दुर्धारक इत्यादि गोष्टी त्याच्या कानावरूनही गेल्या नव्हत्या. तो आपला सृष्टीचा एक लाडका प्राणी होता. जगांत, हिंदुस्थानांत व कोठेंही चाललेल्या कसल्याही चळवळीचा त्यास वाराही लागला नव्हता. ढुंगास लंगोटी ह्यापेक्षां त्याजवळ वस्त्र नव्हतें. संग्रहाला तांब्यापितळेचें एकही भांडें नव्हतें. सोनें त्यानें डोळ्यांनींही पाहिलें नव्हतें. रुप्याची ओळख त्याला कधींकाळीं चवलीपावली हातीं आली तर व्हायची. मनुष्यानें अभिमानानें उत्पन्न केलेल्या कृत्रिम वस्तु, कृत्रिम कल्पना व कृत्रिम सृष्टि यांना तो पारखा होता. शहरांतला मनुष्य त्याला गांवढळ, अशिक्षित, रानटी, जंगली असें समजला असता. माझ्या एका मित्रानें एकदां विनोदानें "Pleaders, Physicians and Preachers are the enemies of the Natural man. Pleaders stand between man and man; Physicians between man and Nature and Preachers between man and God!" असा चुटका एका इंग्रजी ग्रंथांतून वाचून दाखविलेला मला स्मरला.

माझा गांव मला अत्यंत प्रिय वाटत असे. तरी मी वर्णन करीत आहें त्या वेळीं माझ्या मनोरंजनासारखें आमच्या गांवांत फारसें कांहीं राहिलें नव्हतें. कालिदास, भवभूति, बाणभट्ट, जगन्नाथपंडित, मिल्टन, गोल्डस्मिथ, जॉन्सन, बर्क अशा ग्रंथकारांच्या विचारांशीं नित्य खेळायची व त्यांच्या उक्तींना जिव्हेवर नाचवायची संवय झालेल्या मला माझा तो विद्यासंस्कारविहीन गांव या वेळीं तितका मनोरम वाटला नाहीं. बालपणच्या संस्कारामुळें व जुन्या ओळखीमुळें तो गांव जरी प्रिय वाटे तरी सुविचारविनिमय करण्यासारखी संगत तेथें न मिळाल्यामुळें मी एका महिन्यांतच कंटाळलों व ४।५ महिने बाहेर प्रवासास जाण्याचा मीं निश्चय केला. ह्या चार महिन्यांत मीं पायींच अनेक ठिकाणीं प्रवास केला. अनेक डोंगर, किल्ले व तीर्थक्षेत्रें पाहिलीं. अनेक प्रसंग अनुभविले, अनेक जुन्या ओळखी दृढ केल्या व नवीन परिचय संपादिले. सृष्टींतले अनेक चमत्कार पाहिले आणि एकंदरींत हा चार महिन्यांचा प्रवास माझ्या शरीराला व मनाला अत्यंत उत्साहकारक व आरोग्यदायक झाला. प्रवास हें शिक्षणाचें एक प्रधान अंग आहे, असें माझ्या तेव्हां अनुभवास आलें. कविवचन प्रसिद्धच आहे:—

केल्यानें देशाटण पंडितमैत्री सभेंत संचार ।
शास्त्रग्रंथविलोकन मनुजा चातुर्य येतसे फार ॥ १ ॥

त्यावेळीं ग्रंथावलोकन थोडेंबहुत चालल होतें, पण पंडितमैत्री किंवा सभेंत संचार झाला नव्हता. पण ह्या पर्यटनानें माझा पुष्कळच फायदा झाला. मी पुणें, सातारा, कुलाबा इत्यादि जिल्ह्यांच्या त्यावेळीं फारसा बाहेर गेलों नाहीं. तथापि या पायीं प्रवासानें खरोखरच मला चांगला अनुभव आला. असो. त्या सर्व गोष्टी वर्णीन तर एक ग्रंथ होईल.आज माझ्या वाचकांना बोधप्रद होईल अशी एका सज्जनाच्या भेटीची तेवढी हकीकत देतों. प्रथम वाचकांना एक इषारा द्यावासा वाटतो तो हा कीं त्यांत काल्पनिक किंवा पदरचा असा कांहींही भाग नाहीं. हा इतिहास आहे.आतां यांत माझा खास संबंध येणें अपरिहार्य आहे.

२ असो. कुलाबा जिल्ह्यांत पाली व मढ अशीं अष्टविनायकांपैकीं

दोन स्थानें आहेत. तीं पाहण्याचें माझ्या मनांत आलें. तेव्हां मी पौडाहून थेट पश्चिमेकडे आपल्या प्रवासाचा मोर्चा फिरविला. येथें एक सांगिलें पाहिजे कीं, मी तेव्हां अतिमंद असाही ' मुमुक्षु ' नव्हतों. परमार्थाची दिशा मला ठाऊक नव्हती. सरस ग्रंथाध्ययनानें थोडासा मार्मिक, प्रेक्षक व रसिक असाच मी तेव्हां होतों. पौडाहून पश्चिमेस सहा कोसांवर 'आवळस' म्हणून गांव आहे. तेथें माझ्या बहिणीच्या घरीं चार दिवस राहून माझे मित्र—जे आज ' गोविंदसुत ' या नांवानें महाराष्ट्रांत प्रसिद्ध आहेत—त्यांच्या संगतींत आसपासचे अनेक गांव व डोंगर पाहिले, आवळसच्या पश्चिमेचा भला उंच डोंगर—त्याचें नांव मला आठवत नाहीं—तो एक दिवस आह्मीं सात आठजण पाहण्यास गेलों. वाटेंत अंधारबन लागलें. त्या वनांत अशी गर्द झाडी होती कीं त्या झाडींतून चाललों असतां चैत्रांत मध्यान्हसमयालाही सूर्याचा कवडासाही दिसत नाहीं ! बरोबर पांच मावळे होते; पण एकदां वाघाच्या ऊन ऊन लेंड्या आमच्या हाताला लागल्या तेव्हां आम्ही बरेच घाबरलों; पण मावळे थंड होते, ' वाघरूं काय करतिया ' असा त्यांचा घोपटमार्ग होता. त्या डोंगराच्या पोटांतलीं खबदाडें वगैरे प्रकार अवर्णनीय पाहिले. शिखरावरून प्रभातसमयीं जवळ दुर्बिण असली तर पश्चिमेस मुंबई व पूर्वेस पुणें अशीं हीं दोन्हीं शहरें एका ठिकाणावरून दिसतात असें ऐकिलें; पण आम्हांजवळ दुर्बिण नसल्यानें आह्मांस याचा प्रत्यय घेतां आला नाहीं. पलीकडे एक डोंगराचा मोठा कडा—सह्याद्रीचा भाग—पाहिला. त्याचा थोडा भाग शंभर वर्षांपूर्वीं गडगडला तेव्हां सभोंवारच्या पंचवीस कोसांतल्या स्त्रियांचे गर्भपात झाले असें सांगतात ! ह्या सह्याद्रीच्या घाटमाथ्यावर एक अति भयंकर दरी आम्हांस आढळली. ह्या दरीबद्दल ' हेडंबा मुतली अन् दरी तुटली ' अशी एक ह्मण तिकडे मावळ्यांत प्रसिद्ध आहे ! ' गोविंदसुत ' परतले व दुसरी सोबत पाहून मी पालीस गेलों. तेथें श्रीगणपतीचें प्रख्यात मंदिर आहे. व मंदिरालगतच तलाव आहे. त्यांत यथेच्छ पोहलों व देवाला अस्तमानसमयीं

अभिषेक करून सर्व मंडळी जेवलों. दुसरे दिवशीं समीप असलेला सचिवपंतांच्या हद्दींतला ‘ सुधागड ’ किल्ला पाहिला व तिसरे दिवशीं ‘मढ’कडे आम्ही वळलों.

३ मढगांव लहानच होता. गणपतीच्या देवळांतच चार दिवस मुक्काम केला. ह्या चार दिवसांत एक मोठा लाभ झाला. गणपतीच्या गाभाऱ्यासमोर एक सभामंडप होता व सभामंडपाला लागून उतरत्या जागीं एक दोन खणांची पडवी होती. त्या पडवींत एक ब्राह्मण रहात होता. त्याचा नित्यक्रम चार दिवस मीं पाहिला तो असा होता. हा ब्राह्मण वर्णानें गोरा, मध्यम बांध्याचा, शांत वृत्तीचा व निरुपाधिक असा होता. त्याची पडवी स्वच्छ होती. तो ती रोज पहाटेस गोमयानें स्वतः सारवी. त्याच्यापाशीं दोन नेस्तीं धोतरें, दोन पांघरतीं धोतरें व दोन पांढऱ्या घोंगड्या एवढीं सहाच वस्त्रें होतीं. भांडीं देवपूजेचीं सर्व होतीं. त्याशिवाय एक तपेली व एक घागर एवढींच होतीं. सकाळीं आठ वाजतां एक गांवातला ब्राह्मणाचा मुलगा अच्छेर शेर दूध आणून ठेवी. ह्या दुधाशिवाय भुइमुगाचे दाणे, खजूर व केळीं इतके पदार्थ त्याच्या खोलींत असत. चूल नव्हती व स्वयंपाकाची कांहींच तजवीज नव्हती. तो गांवांत कोणाच्याही घरीं जात नसे व त्या दूध व दाणे आणणाऱ्या मुलाशिवाय त्याच्याकडेही कोणी येत नसे. तो मुलगा दूध ठेवून तसाच जात असे. हा ब्राह्मण पहांटे तीन वाजतां उठे, नंतर भूपाळ्या, स्तोत्रें वगैरे तोंडानें पुटपुटत पडवी सारवी, उपकरणीं स्वच्छ घांसून ठेवी, फुलें निवडी व साडेचार वाजतां धाबळी व तांब्या घेऊन मैल अर्धामैल दूर असलेल्या नदीवर जाई. तो ६॥ वाजतां स्नानसंध्या आटपून देवळांत येई व श्रीगणपतीच्या मंदिरांत जाई.तेथें गाभाऱ्यांत त्याची बसायची जागा ठरली होती तेथें जाई. बसायचा पाट, मागें टेंकायला पाट, व पुढें पाटपूजासाहित्य ठेवून तो गणपतीची पूजा करी व पूजासमाप्तीनंतर ७॥ वाजतां पाटावर आसनावर जो निश्चळ बसे तो १२॥ वाजेपर्यंत शरीर यत्किंचितही न हालवतां सारखा पांच तास एखाद्या

पुतळ्यासारखा अगदीं अचळ बसे ! साडेबाराला स्वारी देहावर येई व मग आरती करून पडवींत जाई. तेथें १॥ च्या सुमारास दूध, केळीं, खजूर, दाणे यांपैकीं जें असेल तें खाऊन दुपारीं २।-२॥ च्या सुमारास अर्धा तास तो ब्राह्मण वामकुक्षी करी. नंतर ४।-४॥ वाजेपर्यंतच पडवींतच इकडे तिकडे कांहीं कामकाज करीत व तोंडानें कांहीं गुणगुणत असे व नंतर ४॥ ला पुन्हां पहांटेप्रमाणें धाबळी वगैरे घेऊन तो नदीतीराला जाई व सायंस्नानसंध्या आटोपून पुन्हां ७॥ ला गणेशाच्या गाभाऱ्यांत आसनावर जी बैठक घाली ती रात्रीं १२॥ वाजेपर्यंत निश्चळ असे. याप्रमाणें २४ तासांपैकीं १० तास ‘ शुचौ देशे प्रतिष्ठाप्य स्थिरमासनमात्मनः ’ तो ब्राह्मण ध्यानधारणासमाधियोगांत गुंग असे.

४. त्या ब्राह्मणाचा हा नित्यक्रम मीं चार दिवस सतत असा पाहिला व त्याचा असा नित्यक्रम तीन वर्षें चालू असल्याचें गांवकऱ्यांनीं सांगितलें. दरमहा त्याचेकडे पांच रुपये कोठूनसे येत. यापेक्षां त्याची माहिती कोणासही जास्त नव्हती. मी चवथे दिवशीं रात्रीं त्या ब्राह्मणाची ती ध्यानस्थमूर्ति १२॥ वाजेपर्यंत न्याहाळून पाहिली व नंतर तो बाहेर येतांच त्यास साष्टांग नमस्कार घातला आणि उभा राहून हात जोडून म्हटलें, “ महाराज, आपल्या दर्शनाचा लाभ आज चार दिवस येथें होत आहे. एक प्रश्न विचारावयाचें मनांत फार आहे, आज्ञा होईल तर विचारतों.” त्यांनीं माझ्याकडे नीट रोखून पाहिलें व प्रसन्न चित्तानें होकार देतांच मी त्यांस विचारलें, “ आपलें पूर्वचरित्र समजावें व आपणांस या मार्गांत पडावयाची बुद्धि कशी झाली तें समजावें एवढीच इच्छा आहे.” यानंतर त्यांनीं मोकळ्या मनानें आपली हकीकत पाव तासांत सांगितली. मध्येंच कांहीं प्रश्नोत्तरें झालीं.

प्रश्नः—आपणांस पेन्शन मिळतें म्हणतां पण आपलें वय पेन्शनाइतकें दिसत नाहीं.

उत्तरः—माझें वय किती असावेंसें तुम्हांला वाटतें ?

प्रश्नः—अडतीस चाळीसच्या आंत असावें.

उत्तर—नाहीं. मला अठ्ठावन्नावें वर्ष आहे ! माझी प्रकृति निकोप आहे. जन्मांत देहाला दुखणेंबाणें ठाऊक नाहीं. नियमितपणांत मी वाढलों आहें.

**प्रश्न**—हा एवढासा आहार पुरतो कसा ? कमी खाऊन अशक्तपणा येत नाहीं काय ?

**उत्तर**—लोकांत पुष्कळ भ्रम आहेत त्यांपैकींच हा एक भ्रम आहे. लोक जें अन्न खातात त्यांतलें तीन चतुर्थांश अन्न ते उगीच खातात. तुम्ही रोज खातां इतकें अन्न शरीरवर्धनाला मुळींच नको असतें. त्याचा चवथा हिस्सा अगदीं पुरें आहे. तुमच्या अत्याहारामुळें डाक्टरांचे धंदे चालले आहेत. 'युक्ताहारविहार' हा नियमितपणाचा दीर्घायुष्याचा व सुखाचा ओनामा आहे.

**प्रश्नः**—पेन्शन कोठून येतें ?

**उत्तरः**—मला दोन मुलगे आहेत. एक डेक्कन कालेजांत शिकत आहे व दुसरा नूतन मराठी विद्यालयांत शिकतो. मी बी. एन. रेल्वेवर सरकारी नोकर होतों. मला ८० रुपये पगार मिळे. मला बाळपणापासून गणपतीची उपासना आहे. मी चिंचवड व मोरगांव येथें बाळपणीं कांहीं दिवस राहिलों होतों. नोकरी करीत असतांना नोकरीच्या वेळेशिवाय मी दोनचार तास स्नानसंध्या पूजादिकर्मांत घालवीं; पण कांहीं साधनमार्ग मला लागला नव्हता. ७।८ वर्षांपूर्वीं माझी बायको वारली.तेव्हां मी संसारांतून सुटलों असें वाटून पेन्शन घेतली. वडील मुलाच्या स्वाधीन सर्व इस्टेट केली. पेन्शनही तोच घेतो. मी फक्त पांच रुपये येथें मागवतों व ते मला पुरतात.मुलांना मी सांगितलें कीं, 'आजपासून मी तुम्हांला मेलों व तुह्मी मला मेलांत, मी इतःउप्पर केव्हांही मागे प्रपंचाकडे पाहणार नाहीं. तुमचे प्रारब्ध तुह्मांला तुमच्या बऱ्यावाईट कर्मानुरूप नेईल तिकडे जा. नास्तिकपणांत शिरूं नका, व कसल्याही प्रसंगीं सदाचार सोडूं नका. एवढाच माझा तुम्हांला शेवटचा निरोप आहे.' यानंतर मी नर्मदा प्रदक्षिणा करण्यासाठीं निघालों. मी तीन साडेतीन वर्षें ही प्रदक्षिणा केली.

**प्रश्न**—वाटेंत तुह्मांला कोणी साधुसंत भेटले काय ?

**उत्तर**:—कोणी तरी महात्मा भेटावा हा तर माझा त्यांत मुख्य हेतु होता. नर्मदामाईच्या सेवनांत माझी ही इच्छा सफळ झाली. मला माझे सद्गुरु तीन वर्षांनीं भेटले. त्यांनीं प्रथमभेटींतच माझी पूर्वीची सर्व हकीकत सांगितली ! महात्मे अंतर्ज्ञानी असतात, व त्यांना अज्ञेय असें ब्रह्मांडांत कांहींच नाहीं, असो. गुरूंनीं मला उपासना दिली.

**प्रश्न**:—ती कशी दिली ?

**उत्तर**:—मी हें तुम्हांला सांगूं शकत नाहीं. तुम्हांला स्वतः गुरुदर्शनाचा योग येईल तेव्हां कळेल. उपासनाप्रकार फार पवित्र व गूढ असतात. ते गुरूवांचून कोणीं कोणाला सांगूं नयेत.

**प्रश्न**—आपल्या गुरूचें नांव काय ?

**उत्तर**:—तें मी आपणांला सांगत नाहीं. माझे गुरु नर्मदातीरींच राहतात. मी एक दीन पामर आहे. मला माझे गुरु परमप्रिय आहेत, पण तेहि आपणास साधकच म्हणवितात. त्यांचे गुरु हिमाचलावर आहेत. त्यांच्या आज्ञेनें त्यांचा नर्मदातीरीं १२ वर्षे वास होणार आहे. ते परिपूर्ण आहेत. पण माझे गुरुही मला परिपूर्णच वाटतात. त्यांच्या आज्ञेनें मला येथें ५ वर्षें रहावयाचें आहे. ३ वर्षें झालीं. आणखी दोन वर्षांनीं मला गुरुमहाराजांकडे जावयाचें आहें. त्यांचे मजवर अनंत उपकार आहेत, तें मी वाचेनें काय बोलून दाखवूं ? त्यांनीं सांगितलेलें साधन मी करीत आहें.

**प्रश्न**:—तें कोणतें ?

**उत्तर**:—तें मला सांगतां येत नाहीं. मागचें प्रपंचपाश सोडल्याशिवाय तें ऐकून तरी तुम्हांला काय करावयाचें आहे ?

यापुढें त्यांची बोलायची इच्छा दिसली नाहीं, तेव्हां त्यांच्या सतेज मुद्रेकडे पाहून व त्यांना सादर वंदन करून मी मागें वळलों. पन्नाशीच्या वयांत मागचे सर्व प्रपंचपाश सोडून ईश्वरप्राप्तिसाठीं घराबाहेर पडल्याखेरीज खरा साधनमार्ग हातीं येत नाहीं असें मनांत आलें.

———

# ४ मामामामींचा संसार.



१ साधुत्वाचें लक्षण करणें कठिण आहे. 'वस्तूसि वर्णिलें न वचे। तेंचि स्वरूप संतांचें' म्ह० परब्रह्म जसें अनिर्वचनीय आहे तसेंच संतही अनिर्वचनीय आहेत असें समर्थांनीं म्हटलें आहे. आपण स्वतः साधु झाल्याशिवाय साधुत्व कळत नाहीं असें तुकोबा म्हणतात. असें आहे तरी "संत आनंदाचें स्थळ। संत सुखाचि केवळ। नाना संतोषाचें मूळ। ते हे संत ॥ १६ ॥ संत विश्रांतीची विश्रांती। संत तृप्तीची निजतृप्ती। नातरी भक्तीची फळश्रुती। ते हे संत ॥ १७ ॥" (दासबोध द. १ स. ५) इत्यादि प्रकारें त्यांना ओळखावयाची खुण संतांनींच दाखवून ठवली आहे. संतपण दुर्मिळ आहे. त्रिगुणाच्या भोंवऱ्यांत सांपडलेले, त्रस्त झालेले जीव अनेक वेळां संतांना धुंडाळायला बाहेर पडतात, पण कांहीं अंशीं भोंदूंच्या ठकबाजीपणामुळें व कांहीं अंशीं स्वतः-च्या अश्रद्धेमुळें खऱ्याखोट्याची निवड करणें बहुतेकांस कठिण जातें. पुष्कळ ठिकाणीं साधु म्हणून वावरणाऱ्या लोकांत लबाड किंवा कच्चे लोकांचा भरणाच अधिक सांपडतो, म्हणून अनेक लोक फसून जातात व हिरा म्हणून पदरांत घेतल्यावर ही गार आहे असें आढळून येतें. बहुतेक जीव कच्चीं मडकींच असतात, पक्कें भाजून निघालेलें मडकें क्वचित् आढळतें. म्हणून तुकोबासारख्यांनीं सुद्धां 'नीरें कोणापाशीं होय एक रज। तरी द्यावें मज दुर्बळाशीं' म्ह० खरें ब्रह्मज्ञान कोणा-पाशीं एक रजभर असलें तरी माझ्या पदरांत टाका अशी याचना केली आहे. कनक, कांता व प्रतिष्ठा या तीन महामोहाच्या खळग्यांतून सुखरूपपणें परतीराला गेलेला महात्मा 'मनुष्याणां सहस्रेषु' एखा-दाच सांपडायचा. 'विरळा ऐसा कोणी। तुका त्यासी लोटांगणीं'

२. पुष्कळदां असा अनुभव येतो कीं, गुरुजी, बोवाजी, महाराज, साधुजी म्हणून मिरवणाऱ्या लोकांपेक्षां साधुत्वाचे गुण कांहीं सांसारि-

कांच्या अंगींच विशेष तऱ्हेनें बाणलेले आढळतात. प्रपंचपरमार्थाचा विरोध नाहीं असें असे पुरुष पाहिले म्हणजे वाटतें. चित्तांत हरि, मुखांत नाम व कृतींत सदाचार असेल तर प्रपंचच परमार्थ होतो व हे नसतील तर परमार्थही प्रपंच होतो. प्रपंच काय किंवा परमार्थ काय त्याचें बीज बाह्य सृष्टींत नसून आपल्या चित्तांत आहे. वासना शुद्ध असेल तर ' स्त्रीपुत्र बंदीजन । नारायण स्मरवीती ' म्ह० स्त्रीपुत्र व सेवक हेही आपल्या नारायणपरतेला साह्यच करतात व हेच आपले गुरु होतात, आणि वासना दुष्ट असेल तर गुरुही गुरुपद देण्यास असमर्थ होतात. म्हणून समर्थांनीं ह्मटल्याप्रमाणें 'हें अवघें आपणापाशीं । येथें बोल नाहीं जनांशीं । शिकवावें आपुल्या मनाशीं । क्षणक्षणा ॥ "

३. सुमारें २० वर्षांपूर्वी कॉलेजचा अभ्यास करीत असतांना एक सत्पुरुष मला येथें पुण्यांतच आढळला. त्याचें नांवगांवही कोणास माहीत असणें शक्य नाहीं. तो अगदीं अप्रसिद्ध होता, स्टेशनावर त्याला नौकरी होती. दरमहा ४० रुपये पगार होता. अगदीं गरीब मनुष्य. बायको, आपण व दोन अशींच आप्तपणांतलीं मुलें अभ्यासासाठीं जवळ केलेलीं, एवढा त्याचा परिवार होता. इंग्रजी चार बुकें शिकला होता.संस्कृत येत नव्हतें. मराठी पोथ्या पुराणें भाविकपणानें वाचायचा छंद होता. पण त्यांतील तो जें वाची तें ' विश्वासें आदरें ' वाची. सकाळीं ६ वाजतां उठल्यावर प्रातर्विधि आटोपून देवासमोर बसून प्रातःस्मरण करायचें, अर्धा तास मंडईत जाऊन यायचें, नंतर स्नान, पूजा, ब्रह्मयज्ञ, आरती, पोथीवाचन, नैवेद्यवैश्वदेव करून जेवण करायचें व दहा वाजतां नौकरीवर जायचें. सायंकाळीं कचेरींतून आल्यावर क्षणभर मंडळीशीं परिमित बोलून आरतीधुपारती करायची, व नाथभागवताच्या तीनचारशें ओंव्या वाचून झोंपीं जायचें. असा त्याचा नित्यक्रम असे. आम्ही त्यास ' मामा ' व त्याच्या स्त्रीस अर्थातच ' मामी ' म्हणत असूं.

४. हा मामामामींचा जोडा खरोखरीच लक्ष्मीनारायणासारखा घरांत सुखानें नांदत होता. मामी ' अशिक्षित ' होती; पण ह्या

मामामामीसारखा सुंदर, निष्पाप व आनंदी जोडा विरळच पहायला मिळतो. त्यांचें परस्परांवर अत्यंत प्रेम असे, पण त्या प्रेमांत अवाचीन छचोरपणाचा लवलेश नव्हता. त्यांचें प्रेम पहाणाराच्या सहज लक्ष्यांत येई, पण त्याला वाचा फुटली नव्हती. हिंदुसमाजांतलें पतिपत्नींचें प्रेम वाचाळ नसतें. मौन हीच त्याची भाषा. आणि कोणत्याही प्रेमाची खरी भाषा मौन हीच आहे. हें दंपत्य कधीं हातांत हात घालून हिंडायला गेलें नाहीं. नाटक त्यानें कधीं पाहिलेंच नाहीं. प्रेमपत्रें लिहिण्याची कला त्याला अवगत नव्हती. मामींच्या हातांत मीं कधीं बुक पाहिलें नाहीं, पण मामींच्या अंगचे गुण इतके उज्ज्वल होते कीं 'सुशिक्षित' बायांनीं ते त्यांच्या चरणापाशीं बसूनच शिकावेत. दोघांच्याही मुखांतून अपशब्द तर काय, पण कठोर किंवा अविनीत शब्द मीं उभ्या २ वर्षांत कधीं बाहेर पडलेला ऐकला नाहीं. यथाशक्ति दुसऱ्याच्या उपयोगीं पडायची व न बोलतां झीज सोसायची दोघांचीही प्रवृत्ति होती. बायकोनें कोणा अडल्या गांजलेल्यास चोळी, दाणे किंवा पैसे दिले तर नवऱ्यानें ते हंसून मान्य करावयाचें व नवऱ्यानें परोपकारांत कांहीं खर्च केल्यास बायकोस सांगायचें. दोघांच्या चित्ताची पूर्ण एकात्मता होती. 'धुसफूस' हा काय पदार्थ आहे हें त्यांस माहीत नव्हतें. मामीसारखी धर्मपत्नी पुण्यवंतासच मिळते. 'अनुकूला, विमला, कुलजा, कुशला, सुशीला' अशी पंचलकारा भार्या पुरुषाला पुण्योदयानेंच मिळते असें एका संस्कृत सुभाषितांत म्हटलें आहे. पतीच्या धर्मकार्यास मदत करणें व सर्वतोपरी त्याशीं अनुकूलतेनें वागणें हेंच हिंदु स्त्रिया आपलें परमपवित्र कर्तव्य मानतात व यांतच त्यांना सद्गति मिळते. 'पतीचिया मता । अनुसरोनि पतिव्रता । अनायासें आत्महिता । भेटेचि गा' असें श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीं म्हटलें आहे. मुक्तेश्वर भारतांत (वनपर्व अ० ७) म्हणतात:—

तापत्रयनिवारणाचें छत्र । भार्येपरता नाहीं मित्र ॥....॥ ८७ ॥
भार्या सकळ श्रमांतें हर्ती । भार्या सकळ सुखांतें कर्ती ।
भार्या पवित्र वंशधर्ती । यशकीर्ति स्त्रीसंगें ॥ ८८ ॥

असा हा धर्मपत्नीचा अधिकार थोर आहे व तो थोर पुरुष जाणून धर्मसहकारित्वाच्या नात्यानें–विषयासक्तीनें नव्हे–तिजशीं प्रेमभावानें वागत असतात. असो. मामामामींच्या वागण्यांत हाच प्रकार होता. पूजासाहित्य मनोभावानें करून देणें, नवरा देवपूजेंत किंवा पोथी वाचण्यांत गुंगला असतांना शरीरानें संसारकाम करीत असूनही कान व मन तिकडे गुंतवणें, तुळशीची व गोपाळकृष्णाची पूजाप्रदक्षिणा केल्याशिवाय अन्नग्रहण न करणें, आतिथ्यधर्म पुण्यकर्म या भावानें पाळणें, एकांतांत देवाची व संतसंतींचीं प्रेमळ गाणीं मनाशीं गात देवाचें भक्तिसुख भोगणें हा मामींचा नित्यक्रम असे.

४. एके दिवशीं मामा नित्याप्रमाणें नोकरीवर गेले असतां घरीं मामींचा एक ३०० रुपये किंमतीचा दागिना हरवला. घरीं मामींनीं व इतरांनीं तो शोधशोध शोधला, पण कांहीं सांपडला नाहीं. मामींना अर्थातच वाईट वाटलें. पुण्याच्या वस्तींत ४० रुपये दरमहा मिळवणाऱ्या कुटुंबवत्सल मनुष्याला ३०० रुपये शिलकेंत टाकून एवढा डाग करावयाला किती वर्षें लागतील याचा अनुभव पुणेकरांना आहेच. गेलेला डाग पुनः मिळणें दुरापास्तच. सायंकाळीं मामा घरीं आले तेव्हां कपडे उतरून झोंपाळ्यावर बसले. रोज यजमान घरीं आले म्हणजे ५।७ मिनिटांतच मामी दाराआड येत व मंदस्मितानें त्यांचा सत्कार करीत. पण आज १५ मिनिटें झालीं तरी मामी दिसल्या नाहींत तेव्हां सहज मामांनीं चौकशी केली. आंतून रडण्याचा सूर ऐकूं आला, तेव्हां मामा उठले आणि आंत गेले. मीही बरोबर होतोंच. ‘लक्ष्मण ! काय प्रकार आहे रे !’ म्हणून मामांनीं विचारलें व मीं सर्व हकीकत सांगितली. मामी उठून उभ्या राहिल्या, त्यांना जास्तच हुंदका आला. तेव्हां मामा अगदीं सहजपणाच्या शांत स्वरानें म्हणाले, ‘एवढेंच ! मग त्यासाठीं रडायला कशाला पाहिजे ! घरांत शोध केला ना !तर मग आपलें काम झालें. आपली वस्तु असेल तर मिळेल. देवाची मर्जी नसेल तर मिळणार नाहीं.’ इतकें बोलून मामा परत झोंपाळ्यावर बसले व त्यांच्या तोंडून ‘आपुलें जें साचें। हें कल्पांतींही न वचे। हें जाणोनि गताचें।

न शोची जो ॥' ही ज्ञानेश्वरीची ओंवी आली. मामा विवेकी खरे. पण त्यांच्या मनाला तरी आंतून खेद वाटला असेल असें मनांत येऊन मी मामांची वृत्ति शोधीत होतों. पण मामांच्या तोंडून झालेल्या हानीबद्दल पुनः चकारशब्द निघाला नाहीं, इतकेंच काय पण मामांचा नित्यक्रम रोजच्या सारखा शांतपणानें सुरू झाला. मामा थोडें वाचीत, निवडक ४।२ साधूंचे ग्रंथच वाचीत, पण जें वाचीत तें त्यांच्या अंगीं पूर्ण भिनून गेलें होतें. पुष्कळ खाऊन न पचविण्यापेक्षां थोडें खाऊन पचविणें अनंतपटीनें श्रेयस्कर होय हा नियम ज्ञानभोजनालाही लागू पडतो असें मामांचें आचरण पाहून माझ्या नेहमीं मनांत येतें. भाषेची व समाजाची विद्याविषयक वाढ पुष्कळ ग्रंथ झाल्यानें होते असें कोणी समजतात पण तें बरोबर नाहीं. थोडे पण उत्तम ग्रंथ भाषेंत निर्माण होणें हेंच समाजाचें सुदैव होय. ज्ञानेश्वरी, नाथभागवत, दासबोध व तुकोबाचे अभंग हे मराठी भाषेंतले चार वेद आहेत व यांतील ज्ञान लक्षावधि लोकांना सुमार्गाला लावणारें व सद्गति देणारें आहे यांत संशय नाहीं. नाथभागवताच्या ओंव्या वाचतांना मामांच्या डोळ्यांतून अश्रूंच्या धारा लागत. ज्ञानोबातुकारामांचें किंवा समर्थांचें नांव निघालें कीं ते सद्गदित होत. चतुर्मास रात्रीं ते महिपतबावांचे ओंवीबद्ध ग्रंथ वाचीत व ते ऐकावयास मामी दूर अंतरावर बसत. मामांचें अंतःकरण जसें कोमल होतें तशीच त्यांची वाणीही मधुर होती. मामामामींचें जोडपें आपल्या शुद्ध भावनेच्या आनंदांत नेहमीं इतकें गर्क असे कीं जगांतील कुटिलपणाचा, दुष्टपणाचा व स्वार्थपरायणतेचा वाराही त्यांच्या सात्विक मनाला शिवला नव्हता. ज्या लहान वर्तुळांत मामांचा संचार असे त्यांत ते सर्वप्रिय होते. आपल्या आफिसांत ते आपल्या कामाचा बोजा कोणावरही सहसा पडूं देत नसत, पण सर्वांचें पडलेलें काम करण्यांत त्यांचा पहिला पाय असे. हा गुणही दुर्मिळ आहेच; पण अशा तऱ्हेनें दुसऱ्याचीं कामें करीत असूनही त्या कर्मकर्तेपणाची स्फूर्तिही मामांच्या चित्तांत नसे. हा अध्यात्मदृष्टीचा विशेष गुण मामांच्या अंगीं असे. ' जो अंतरीं दृढ । परमात्मरूपीं गूढ । बाह्य

तरी रूढ । लौकिक जैसा ॥ ' ही ज्ञानेश्वरींतील ओवी वाचतांना मला मामांचें स्मरण होत असतें.

५ असो. कांहीं वर्षांनंतर मामी वारल्या. त्यांच्या मृत्युशय्येजवळ बसून मामा शांतपणानें गीताविष्णुसहस्रनामाचे पाठ म्हणत बसले होते. ' ही मृत्युलोकची वस्ती आहे, सर्वांस जाणेंच आहे. खेद करण्याचें कारण नाहीं. ' असें मामा त्या प्रसंगीं शांतपणानें म्हणाले.

६ मामांचे ३०० रुपये एकदां एकानें बुडविले. मामा त्या गृहस्थास तर एक शब्द कधीं बोलले नाहींतच, पण मजजवळ एकदां म्हणाले; " मला त्याचें पूर्वजन्मीचें देणें असलें तर मी त्याच्या ऋणांतून मुक्त झालों. नसलें तर पुढच्या जन्मीं अडचणीच्या वेळीं त्याला माझी रक्कम परत करावी लागेल. एवंच यांत माझें नुकसान नाहींच. "

---

६

वैष्णवसंत श्रीरामानुजस्वामी यांनीं आपल्या शिष्यांस शेवटचा उपदेश केला तो असाः—" जन त्रिविध आहे. अनुकूल ह्म. ईश्वरोन्मुख, प्रतिकूल ह्म. ईश्वरपराङ्मुख व अनुभय ह्मणजे दोहींकडे नसणारे ! ह्म. **भक्त नास्तिक व संसारी** असे तीन प्रकारचे लोक आहेत. भक्तांची गांठ पडली, तर आनंदानें नाचा, हे आपले सखे आहेत असें म्हणून त्यांना प्रेमानें भेटा, त्यांच्या संगतींत हरीला लुटा, भक्तिला लुटा, व भक्तिसुखानें तन्मय व्हा. **नास्तिक** भेटला तर अग्नि व सर्प यांना भिऊन दूर सरतां तसें दूर व्हा; त्याचें दर्शनसंभाषण सुद्धां वर्ज करा. केवळ **संसारी** भेटले तर हे स्तंभ किंवा पाषाण आहेत असें समजून पुढें चालूं लागा. कांहीं ओलावा आढळला तर हरीच्या कथा सांगून त्यांस हरिभजनाचा छंद लावा. धनकामिनीछंदानें हे हरिविमुख झाले आहेत ह्मणून त्यांजवर दया व प्रेम करा, "

# ५ सती आवडाबाई.



१ रानावनांतून कैक सुगंधी सुमनें विकास पावतात आणि मनुष्यांनीं उपभोगिल्याशिवाय अगर मंदिरांत देवाच्या शिरीं पडल्याशिवाय सुकून जातात; अथवा पहिल्या प्रतीचीं अत्यंत तेजस्वी मौक्तिकें शतकानुशतकें समुद्राच्या तळीं विखुरलेलीं असून मनुष्याला त्यांचें दर्शनही होत नाहीं; त्याप्रमाणेंच जगाच्या इतिहासांत न झळकलेलीं किंबहुना सभोंवारच्या मनुष्यांस यत्किंचितही परीक्षा न झाल्यामुळें पूर्णपणें अज्ञात राहिलेलीं अशी कैक नररत्नें मनुष्ययोनींत जन्मास आलेलीं आहेत. प्रसिद्धी सर्वांच्याच वांट्याला येते असें नाहीं. जगाच्या बाजारांत कैक खोटे मोती खऱ्याच्या भावानें विकले जातात आणि कैक खऱ्या मोत्यांना बाजाराचें तोंडही दिसत नाहीं ! लोकगंगेच्या पृष्ठभागावर हलके पदार्थ तरंगतात आणि वजनदार पदार्थ तळाशींच राहतात, त्याप्रमाणें मनुष्यजातीला भूषणीभूत होणारे खरे हिरे व मनुष्यांचें खरें कल्याण करणारे महात्मे मानवांना समजूनही येत नाहींत व अर्धवटांचा ते उदोउदो करीत सुटतात असें लॉर्ड बेकननें म्हटलें आहे. ह्या म्हणण्यांत बराच तथ्यांश आहे असें वाटतें. रत्नाची परीक्षा जगाला झाली नाहीं तरी रत्न तें रत्नच, त्याच्या अंगची प्रभा तें कोठेंही पडलें तरी कमी होत नाहीं. सुंदर व सुवासिक पुष्पाचा कोणी उपयोग करून घेतला नाहीं म्हणून त्या पुष्पाची त्यांत काय हानि आहे ? वस्तूचा चांगुलपणा हा स्वतःसिद्ध आहे, त्यांत ईश्वराचा अधिवास आहे आणि तिचा खरा उपभोक्ता तिला निर्माण करणारा परमात्माच आहे.

२ हे विचार मनांत येण्याचें कारण २५ वर्षांमागें समक्ष पाहिलेल्या एका सतीचें चरित्र होय. ही सती प्रसिद्ध नाहीं, तिची देवभक्ति कोणाला कळलेली नाहीं, तिचें हें चरित्र तिच्या आप्तेष्टांच्या

वाचण्यांत आलें तर त्यांना नवलही वाटेल, पण हें सच्चरित आहे आणि मुमुक्षूंनीं गाण्याइतकें दिव्य आणि पावन आहे. अर्वाचीन किंवा प्राचीन साधुंचीं चरित्रें अनेक कवींनीं व चरित्रकारांनीं गायिलेलीं सांपडतात, पण वर्तमानकाळीं आणि साधु म्हणून ज्यांच्या नांवाचा डांगोरा पिटलेला नसतो अशा संसाररत स्त्रीपुरुषांत जें साधुत्व असतें तिकडे फार करून कोणाचें लक्ष जात नाहीं. माझ्या आयुष्यमार्गांत आढळलेल्या अशा पवित्र सज्जनांचे चरित्र मधुनमधून देण्याचा माझा विचार आहे.

३ इ. स० १८९४ चा मे महिना. आमच्या फर्ग्युसन कॉलेजास सुट्टी असल्यामुळें मी मावळांत माझ्या बहिणीच्या घरीं गेलों होतों. खेडेगांवचे हवापाणी, भोंवतालचे डोंगर, आंबे, करवंदें, तोरणें इ० वन्य फलांचा मोसम, तारुण्यांत वनश्री पहात दिवसभर रानांत फिरण्याची हौस, प्रियभगिनीचा सहवास व पाहुणचार यामुळें माझा सुट्टीचा काळ बहुतेक तेथेंच मोठ्या आनंदांत गेला. एक दिवस गोदुताई व मी सकाळीं ९ च्या सुमारास माजघरांत गोष्टी करीत बसलों असतांना मागच्या दारावरून एक बाई सहज गेली. अत्यंत गौरवर्ण, नाकाडोळ्यांनीं नीटस, फार सुंदर, पांढरें स्वच्छ पातळ नेसलेली, सतेज आणि प्रसन्न मुद्रेची अशी ती स्त्री खालीं पहात मंदगतीनें चालली होती. डोळ्यांसमोर क्षणैक वीज चमकावी तशी तिची कांति भासली. पाहतांच पुरुषाच्या मनांत निमिषार्ध तरी कामवृत्ति उठावी अशी ती विलासिनी नव्हती. तिचें अनुपम सौंदर्य पहातांचः—

न प्रभातरलं ज्योतिरुदेति वसुधातलात् ।

ह्या कालिदासोक्तीप्रमाणें त्या सौंदर्याला शोभा देणारी तिची उज्ज्वल पवित्रता पाहणाऱ्याच्या मनांत तिच्याविषयीं पूज्यभावच उत्पन्न करी. केवळ देहसौंदर्य कामाचा उठाव करील, पण त्या देहसौंदर्यालाही खुलविणारें आत्मसौंदर्य असेल ह्म० आत्मा स्वच्छ, निष्पाप, पवित्र असेल तर प्रेक्षकाचेंही मन कामविकारानें गढूळ होत नाहीं. पवित्र आत्मा आपल्या पावित्र्याची छाप पाडून क्षुद्र मनोदौर्बल्य पळार्धांत नष्ट करूं

तुका म्हणे तुझी नलगे दसोडी, परि आहे आवसि दर्शनाची ॥ ४ ॥

हीं निष्कामभजनाची पराकाष्ठा आहे. ही कोटी आवडाबाईनें विशींतच गांठली.

मरणहि हित मानुनि जी टाकी स्वप्नीं न वांकडा पाय ।
व्यंग पतीचें मनिंही नाणीं मग उद्धरील ती काय ? ॥५॥

५. आवडाबाई २४ वर्षांची झाली. तिच्या संसारांत काय व्यंग आहे याची कुणकुण तिच्या आईच्या कानावर गेली. तिनें मातृप्रेमानें एकवार तिला खोदखोदून विचारलें. या सतीनें तिचें सांत्वन केलें. ती म्हणाली, " आई ! त्यांत आहे काय मोठें ? एक सुख नसलें म्हणून काय झालें ? देवाचें नामस्मरण करीत असतांना मला माझ्या सुखांत कांहीं कमतरता आहे असें वाटत नाहीं, मला कधीं कल्पनाही येत नाहीं. देवानें आपल्या प्रारब्धाप्रमाणें आपल्याला जी स्थिति दिली आहे तींतच त्याला स्मरून आनंदानें रहावें हें मला ठाऊक आहे. " आईला रडूं आलें, तिनें कन्येला पोटाशीं धरिलें व म्हणाली, ' बाई ! तूं धन्य आहेस. माझ्या करंटीच्या पोटाला कशाला आलीस ? तुझ्या रूपाची माती झाली. ' आवडाबाईनें उत्तर केलें, ' आई ! तूं आपल्याला करंटी म्हणून घेऊं नकोस. तुम्हां पुण्यवानांच्या पोटीं मीं जन्माला आलें ह्मणून मला देवरायानें जवळ केलें. तूं माझ्यासाठीं दुःख करूं नकोस, मी दुःखी नाहीं, मी सुखी आहें. तुझें सौभाग्य आहे, मुलगे आहेत, तूं भाग्याचीच आहेस. ' आई म्हणाली, 'बाळे ! तूं म्हणतेस तें खरें आहे, पण तुझ्या मांडीवर मूल खेळतांना पाहण्याचें माझ्या नशींबीं नाहीं ! ' पुन्हां आवडाबाई म्हणाली, ' आई ! मला मुलांचें कांहींच वाटत नाहीं. गरीबगुरीब, आंधळेपांगळे, अतीतअभ्यागत यांचा परामर्ष घेतांना मी माझ्या मुलांलेंकरांतच नांदत आहें असें मला वाटतें. ' हें उत्तर ऐकतांच त्या प्रेमळ आईच्या तोंडून ' देवता ग माझी देवता आहेस. ' असे शब्द स्फुंदत स्फुंदत निघाले व ती खरोखरच आपल्या आवडीचे पाय धरायला धांवली !—

चंद्रापरि जरि तेजें रूपें परि ती कलंकहीन सती ।

सतिच्या सद्गुणगणनीं पुरतीसे सत्य अंकही नसती ॥६॥
द्रवुनी सदा जपे ती मातेपरि अंधपंगुथोट्यांना ।
दीनांच्या सेवेनें लाजवि ती फार कुचर खोट्यांना ॥७॥.

६ आवडाबाईच्या वयास ३० वर्षें पुरीं झालीं. त्यांच्या नित्यक्रमांत दिखाऊपणाचा परमार्थ कांहीं नव्हता. त्यांचें नामस्मरण इतक्या शांतपणानें व मनाशींच चाले कीं, तें सासूबाईला सुद्धां ऐकूं येत नसे. त्यांची वृत्ति समुद्रासारखी गंभीर होती, तिला हर्षशोकांचे हेलकावे बसतांना कोणास दिसले नाहींत. वृत्तीला डोल नाहीं अशी स्थिरता प्राप्त झाली होती. घरांतील लहानमोठीं कामें त्याच करीत. दिवसभर त्या कामांत गुंतलेल्या दिसत, पण त्यांचें मन रामांत गुंगलेलें असे. देह संसाराला व मन रामाला वाहिलेलें असे. आहार फार परिमित असे. आठवड्यांतून त्यांना चार उपास असत, आणि उपासाचे दिवशीं तोंड हालवायचें नाहीं असा त्यांचा नेम असे. ‘ लंघनचिकित्सेवर ’ त्यांनीं कांहीं ग्रंथ वाचले नव्हते, पण परमार्थबुद्धीनें लंघन होत असतांना शरीर तरतरीत, बुद्धि सतेज, इ० जे लंघनाचे फायदे विद्वान् लोकांनीं होतात म्हणून सांगितले आहेत ते त्यांना अनायसेच झाले. त्यांना रसनाजय साध्य झाला, निद्रा स्वाधीन झाली. देहधर्म, प्राणधर्म, मनोधर्म जिंकले गेले. बुद्धि निर्मळ झाली. आत्मारामाचें सौंदर्य शरीरावर पसरलें व मूळचें सुंदर रूप अधिक सुंदर पण निर्विकार झालें. पतीच्या सेवेंत व सासूच्या शुश्रूषेंत त्यांनीं कधींही अंतर पाडलें नाहीं. धोतराच्या चुण्या करून ठेवण्यापासून तो हातपाय रगडणें, आंथरूण घालणें वगैरे सर्व कामें निष्कामबुद्धीनें त्या करीत. निष्कामबुद्धि शिकविणारा तो त्यांना गुरुच झाला !

शृंगाररसीं साक्षात् बुध दुसरा या महीवरी गमला ! ।
साध्वी तन्वंगी स्त्री मिळुनीहि तिथें चुकोनि नच रमला ॥१॥

हा कुधगृह पति म्हणून त्यांना देण्यांत ईश्वरी योजना बरोबरच असली पाहिजे, ती चुकली असें म्हणण्याचा आपल्याला काय अधिकार आहे ? असो. परोपकाराची तर ती बाई मूर्तिच होती. कोणीही

याचक दारांतून विन्मुख गेला नाहीं. पुष्कळ वेळां त्या साध्वीनें आपल्या पानांतील अन्न भिकाऱ्यास संतोषानें व मधुर बोलून वाढावें व आपण अर्धपोटीं रहावें. आणि मौज ही यांत आपण कांहीं सत्कृत्य केलें आहे या वृत्तीचा विटाळही त्या निर्मळ मनाला शिवूं नये ! चांगल्या योग्यांनीं, ज्ञात्यांनीं व भक्तांनीं त्या बाईपासून मुकाट्यानें कांहीं शिकून जावें अशी तिची रहाणी नमुनेदार गृहस्थाश्रमाला शोभादायक अशी होती. मीं सातआठ वेळ त्यांना देवपूजेसाठीं फुलें तोडतांना पाहिलें. आई मुलांना जपते तशी त्या वृक्षवेलींना व तुळशींना जपत. बागेंत शिरल्या म्हणजे वृक्षवेलींनाही आई भेटायला आल्यासारखा आनंद होऊन त्या टवटवीत दिसत ! बागेंतलीं सुमनें त्यांच्या सुमनापासून परिमळ घेत असें वाटे. त्या बागेंतून फिरतांना पाहून वाटे कीं ही उपवनश्रीच मूर्त होऊन बागेंत संचार करीत आहे.

७ असो. आवडाबाईच्या सासूलाहि कळून चुकलें कीं नातू होऊन संसारचक्र यथापूर्व पुढें चालणें अशक्य आहे. ती फार उदास व दुःखी असे. सुनेचे अलौकिक गुण सासूंत नव्हते. ती चार आयाबायांपैकींच एक होती. सासुसुनांनीं एकमतानें ठरविलें कीं काशीयात्रा करायला निघावें. सासूपाशीं पांचशें रुपये होते ते तिनें बरोबर घेतले व दोघी निघाल्या. सासूनें चिरंजीवास विचारलें होतें, पण ‘ तुम्ही जा, मी येत नाहीं, मी आपला इथें गांवींच राहतों ’ असें म्हणून तो मागेंच राहिला. सासुसुना निघाल्या त्या मुक्काम करीत करीत नर्मदातीरीं येऊन एका धर्मशाळेंत उतरल्या. तेथें यात्रेकरू बरेच उतरले होते. तें नर्मदाबाईचें स्थान पाहून त्या दोघीही रमल्या व चारसहा दिवस तेथेंच राहिल्या. एके दिवशीं सायंकाळीं सासू सूनबाईशीं बोलत असतांना तेथें अकस्मात् त्यांचे चिरंजीव येऊन समोर उभे ठाकले ! दोघीजणी चमकल्या, व एकमेकींच्या तोंडाकडे पाहूं लागल्या. चिरंजीव म्हणाले, ‘ तुम्ही निघाल्यावर दोन दिवस मला अगदीं करमेना म्हणून मी तुमचा शोध काढीत आलों. ’ त्यांच्या आईला आनंद झाला, आवडाबाईच्या तोंडावर कांहींच चिन्ह उमटलें नाहीं. चिरंजीव जेवले व कांहीं वेळानें

झोंपीं गेले. आईला वाटलें ' बरें झालें, अगदीं दोघीच होतों, आतां तिसरी सोबत झाली. ' असो. मध्यरात्रीच्या सुमारास सासूसुना दोघी झोंपल्या. पांहाटे पांच वाजले, दोघी उठल्या. पाहतात तों स्वारी जागेवर नाहीं ! कुठें शौचाला गेला असेल अशा समजुतीवर राहिल्या. सहा वाजले, सात वाजले. त्याचे कपडेही दिसेनात. आठ वाजले. सुनबाईला शंका आली. त्यांनीं गांठोडें सोडून पाहिलें पण त्यांत काय ? तिचे सर्व दागिने व पैसे घेऊन स्वारीनें पोबारा केल्याचें स्पष्ट झालें ! सासू रडूं लागली, मुलावर तिनें लाखोली वाहिली. ती लिहिण्यांत मतलब काय ? दहा वाजले. बृहस्पतीनें गाठोड्यांत तीन रुपये सुद्धां ठेवले नव्हते ! प्रसंग जाणून आवडाबाईनें सासूस धीर देण्याचा प्रयत्न केला. दुपारची वेळ गुदरली कशीबशी. आतां परत फिरावें हेंच योग्य असा सासूनें सल्ला दिला. आवडाबाई म्हणाली, " आपण गांवापासून पुष्कळच लांब आलों आहोंत. आपल्याजवळ पैसे नाहींत. मग परत तरी जाणार कसें ? कोणाजवळ मागितल्याशिवाय म्हणजे उघड भिक्षा मागितल्याशिवाय आपल्याला कांहीं परत जातां येत नाहीं. भिक्षा मागणें जर जरूर आहे तर ज्या संकल्पानें आपण निघालों तो यात्रेचा संकल्प तरी पुरा केल्याशिवाय परत जाण्यांत अर्थ कोणता ? घरीं तरी कोणतें मोठें सुख वाढून ठेवलें आहे ? तें कांहीं नाहीं. काशीप्रयागगया करून गंगाबाईचीं स्नानें करूनच आतां परत फिरावें हें बरें. " सासूला हें म्हणणें पटलें नाहीं, कारण तिला अडचणींचें भय वाटलें. आवडाबाई धीर देत म्हणाल्या, " आपण कांहीं काळजी करूं नका. विश्वेश्वर सर्व चांगलें घडवील. मी आपल्याला अगदीं कष्ट पडूं देणार नाहीं. मला सेवा भरपूर करूं द्या. " आणि खरोखरीच त्या सतीनें स्वतः भिक्षा मागावी, धुणीपाणी करावीं, स्वयंपाक करून सासूला जेवूं घालावें, व स्वतः पायीं चालून पण दादाबाबा करून किंवा चार पैसे देऊन सासूला गाडींत बसवावें, रात्रीं तिचे पाय रगडावे. याप्रमाणें तें सासूचें देवतार्चन जवळ प्रेमानें बाळगून त्या माउलीनें ती सर्व यात्रा यथासांग केली आणि उभयतां सासू-सुना पावणेदोन वर्षांनीं परत

आपल्या गांवीं आल्या !.! बृहस्पति घरींच होते. आईच्या तोंडाचा पट्टा चालला, पण धन्य आवडाबाईची कीं, तिनें एका शब्दानेंसुद्धां नवऱ्याला कसलीहि ओळख दिली नाहीं ! तिची सेवा यथासांग चालली. सासूला मात्र सूनबाईची खरी किंमत कळून आल्यामुळें ती तिला अत्यंत प्रिय मानूं लागली. ज्याच्या त्याच्या जवळ ' ही माझी देवता आहे ' असेंच त्या म्हणत व तिचे सद्गुण वाखाणतांना त्यांच्या डोळ्यांतून प्रेमाश्रूंच्या धारा चालल्या नाहींत असें कधींच झालें नाहीं. ( ते बृहस्पति—आवडाबाईच्या पतीत्वाचा त्यांना मान मिळाल्यामुळें त्यांच्या गुणांचें वर्णन करून मी आपली लेखणी शिणवीत नाहीं. )

———

७

नारायणालाही भक्त आवडतात. पण ते मिळतात कोठें ! ' मनुष्याणां सहस्रेपु ' ते विरळ आहेत, पण आहेत मात्र खास. भगवंताला भक्त अत्यंत प्रिय ! देव ज्ञानेश्वरमुखानें ( अ. १२ ) ह्मणतातः—

" तयाचिया गुणांचीं लेणीं । लेवयूं आपुलिये वाणी ।
तयाची कीर्ति श्रवणीं । आम्हीं लेवूं ॥ २२२ ॥
तो पाहवा हे डोहळे । म्हणूनि अचक्षूसि मज डोळे ।
हातींचेनि लीलाकमळें । पूजूं तयातें ॥ २२३ ॥
दोंवरी दोनी । भुजा आलों घेऊनी ।
आलिंगावया लागुनि । तयाचें अंग "

८

आत्मवश, जितेंद्रिय व नारायणपर अशा संतांचा निजाचार हा आम्हां जीवांना उपदेशरूप असतो. सत्संग ही भवार्णवीची नौका आहे. व संत हे संसारसागरांतून पैल नेणारे गुरु कर्णधार आहेत.

# ६ योग्याची भेट.



गेल्या आठवड्यांत सातारा जिल्ह्यांतील एका संभावित वयोवृद्ध गृहस्थाची व आमची येथें अल्पकाळ संगती झाली. संवादप्रसंगानें त्यांनीं दोन सुंदर गोष्टी सांगितल्या त्या ऐकून झालेला आनंद आमच्या वाचकांसही द्यावा यास्तव त्या येथें देण्याचें योजलें आहे. गोष्टी काल्पनिक नसून प्रत्यक्ष घडलेल्या आहेत. आज योग्याची गोष्ट देऊन पुढें सतीची गोष्ट देऊं. सदर गृहस्थ ह्मणाले:—

सुमारें चार वर्षांपूर्वी साताराजिल्ह्यांत लिंब—गोवा येथें एक संन्यासी आले होते. हातीं कमंडलु, ढुंगाला लंगोटी, व अंगावर एक भगवें वस्त्र इतक्याच वस्तु त्यांजवळ असत. एकीकडे पाहत, एकीकडे बोलत. त्यांच्या बाह्य लक्षणांवरून हा कोणी तरी वेडा असावा असें बऱ्याच असामींचें मत झालें. मी त्यांच्या भेटीस गेलों तेव्हां प्रथम माझा असाच ग्रह झाला होता. पण प्रत्यक्ष भेटींत वेगळाच प्रकार दिसून आला. योगाविषयीं माझे संशय दूर झाले. खचित आम्ही माणसें एकमेकांविषयीं विनाकारण गैरसमज करून घेत असतों. ज्याच्या विरुद्ध बोलतों त्याच्याविषयीं आम्हांला कांहीं एक माहिती नसते. डोळस म्हणवितों पण आंधळ्यांच्या मालिकेंतले माणिच. मी नमस्कार करून संन्यासीबुवांस म्हटलें, " मी वानप्रस्थ असून आपला आश्रय आह्मांस पूज्य आहे. आपली कांहीं सेवा करावी म्हणून मी पांढरी घोंगडी आणली आहे हिचा आपण स्वीकार करावा. ' यावर स्वामी हंसले व म्हणाले, ' मला हिचें कांहीं कारण नाहीं व उपयोगही नाहीं. ' ' शय्याभूतलमजिनं वासः ' हें आमचें वैभव. ती परत घेऊन जा. ' मीं आग्रह केला पण स्वामींनीं घोंगडी घेतली नाहीं व कांहींच न घेण्याचें त्यांनीं निश्चयानें सांगितलें. मी त्यांना दूध देऊं केलें पण ते म्हणाले, ' दूध पय व जलही पयच आहे. कृष्णाबाईचें पय किती निर्मळ आहे, शुद्ध

आहे, पवित्र आहे. काय यांत त्यांत विशेष आहे!' असें म्हणून स्वामींनीं माझ्या डोळ्यांदेखत कमंडलूंतलें उदक हातावर घेतलें व मला हें घ्या म्हणाले. तें तोंडाजवळ येतांच पाहतों तों तें दूध! स्वादिष्ट रुचकर लागलें. पुन्हां मी कमंडलूंत पाहिलें तर पाणी व त्यांतून स्वामींनीं ओतून मला पाजलें तें पाणी! हा चमत्कार पाहून मी चपापलों व नारायणमहाराज केडगांवकरांच्या अशा गोष्टी मागें ऐकत होतों त्या मला तत्काळ खऱ्या वाटल्या. योगशक्तीनें पाण्याचें दूध होतें हें मीं समक्ष पाहिलें. नाथांनीं गोदावरीची घागर भरून आणली तों ती तुपाची झाली ही गोष्टही खरी तर!

यानंतर स्वामींना मीं म्हटलें 'आपण योगाचा अभ्यास चांगला केलेला दिसतो तर मला एक अपूर्व चमत्कार दाखवा.' स्वामींनीं मला एकांतांत नेलें व जमिनीपासून एक हाताच्या उंचीवर पंधरा मिनिटें स्वामी आसनस्थ स्थितींत राहिले! पंधरा मिनिटेंपर्यंत त्यांनीं आपलें शरीर कापसापेक्षांहि हलकें केलें होतें. हा अधांतरीं तरंगत राहण्याचा चमत्कार मी जन्मांत प्रथम पाहिला म्हणून मला फार आनंद वाटला. यानंतर मीं स्वामींस त्यांचें पूर्ववृत्त विचारिलें तें त्यांनीं मोकळ्या मनानें सांगितलें. स्वामी म्हणाले:—

मी मूळचा सुखवस्तु होतों. बापानें मला एक लाख रुपयांची इस्टेट ठेवली होती. शेतवाडी जमीन—जुमला चांगला होता. मळे, गुरेंढोरें पुष्कळ होतीं. मीं पंधरा वर्षांत दोन लाखांची इस्टेट केली. मी पहिल्यापासून नियमित असें. आहारविहारांत नेमस्तपणा. बोलणें थोडें. मात्र थोडा तापट होतों. स्वभावांत धर्मप्रीति होती. पण मी संसारांत असें तों मजकडून परमार्थाचा विशेष अभ्यास झाला नाहीं. जन्मभर निर्व्यसनी व परस्त्री माहीत नाहीं. कालांतरानें मुलाची मुंज निघाली. हा समारंभ पवित्र असून मी अंतःकरणपूर्वक सर्व विधि केला. बापानें गायत्रीमंत्राचा उपदेश मुलास करण्यापूर्वी स्वतः गायत्रीपुरश्चरण केलें पाहिजे, पण तें माझ्या हातून न झाल्यामुळें मला लज्जा वाटली. मीं मनाच्या समाधानासाठीं थोडा पर्याय काढला. एक

हजार ब्राह्मणांस पंचपक्वान्नाचें भोजन घालून पात्रीं रुपया दक्षिणा दिली. हेंच माझ्या संन्यासाचें कारण झालें. माझी बायको व मेहुणा यांनीं माझ्या उधळपट्टीबद्दल माझी खरड काढली. एकदा नाहीं, दोनदा नाहीं तर दहा वेळ! मी शुद्धभावानें सत्कर्म म्हणून जें केलें त्यानें माझ्या मनाला वैतागून सोडलें. सर्वांचा संतोष व्हावा म्हणून मी फार जपलों. माझे शेतकरी, कुणबी, माळी यांनाही मी प्रतारणा न करितां ब्राह्मणाप्रमाणें जेऊं घालून त्यांचा संतोष मिळविला; महारमांगही प्रसन्न झाले. सर्वांच्या संतोषार्थ पांच हजार रुपये खर्च केले. मेहुण्यानें मला पंचवीस रुपयांचा आहेर केला पण मी २०० रुपये त्याचे घरांत घातले. तरी त्यानें व माझ्या बायकोनें माझ्या उधळपट्टीबद्दल माझें कपाळ उठविलें. मनुष्यस्वभाव धनलोभी आहे. माणसाला जें धन मिळतें त्याचा दान आणि भोग या मार्गाकडे उदार मनानें व्यय करायला नको, धनाचा नुसता संचय पाहिजे! असो. मी त्यांना समजावून सांगितलें कीं 'लाख रुपयांची इस्टेट मी मिळविली आहे त्यांतून मुंजींत मीं हजार खर्च केले यांत वावगें काय केलें? पण त्यांचें समाधान झालें नाहीं. 'माझा दादा चांगली व्यवस्था पाहील, आपल्या खर्चाला आळा घातलाच पाहिजे' ही बायकोची रोज टकळी सुरू झाली. एकदा मीहि रागानें तिला म्हणालों, 'बरें तर, बोलाव आपल्या भावाला आणि चालवा संसार. मी आपला जातों.' तीहि चढेलपणानें म्हणाली, 'खुशाल जा. पहा मी संसार कसा करितें ती. दादा हुषार आहे तो सर्व पाहील!' मी पडत्या फळाची आज्ञा घेऊन संसार चित्तांतून पार काढून टाकला व घराबाहेर पडलों तों तडक आबूच्या पहाडावर गेलों!

आबूच्या पहाडावर चार महिने राहिलों. प्रथम संन्यास घ्यावा असें मनांत आलें. पण संन्यासी होऊन संसारी लोकांच्या दारीं तुकडे मोडायला जायचें मला लाजिरवाणें वाटलें. अन्न व वस्त्र यांशिवाय राहतां येईल असा अभ्यास म्हणजे योगाचा अभ्यास पूर्ण झाल्यावर संन्यास घ्यावा असें मनाशीं ठरविलें. नारायणाच्या कृपेनें योगाभ्यासांत पूर्ण

निष्णात असे सद्गुरु मला आबूच्या पहाडावरच भेटले. तीन वर्षे त्यांच्या संगतींत राहिल्यावर मला पाहिजे तें सर्व मिळालें. माझें पूर्ण समाधान झालें. सर्व प्रकारच पूर्ण स्वातंत्र्य मिळालें. नंतर मी संन्यासाश्रम घेतला.

स्वामी दुसरे दिवशीं सारा गांव शोधला तों कोठें आढळले नाहींत. त्यानंतर मी त्यांला पुनरपि पाहिलें नाहीं !

---

९

आत्मप्रौढीसारखें लाजिरवाणें कांहींहा नाहीं, पण त्याची तर प्रत्येकाला आवड ! चमड्याचा अभिमान बाळगणें, शवाला आपलें ह्मणून कवटाळणें, विण्मूत्रादिकांचें जें आगर त्याला नटवणें, क्षणध्वंसी काया अविनाशी आहे असें समजून तिच्या पोषणार्थ सर्वस्व खर्च करणें ह्याहून जगांत दुसरें आश्चर्य तें कोणतें !

१०

जन्मतांना तूं रडतोस व जग हंसतें, पण जन्मभर अशी करणी कर कीं, तुझ्या मरणकाळीं तूं रडणार नाहींस व जग हंसणार नाहीं ! !

११

नेहमीं ‘ मी मी ’ करण्यापेक्षां ‘ तूं तूं ’ तरी करीत जा ! ‘ मे, में में ’ करणारीं बकरी प्राणांस मुकते व ‘ तुंई तुंई तुंई ’ करणारी मैना मेवा खाते ! “ में में में बकरी करे गलाकटाय जाय ! ! तुंई तुंई तुंई मैना करे बैठी मेवा खाय ! ! ”

१२

बाकी ‘ मी तूं ’ सोडून स्वानंदमग्न होऊन राहणें ह्यासारखें भाग्यच नाहीं. अहंकारातें दवडूनी । सकळ काम सांडूनी । विचरे विश्व होवोनी । विश्वामाजी ”

# ७. सतींचें आत्मतेज.



१. पुण्य स्त्रीपुरुषांच्या कथा फार पावन असतात. पुण्यात्मे सर्व काळीं सर्व देशांत असतात हें खरें, पण आपल्या ह्या भरतभूमीच्या संतानांची गोष्ट कांहीं और आहे! पाश्चात्य विचारांच्या धुळीनें आमच्या लोकांचे डोळे भरून गेल्यामुळें, भलत्या कल्पना, भलती ध्येयें लोकांपुढें सुशिक्षितांकडून ठेवलीं जात असल्यामुळें भरतखंडांतले लोक आपल्या प्राचीन दिव्य तेजाला पारखे होत चाललें आहेत. हिंदुस्थान परतंत्र आहे यामुळें हिंदी लोकांची अन्नवस्त्राच्या, मानाच्या व धनाच्या बाबतींत भयंकर कुतरओढ होत आहे ही गोष्ट उघड दिसत आहे; पण ज्या अध्यात्मतेजाच्या बळावर हिंदुस्थानदेश आजवर जगमान्य झाला त्या अध्यात्मतेजाच्या हानीइतकी बलवत्तर हानी कोणतीच नाहीं. नाटकें, कादंबऱ्या, चटोरपणांत व कुटाळकींत एकमेकांची स्पर्धा करणारीं वर्तमानपत्रें, सडक्या व नासक्या प्रणयकथांचें चोज गाणारीं मासिकें, नाटकें व नाटक्यांचे देव्हारे माजविणारा समाज, सिनेमाचीं बंडें, चहा-काफीचीं व फराळाचीं दुकानें, एकमेकांचीं बिंगें काढून बाजारबसव्यांना अश्लीलपणांत लाजविणारे स्वयंमन्य पुढारी, मवाळजहाल किंवा ब्राह्मण-ब्राह्मणेतर वादांचीं भूतें उभीं करणारे उपद्व्यापी लोक, समाजसुधारणेच्या नांवाखालीं नसतीं कुलंगडीं उपस्थित करून वर्णसंकरकारक चळवळी करणारे व हिंदुधर्माला आग लावायला तयार होणारे आमचेच विजवटे लोक, धर्माच्या नांवाखालीं नवींनवीं थोतांडें काढणारे जुन्यानव्या मतांचे दांभिक पोटभरू लोक, गुरुत्वाच्या व संप्रदायाच्या पवित्र नांवाला लाज लावणारे भोंदु गुरु—या सर्वांचा आपल्या समाजांत इतका बुजबुजाट झाला आहे कीं, या वावटळींतून हिंदुसमाज आपलें परंपरागत हिंदुत्व कायम कसें टिकवील ही विचारवंतांना मोठी काळजी वाटत आहे. सांप्रतची राजकीय, सामाजिक व धार्मिक परिस्थिति हिंदुधर्माला इतकी भयप्रद व धोक्याची झाली आहे कीं, यांतून हिंदुस्थान जगणार का या वात्र-

टळींत नामशेष होणार ही चिंता वाटल्याशिवाय राहत नाहीं. तथापि भगवद्वचनावर पूर्ण विश्वास ठेवल्यानें व सनातन धर्माच्या अंगच्या सामर्थ्यामुळें ही चिंता फार वेळ टिकाव धरीत नाहीं. धर्मश्रद्धेच्या सूर्यप्रभेपुढें चिंतेचें धुकें किती वेळ उभें राहील ! ‘ यदायदाहि धर्मस्य ’ हा भगवंताचा ‘ चार्टर ’ आहे. ‘ धर्मस्य प्रभुरच्युतः ’ म्ह० धर्माची मूर्ति, धर्माचा स्वामी, नियंता, कृष्णपरमात्मा आहे. त्याला सर्व लाज आहे. तो आपला गुरु, स्वामी, मालक आहे. सनातन धर्माचें रक्षण करणारा श्रीकृष्ण समर्थ आहे. त्याच्या चरणांचें स्मरण करून त्याच्या दासांच्या पावन कथा गाण्यांत रंगून मुमुक्षूंनीं आपत्कालीं धीर धरला पाहिजे. असो. एका अर्वाचिन सतीचें चरित्र गाऊन आज मनाला उन्नत करूं.

२. ही सती ८०।९० वर्षांपूर्वी साताऱ्यांतच होऊन गेली. सोळाव्या वर्षीं तिनें आपला अवतार संपविला व आपल्या सच्चरित्र पतीच्या ज्योतींत ज्योत मिळवून स्वस्वरूपाकार झाली.

३. एके दिवशीं सातारचे मोर दीक्षित आपल्या खोलींत पोथ्या चहूंकडे पडल्या असतांना [व कांहीं लिहिण्यांत गुंतले असतांना] त्यांच्या डोळ्यांतून अश्रूंच्या धारा चाललेल्या त्यांच्या शिष्यानें पाहिल्या व आज गुरुजी रडतात कां याचा त्यास अचंबा वाटला. सायंकाळीं त्यानें धीटपणानें पण नम्रतेनें गुरुजींस प्रत्यक्ष विचारिलें तेव्हां त्यांनीं प्रसन्नतेनें शिष्यास बसवून सर्व गोष्ट सांगितली; ती जशीच्या तशीच खालीं देत आहोंत. गुरुजी म्हणाले :—

“ मी वीस वर्षांचा असतांना एक गोष्ट माझ्यासमोर घडली. तिचें स्मरण होऊन प्रस्तुत लोकस्थितीचा विस्मय वाटला व मला गहिंवर आला. आमच्या गुरुजींची एक पाठशाळा येथें होती. गुरुजी फार अधिकारसंपन्न व चतुःशास्त्रांत निष्णात होते. त्यांच्या शिष्यांत आम्ही दहाजण वरच्या पाठांत होतों. तेव्हां पुण्याच्या पर्वतीवर परीक्षा घेऊन चांगली दक्षिणा देत असत. आम्ही दहाजण निवडकच होतों. आम्हांस प्रत्येकीं १५० रुपये दक्षिणा मिळे. असें पांच वर्षें चाललें. पायीं पुण्यास जावें, दहाबारा दिवस रहावें, परीक्षा होऊन दक्षिणा पदरांत पडली

म्हणजे पायीं साताऱ्यास परत यावें असा आमचा क्रम सतत पांच वर्षें चालला. पांचव्या वर्षी एक विलक्षण प्रकार घडला. आमच्यांत गोपाळभट नांवाचा एक २४ वर्षें वयाचा तरुण, सुस्वरूप, अत्यंत बुद्धिमान् असा आमचा पुढारी होता. पुण्याहून निघायचे दिवशीं तो गोपाळ कॉलऱ्यानें झपाटला गेला. आम्हीं शिकस्तीचे प्रयत्न केले, दहाही जणांनीं आपलें सर्व रुपये खुषीनें वैद्यांस देऊं केले व कसेंही करून गोपाळास वांचवा अशी आम्हीं प्रार्थना केली. आमची जूट होती, खरें प्रेम होतें, निष्कटपणा होता. आह्मांस यश मिळालें नाहीं. गोपाळ वारला! गोपाळ आईबापांचा एकुलता एक पुत्र होता व तोही अत्यंत सच्छील, गुरुभक्त, प्रज्ञावंत होता. त्याचा अध्यात्मिक अधिकार फार मोठा होता; पण आह्मांस हा वेळपर्यंत तो कळला नव्हता. त्याचे आईबाप मोठे भक्त होते. त्याची बायको, सोळा वर्षांची तरुण पोर, फार पवित्र कुळांतली होती. राधागोपाळांचा हा जोडा अनुरूप होता. अशीं पवित्र दंपत्यें फार विरळ. गोपाळ अखेरपर्यंत सावध व फार शांत होता, मात्र मरण्याचे पूर्वीं १० मिनिटें त्याच्या शांत चेहऱ्यावर जरा ढग आले व दोनच अश्रुबिंदु गालावर पडले. आम्ही त्यास धीर दिला व 'तुझ्या आईबापांला युक्तीनें सांगून त्यांचें सांत्वन करूं, त्यांजवळ तुझे १५० रुपये देऊं, तूं कांहीं चिंता करूं नकोस, स्वस्थपणानें आत्मचिंतनांत रहा' असें म्हणालों. तो ह्मणाला:—'मला यापैकीं कसलीच काळजी वाटत नाहीं. एकच गोष्ट सांगायची आहे तेवढी कबूल करा म्हणजे मी आनंदानें प्राण सोडतों. मला बोलायला लज्जा वाटते, पण सांगतोंच. माझ्या अस्थि संभाळून तिच्याजवळ द्या. होय म्हणा. माझा जीव कोठेंही गुंतला नाहीं.' आम्ही त्याची शेवटची विनंति संतोषानें मान्य केली. आम्ही होकार देतांच त्याचा चेहरा प्रसन्न झाला, व आनंदानें त्यानें देह ठेवला.

"त्याची क्रिया केली व अस्थि बंधुप्रेमानें गोळा करून एका धोतरांत बांधल्या व आह्मांपैकीं आळीपाळीनें एकानें सोंवळ्यांत राहून त्या जवळ घ्यायच्या याप्रमाणें आम्ही त्या सोंवळ्यानें साताऱ्यास आणल्या व माझ्याच बिऱ्हाडीं एका खुंटीला टांगून ठेवल्या. आम्हां

सर्वांना व गुरुजनांना परम दुःख झालें, पण संकट पडलें हें कीं, गोपाळाच्या वृद्ध आईबापांना ही गोष्ट कळवायची कोणी व कशी? शेवटीं असें सांगायचें ठरलें कीं, गोपाळास एका श्रीमान् मनुष्यानें नाशकास नेलें असून तो महिन्यानें परत येईल! आह्मी सर्व परत आलों पण गोपाळ आला नाहीं, हें कळतांच त्याचे वडील चौकशीस आले त्यांस वरीलप्रमाणें सांगितलें. नंतर आई आली तिलाहि सांगून वाटेस लावलें. घरीं सूनबाई म्हणजे राधा हिच्या जिवाची तळमल झाली होती. सासूला खरा प्रकार तिनें विचारला. तिचा विश्वास बसला नाहीं. ती देवापाशीं गेली, देवाची प्रार्थना केली—बाहेर आली. तिच्या चेहऱ्यावर उग्र तेज व निर्धाराची कांति चमकूं लागली. तिला पतिसमागम एकच वर्ष झाला होता पण सती सावित्रीप्रमाणें अध्यात्मिकपणांत दोन जीवांचा एक जीव झाला होता. ती घरून निघाली ती तडक आमचे घरीं आली. आह्मी सात आठ जण ओटीवर बसलों होतों. ती दिव्यप्रभावशाली जगदंबेची मूर्ति दारांत उभी राहून निर्भयपणें बोलूं लागली—“तुह्मी मला फसवूं पाहतां, पण मला खरा प्रकार सर्व कळला आहे. आतांच मला त्यांचें दर्शन झालें. ते वैकुंठास जाण्यास खोळंबले आहेत. माझी वाट पहात आहेत. मला देण्यासाठीं त्यांनीं त्या दिल्या आहेत त्या कोठें आहेत? सांगा लवकर.” आम्ही सर्व चपापलों व खुंटीवर बोट दाखविलें. त्या सतीनें तें अस्थींचें गांठोडें धांवत जाऊन घेतलें, मस्तकाला लावलें, वंदन केलें, मुख प्रसन्न केलें, त्यावर स्मितहि झळकलें. तें घेऊन ती तडक निघाली व तिनें माहुलीची वाट धरली. आम्ही समजलों कीं ही सती जाणार. आम्ही सर्व जण तिच्या मागोमाग गेलों. ती स्मशानांत उभी राहिली. त्या देवीची आज्ञा आह्मांला वंद्य वाटली. चिता रचली, सुवासिनी जमल्या, त्यांची तिनें आनंदी मुद्रेनें पूजा केली. ती चितेवर जाऊन निजली. आह्मी अग्नि आणण्यासाठीं धांवाधांव करूं लागलों. ती स्मित वदनानें म्हणाली “बाहेरच्या अग्नीचें प्रयोजन काय आहे? मजजवळ अग्नि सिद्ध आहे.” असें म्हणून तिनें अस्थि पूज्य भावानें आपल्या हृदयावर ठेवल्या व दोन हातांचे तळवे तोंडासमोर धरिले व फुंक मारली. तो काय चम-

त्कार सांगावा ? हात पेटले, तिच्या तोंडांतून अग्निज्वाला निघाल्या व ती सती पतिपरमेश्वरस्वरूपीं लीन झाली. हा सर्व प्रकार आटोपल्यावर आम्ही विषण्ण हृदयानें घरीं आलों."

४ मोर दीक्षित हें सतीचरित्र सांगून म्हणाले, "आज तुम्हीं माझ्या डोळ्यांतून अश्रुप्रवाह पाहिला तो ह्या पवित्र कथेच्या स्मरणानें उत्पन्न झाला होता. मी विधवाविवाहाला शास्त्रार्थ पाहात होतों, खंडणमंडणपर लेख लिहिण्यांत व वाचण्यांत गुंतलों होतों तों मला ह्या प्रत्यक्ष पाहिलेल्या सतीचें चरित्र आठवलें.त्या गोपालाची ती शुद्धचरित्र मूर्ति नेत्रांपुढें उभी राहिली, राधेची दारांतली मूर्ति, तिचें दिव्य शांत तेज, तिचा निर्धार, त्या देवीच्या हातातोंडांतून निघालेल्या ज्वाला—तो सर्व प्रकार प्रत्यक्षासारखा दिसूं लागला व कसला पुनर्विवाह आणि कसलें बहिर्मुखांचें खंडणमंडण ! आमच्या प्रस्तुतच्या अधोगतीचें व त्या परमेश्वरी मूर्तींच्या दिव्य आत्मतेजाचें भयंकर अंतर मनांत येऊन त्यांच्या मूर्तीला प्रेमभावानें वंदन करितां करितां मला हुंदके अनावर झाले ! भरतभूमीच्या सत्पुत्रांचा व सत्कन्यांचा तो आत्मदानपुण्यप्रसंग स्मरून आनंदाश्रु लोटत होते. भरतखंडाचें हें आत्मतेज—ही पुण्याई अशीच चालणार का पुराणगत होणार हें एक ईश्वर जाणे ! आत्म प्रियांचा काल संपून पिंडपोषकांचा काळ आला आहे. देवाची मर्जी !'

---

## १३

मी पतित आहें व तूं पतितपावन आहेस असें देवाला आळविण्यानेंच पतितत्व नाहींसें होतें. आळविणें, प्रार्थना, स्तुति यांत विलक्षण जादु आहे. ईश्वर उत्पन्न झाला कीं, आपलें जीवपण मावळतें ! लघुत्व हरण करणें, चित्ताचें चैतन्य करणें हें करण्यास हरि समर्थ आहे, मात्र शरणागति हवी.

# ८ श्रीगौरंगशिक्षामृतम्.



( बंगाल्यांत नवद्वीप ऊर्फ नडियाद येथें होऊन गेलेले परम श्रीकृष्णभक्त गौरंग ऊर्फ श्रीकृष्णचैतन्य यांच्या मुखचंद्रापासून स्रवलेलें हें गीतामृत आम्ही मराठी वाचकांकरितां मराठी भाषांतरासह पुढें देत आहोंत. हें वृंदावन येथील ' श्रीकृष्णचैतन्यचंद्रिका ' नामक मासिकाच्या संपादकांकडून आलें आहे. याचें इंग्रजी भाषांतर अलवारचे एका गृहस्थानें केलें आहे. गीत मधुरतम आहे. )

१.

चेतोदर्पणमार्जनं भवमहादावाग्निनिर्वापणं
श्रेयःकैरवचंद्रिकावितरणं विद्यावधूजीवनं ।
आनंदांबुधिवर्धनं प्रतिपदं पूर्णामृतास्वादनं
सर्वात्मस्नपनं परं विजयते श्रीकृष्णसंकीर्तनम् ॥

**भावार्थ**—श्रीकृष्णसंकीर्तनाचा महिमा अत्यंत थोर आहे; कसा तो पहा:—हें कृष्णसंकीर्तन चित्तरूपी दर्पण स्वच्छ करितें, जन्ममरणरूप जो संसार त्याचा पेटलेला वणवा विझवून टाकतें, मोक्षरूप कमलाला विकसित करितें, हें सरस्वतीचें—ज्ञानाचें—केवळ जीवन आहे, हें आनंदसमुद्राला भरती आणतें, प्रतिपदीं कृष्णप्रेमामृत भक्तांना पाजतें आणि सर्व जीवांना कृष्णभक्तीचें स्नान घालतें.

२.

नाम्नामकारि बहुता निजसर्वशक्ति-
स्तत्रार्पिता नियमितः स्मरणे न कालः ।
एतादृशी तव कृपा भगवन् ! ममापि
दुर्दैवमीदृशमिहाजनि नानुरागः ॥ २ ॥

**भावार्थ**—हे भगवन् ! आपण आपल्याला अनंत नामें ठेवून घेतलीं, त्या नामांच्या ठिकाणीं आपली सर्व शक्ति ठेवली व ' काळ वेळ नाम उच्चारितां नाहीं' अशा प्रकारें नामस्मरणाला काळाची अटकही ठेवली नाहीं ! देवा, आपण एवढे दयासागर आहांत, तथापि माझें दैव

इतकें खडतर आहे कीं, माझ्या हृदयांत अद्यापि प्रेमाचा जिव्हाळा उत्पन्न होत नाहीं ! !

३.

तृणादपि सुनीचेन तरोरपि सहिष्णुना ।
अमानिना मानदेन कीर्तनीयः सदा हरिः ॥ ३ ॥

**भावार्थ**—माझा तर असा निश्चय झाला आहे कीं, मनुष्यानें तृणापेक्षां—लव्हाळ्यापेक्षां लघु व्हावें, वृक्षापेक्षांही द्वंद्वसहिष्णु व्हावें, स्वतः मानापेक्षा सोडावी पण दुसऱ्याला सत्कारपूर्वक संतोषवावें; मनुष्यानें असें निर्मळ आचरण ठेवावें आणि सर्वकाळ हरिसंकीर्तन करावें. तेव्हांच त्या कीर्तनाचा बहार येते.

४.

न धनं न जनं न सुंदरीं कवितां वा जगदीश ! कामये ।
मम जन्मनि जन्मनीश्वरे भवताद्भक्तिरहैतुकी त्वयि ॥ ४ ॥

**भावार्थ**—मला हे जगदीशा ! तुझ्या प्रेमावांचून कांहींही नको. मला धनाची गरज नाहीं, जनाची किंवा जनाचाराची गरज नाहीं, सुंदरी नको, कविता नको, मला श्रीमंती नको, लौकिक नको, कवि म्हणून घेणें नको. [बायका, पैका, प्रतिष्ठा यांचा मला वीट आला आहे] यापुढें ज्या ज्या योनींत मला जन्म देशील त्या त्या योनींत तुझ्याविषयींचें निष्काम प्रेम मात्र दे !

५

अयि नन्दतनूज ! किंकरं पतितं मां विषमे भवाम्बुधौ ।
कृपया निजपादपंकजस्थितधूलीसदृशं विभावय ॥

**भावार्थ**—हे नंदनंदना ! ह्या दुरत्यय मायासमुद्रांत गटंगळ्या खाणाऱ्या ह्या दीन दासाला आपण दयेनें आपल्या चरणकमलावरच्या रजःकणाप्रमाणें समजा.

६.

नयनं गलदश्रुधारया वदनं गद्गदरुद्धया गिरा ।
पुलकैर्निचितं कदा वपुस्तव नामग्रहणे भविष्यति ॥

**भावार्थ**—नेत्रांतून अश्रूंच्या धारा वाहात आहेत, सद्गदित झाल्यामुळें कंठनिरोध होऊन तोंडांतून शब्द फुटत नाहीं, सर्व शरीरावर अष्ट

सात्विक भावांच्या विकासामुळें रोमांच आले आहेत, अशी नामस्मरण करितांना माझी अवस्था कधीं होईल बरें ?

७.

युगायितं निमेषेण चक्षुषा प्रावृषायितम् ।
शून्यायितं जगत्सर्वं गोविंदाविरहेण मे ॥ ८ ॥

**भावार्थ**—गोविंदाच्या विरहदुःखामुळें मला प्रत्येक क्षण युगासारखा वाटत आहे, नेत्रांतून सतत अश्रुपूर लोटत आहेत, सर्व जग भयाण झालें आहे !

८.

आश्लिष्य वा पादरतां पिनष्टु मामदर्शनान्मर्महतां करोतु वा ।
यथा तथा वा विदधातु लंपटो मत्प्राणनाथस्तु स एव नापरः ॥

**भावार्थ**—मी माझ्या भावानें श्रीकृष्णचरणाशीं विनटलों आहे. मला त्यांनीं एकवार आलिंगन द्यावें आणि याचक्षणीं मृत्युच्या स्वाधीन करावें किंवा मला दर्शनही न देतां माझा हृदयभंग करावा—त्यांनीं वाटेल तें करावें. त्यांचा स्वभाव मला माहीत आहे, ते प्रेमवश आहेत. माझ्या जीवाचा निर्धार झाला आहे कीं, माझे प्राणनाथ ते आहेत. त्यांच्याशिवाय माझ्या प्राणावर दुसऱ्या कोणाचीही बिलकूल सत्ता नाहीं !

---

१४

देवाला सर्वभावानें शरण जाणें एवढाच आपला धर्म आहे. शरणागति हा जीवाचा धर्म आहे व पतितपावनता हा ईश्वराचा स्वभाव आहे.

१५

कायावाचामनानें जो जो व्यापार होतो तो तो 'मी' करीत आहें असें म्हणूं नकोस. मीपण पुसून टाक कीं प्रभुप्रसादाचा तुला प्रत्यय येईल. नर मीपण सोडील तर नारायणच होईल.

# ९ कुतन्या ! थमाल ले थमाल आपुल्या गाई.



### पद.

कुतना ! थमाल ले थमाल आपुल्या गाई ।
आह्मि आपुल्या घलासि जातो भाई ॥ ध्रु० ॥
तुह्मी थोलल्या पातलाचे लेक ।
मला ह्मनता ले जाई गाई लाख ॥
तुह्मांमधीं ले गलीब आहे एक ।
किति मी धांवूं ले काता लागला पायीं ॥ कु० ॥ १ ॥
काली पिवली ले गाय आहे तानेली ।
या या गवल्याची धवली गाय पलाली ॥
मदला बघून तो गवली मालामाली ।
काथी कामली हिसकुनि घेतलि साली ॥ कु० ॥ २ ॥
काल वलाचि ले वलाचि खलवस केला ।
तुह्मीं सल्वांनीं फाल फाल घेतला ॥
मी गलीब ले ह्मनुनि थोलका दिला ।
तूं ह्मनसिल ले याला कलत नाहीं ॥ कु० ॥ ३ ॥
कृष्ण ह्मणे रे उगा राहे बोबड्या ।
तुझ्या गाई रे मीच वळवितों गड्या ॥
नाहिं तरि धाडिन रे गोपाळाच्या जोड्या ।
नामा ह्मणे रे गोष्ट रोकडी पाहीं । रो० पाहीं ॥ कु० ॥ ४ ॥

१. हें पद नामदेवांचें आहे. आपण आज त्याच्या अर्थाचें मनन करून श्रीकृष्णाच्या बोबड्याबरोबर आत्मसुखाच्या खरवसासाठीं देवाबरोबर प्रेमानें भांडूं या.

२. सर्व अवतारांत श्रीकृष्णावतार पूर्ण होय. ‘ कृष्णस्तु भगवान्स्वयम् ’ ही भागवतकारांची उक्ति यथार्थ आहे. कृष्णावतारांत सर्व रस व सर्वरंग परिपूर्ण भरलेले असून ‘ न मां कर्माणि लिंपन्ति ’ ह्याप्रमाणें सर्व करून आपलें अकर्तेपण देवांनीं स्पष्ट करून दाखविलें आहे. आणि त्या अवतारांतल्या लीलांत ‘बाललीला’ अत्यंत प्रेमळ असल्या-

मुळें बहुतेक संतांनीं गाइल्या आहेत. देवाच्या खेळगड्यांचें देवावर अकृत्रिम प्रेम होतें. त्या सर्व खेळगड्यांत 'पेंध्या' म्हणून वेडाबोबडा होता. त्याच्या तोंडीं नामदेवांनीं हें पद घालून आत्मार्पणविधि मौजेनें सुचविला आहे.

३. ह्या पदाचा उत्तानार्थ कथानकपर असून गूढार्थ अध्यात्मपर आहे. देवाच्या सर्व लीलांना नदीच्या दोन तटांप्रमाणें दोन बाजू असतात. कथापर भाग आबालवृद्धांना सहज समजून गोड लागतो व रहस्यपर भाग विचारवंतांनीं समजून स्वसुख भोगण्यासारखा असतो. रासक्रीडा, गजेंद्रमोक्ष, बलीचें आख्यान इत्यादि सर्व सरस गोष्टींत कथापर व रहस्यपर असे दोन भाग असतात. **कथापर भागाला धक्का न लावतां रहस्यभाग उकलावा लागतो.** देव सगुणनिर्गुण उभयरूप आहे तशा देवाच्या कथाही कथापर व रहस्यपर अशा उभयरूप आहेत: 'सगुण रक्षून निर्गुण बोलत जावें' ही समर्थांची शिकवण लक्ष्यांत ठेवून आपण पुराणकथांकडे पाहिलें पाहिजे. प्रथम कथाभागाकडे पाहून नंतर आपण रहस्यभागाकडे पाहूं.

४. बोबडा देवाशीं प्रेमानें रुसून म्हणतो, "कृष्णा! तुझ्या ह्या गाई तूं संभाळ! तुम्हा सर्व थोर पाटलाचे लेक आहांत, श्रीमंत आहांत, मला तेवढें ह्मणतां कीं गाई राख म्हणून व आपण स्वतः मजा मारीत येथें बसतां! पण ह्या गाईच्या पाठीमागें धांवतां धांवतां माझी कोण त्रेधा उडत आहे, माझ्या पायाला कांटे मोडतात व पाय रक्तबंबाळ होतात याची तुह्मांला कांही खंती आहे का? या गाईंत काळी व पिंवळी अशा ज्या दोन गाई आहेत त्या तर नेहमीं तान्हेलेल्याच असतात. त्यांना पाण्यावरून आणावें तों त्यांना पुन्हा तहान लागते. त्यांची तहान कधींच भागत नाहीं. ढवळी गाय आहे ती हातीं लागत नाहीं, पळून जाते! त्या ढवळ्या गाईचा मालक मला ती राखतां येत नाहीं म्हणून मजवर रागावतो व मला भारी मारतो व त्यानें माझ्या हातची काठी व अंगावरची कांबळी हिसकावून घेतली आहे. तुम्ही तरी कसले लबाड आहांत! परवां मोठा थोरला खरवस तयार केला होता. तुह्मी सर्वांनीं मोठमोठ्या खरवसाच्या वड्या खाल्ल्यात

आणि मी गरीब म्हणून माझ्या समजुतीसाठीं माझ्या तोंडावर इवलासा तुकडा टाकलांत ! कृष्णा ! तुला वाटेल कीं, या वेड्याला कांहीं कळत नाहीं म्हणून ! पण मला सारें समजतें. मला नकोत ह्या गाई, मी यांना यापुढें वळविणार नाहीं. तूं ह्या आपल्या गाई संभाळ. तूं गोपाळ आहेसच मग तुझ्या गाई तूंच संभाळाव्यास हें योग्य आहे." हें त्या बोबड्याचें भाषण ऐकून देवाचें चित्त कळवळलें व "तुझ्या गाई मी स्वतः वळवीन किंवा दुसऱ्या गोपाळांला वळावायला सांगेन. तूं आपला स्वस्थ बसून पोटभर खरवस खा व रुसूं नकोस," अशी त्या बोबड्याची समजूत घातली. नामदेवराय हा संवाद जवळ उभे राहून ऐकत होते. तें देवाचें भाषण ऐकून 'देव किती तरी खरें बोलले' म्हणून आपल्या चित्तांत हर्षित झाले !

५. ह्या कथाभागांत गोडी आहेच, पण आतां आपण आपल्याला पेंद्याच्या जागीं धेऊन ह्या पदांत पेंद्यानें केलेली देवाची प्रार्थना करूं या. वाचक म्हणतील 'पेंद्या बोबडा होता, व आम्ही कांहीं बोबडे नाहीं !' तर आपण बोबडेच आहोंत. देवापुढें बोलायची, देवाला प्रिय होणारी वाणी ज्याला उच्चारतां येत नाहीं तो बोबडाच आहे. देवानें ध्रुवबाळाच्या कपोलाला आपल्या हाताच्या शंखाचा स्पर्श करून त्याला बोलविलें तेव्हां तो जी वाणी बोलला ती ज्यांला बोलतां येत नाहीं ते सारे बोबडेच आहेत. आपण सर्व बोलतों पण आपली वाणी निर्जीव आहे, देवाच्या कृपेनें तो बोलवील तेंच बोलूं, तेव्हांच वाणींत प्रसाद येईल.

**कृतांजलिं ब्रह्ममयेन कंबुना पस्पर्श बालं कृपया कपोले ॥ ४ ॥**
**स वै तदैव प्रतिपादितां गिरं । दैवीं परिज्ञातपरात्मनिर्णयः ।**
**तं भक्तिभावोऽभ्यगृणादसत्वरं परिश्रुतोरुश्रवसं ध्रुवक्षितीः ॥ ५ ॥**

ध्रुवाच्या तपानें व नारदांनीं दिलेल्या 'ॐनमो भगवते वासुदेवाय' या मंत्राच्या जपानें भगवान् प्रत्यक्ष प्रगट झाले व त्यांनीं आपल्या हातांतल्या वेदमय शंखानें त्याच्या गालाला स्पर्श केला. तेव्हां ईश्वर व जीव यांच्या स्वरूपाचा ज्याला निर्णय कळला आहे, असा तो भक्तिमंत ध्रुव त्या दिव्य स्फूर्तिदायक वाणीचा आश्रय करून

तत्क्षणीं त्या विशालकीर्ति नारायणाची स्तुति करूं लागला. ही सर्व स्तुति फार बहारीची आहे. त्यांतील पहिलाच श्लोक पह :—

**योऽतःप्रविश्य मम वाचमिमां प्रसुताम् संजीवयत्यखिलशक्तिधरःस्वधाम्ना अन्यांश्च हस्तचरणश्रवणत्वगादीन् प्राणान्नमो भगवते पुरुषाय तुभ्यम्६॥**

—भागवत स्कंध ४ अ० ९

आपली वाणी प्रसुप्त आहे. ती नारायणानें संजीवित करीतोंपर्यंत आपण सर्व बोबडेच आहोंत. असो. त्या बोबड्याची श्रीकृष्णावर जी निष्ठा होती ती अपूर्व असल्यामुळें बोबड्याची उच्च भूमिका भावनेनें आपण घेतली तर त्यांत आपलेंच हित आहे.

६. आतां आपण बोबड्याच्या भाषेनें देवाशीं काय बोलायचें तें पाहूं. ' कुतना थमाल ले थमाल आपुल्या गाई ' एवढी एकच प्रार्थना देवाची केली तरी पुरे आहे ! येथें गो म्ह० गाय असा जसा एक अर्थ घेतला, तसा गो ह्म० इंद्रियें असा घ्यावा. गाई व त्यांचीं सर्व खिल्लारें म्हणजे सर्व मनोवृत्ति व इंद्रियवृत्ति. या गाईंच्या कळपांचे तीन वर्ग शास्त्रकारांनीं केले आहेत ते असे:—

१ काळी = तामसवृत्ति.

२ तांबडी किंवा पिंवळी = राजसवृत्ति.

३ धवळी = सात्विकवृत्ति.

भागवतांत सत्वप्रधान कृतयुगाला श्वेत ह्म० धवल वर्ण दिला आहे, रजःप्रधान त्रेता व द्वापार युगांला पीत व रक्तवर्ण दिला आहे व कलियुगाला तमःप्रधान कृष्णवर्ण दिला आहे. ' स कलिस्तामसःस्मृतः '

**श्वेतो रक्तस्तथा पीत इदानीं कृष्णतां गतः ॥**

भागवतांत ( स्कंध ११ अ० ५ ) देवसुद्धां प्रत्येक युगांत युगानुरूप आकार धारण करितात म्हणून ह्मटलें आहे. " कृते शुक्लः । त्रेतायां रक्तवर्णोऽसौ । द्वापरे भगवान् श्यामः । कृष्णवर्णं त्विषा कृष्णं " इत्यादि. पंतांनीं मंत्रभागवतांत ( स्कंध ११ ) ह्मटलें आहे:—

**गर्व कृतादि युगांचा हरिला बा ! याचि सद्गुणें कलिनें ।**
**कर्पूरचंदनांचा स्वसुवासें जेंवि मृगमदें मालिनें ॥ ११४ ॥**

कलियुगांत हरिकीर्तनानें सर्व तरतात. ' कलौ तद्धरिकीर्तनात्. '

१ कृत = सत्व = कर्पूर.
२ त्रेता = रज = पीतचंदन.
३ द्वापार = रज = रक्तचंदन.
४ कलि = तम = कृष्णवर्ण कस्तुरी.

तात्पर्य काय कीं, सात्विक, राजस व तामस ह्या त्रिप्रकारच्या वृत्ति आहेत. वृत्ति अनंत आहेत पण शास्त्रानें त्या सर्वांचें वर्गीकरण करून त्यांचे धर्म, त्यांची उत्पत्ति, वाढ व लय यांचें उत्कृष्ट विवेचन गीतेच्या गुणत्रयविभागरूप १४ व्या अध्यायांत व भागवत, दासबोध इत्यादि ग्रंथांत केलें आहे. हा ' त्रिगुणांचा खेळ ' आहे. हे तीनही गुण बंधन कारक आहेत. लोखंडाची किंवा तांब्यापितळेची शृंखळा जशी जखडून टाकते त्याचप्रमाणें सोन्याची शृंखळाही बंधनकारकच आहे. मुक्ततेची इच्छा करणारा पुरुष सोन्याला भुलून सोन्याची शृंखळा पायांत बाळगणार नाहीं. म्हणूनच देवांनीं ' निस्त्रैगुण्यो भवार्जुन ' असें अर्जुनाला सांगितलें आहे. ' गुणानेतानतीत्य त्रीन् ' ह्म० तीनही गुणांच्या पलीकडे जा. त्याचें साधन भक्ति हेंच होय.

**मां च योऽव्यभिचारेण भक्तियोगेन सेवते ।**
**स गुणान्समतीत्यैतान् ब्रह्मभूयाय कल्पते ॥**

त्रिगुणांच्या बंधनांतून सुटायचें असेल तर नारायणाला अनन्यभावें शरण जा. त्याला अव्यभिचारी भक्तीनें भजा, त्याला आपल्या सर्व वृत्ती अर्पण करा, असेंच देवांनीं ह्या श्लोकांत सांगितलें आहे. आपण देवाला दूर्वांचें किंवा बेलाचें त्रिदल वाहतों त्यांत तीनही प्रकारचे गुण किंवा वृत्ति देवाला अर्पण करण्याचा मूळ हेतु असला पाहिजे ! सुशील सुगुणी स्त्रिया देवाला हळदकुंकू वाहतात यांतही रजोगुण देवाला अर्पण करण्याचाच हेतु आहे. अनेक रंगांचीं अनेक फुलें देवाला वाहतांना आपल्या अनंत वृत्ति देवाला वहायच्या असतात. गळ्यांत तीन पदरीं जानवें आपण अटकवितों त्यांतही तीन गुणांनीं आपण बांधले आहोंत, याचें निरंतर स्मरण देण्याचा हेतु असावा ! ब्रह्मगांठींत तीनही गुणांची उत्पत्ति व लय आहे. ब्रह्मगांठ हें नांवही सार्थ आहे. असो. ह्या विषयाचें येथें दिग्दर्शन केलें आहे याचा ज्याचा

त्यानें आपल्याशीं विचार करावा. आमचा धर्म तत्वज्ञान व व्यवहार यांची उत्कृष्ट सांगड घालणारा व इहपरगतिदायक असा आहे. असो. ह्या विवेचनाच्या दृष्टीनें आपण नामदेवांच्या वरील पदाकडे पाहिलें म्हणजे त्या पदाचें रहस्य आपल्या लक्षांत येईल.

७. कुतना थमाल रे थमाल आपुल्या गाई' याप्रमाणें सर्व इंद्रियें व त्यांच्या वृत्ति देवाच्या हवालीं करणें हीच खरी शरणागति होय! आपल्या पराक्रमानें आपण इंद्रियें स्वाधीन ठेवूं हें म्हणणें व्यर्थ आहे. तुकोबांनीं ठिकठिकाणीं म्हटलें आहे:—

**इंद्रियांचीं दीनें। केलों आम्हीं नारायणें ॥ १ ॥**

× × × × × ×

**माझे मज कळों येती अवगुण। काय करूं मन अनावर ॥ १ ॥**
**आतां आड उभा राहें नारायणा। दयासिंधुपणा साच करीं ॥ धृ ॥**
**वाचा वदे परी करणें कठीण। इंद्रियां आधीन जालों देवा ॥ २ ॥**
**तुका म्हणे जैसा तैसा तुझा दास। न धरीं उदास मायबाप। ॥ ४॥**

इंद्रियजय कदाचित् कोणास दुसऱ्याही कोणत्या मार्गानें साधत असेल, पण भक्तांना सर्वस्व नारायण झाल्यावर त्यांच्या इंद्रियांचा प्रेरक तोच होतो व त्याच्या कृपेवांचून इंद्रियांचा जय होत नाहीं असा त्यांचा विश्वास असतो. वोबडा म्हणतो, "देवा, काळी गाय व पिवळी गाय अर्थात् तामस व राजस वृत्ति या नेहमीं 'तानेल्या' असतात, म्हणजे त्यांना कितीही विषय चारिले तरी त्या अतृप्त असतात! धवळी गाय म्हणजे सात्विक वृत्ति ही पळून गेली ह्म० मला ती संभाळतां आली नाहीं! त्या गाईचा मालक जो श्रीविष्णु त्यानें माझा बेवकूबपणा पाहून काठीकांबळी ह्म० विवेकवैराग्य हिसकावून घेतली आहे व मला तो मारीत आहे ह्मणून देवा! माझ्यानें गाई वळवणें होत नाहीं. ह्या तुझ्या तूंच संभाळ."

८ " परवां तुह्मी स्वसुखाचा पुष्कळ खरवस केलांत व कृष्णा! तूं आपल्या शहाण्या सवंगड्यांबरोबर तो पुष्कळ खाल्लास, पण मी गरीब म्हणून मला मात्र एवढासा तुकडा दिलास हें तुला शोभतें का? तुला वाटत असेल कीं, या बोबड्याला कांहीं कळत नाहीं!

पण मला तेवढें बरोबर कळतें; माझ्यापेक्षां वेडे व अज्ञ आहेत त्यांनासुद्धां सुखाचा खरवस पाहिजे असतो. सुख कोणाला नको आहे ? ”

९. यावर कृष्णांनीं बोबड्याची समजूत पाडली कीं, गड्या ! तुझ्या गाई मी स्वतः वळवीन अगर संतांचा सहवास तुला देईन. मी अगर माझे भक्त यांत फरक नाहीं. नारदादि अनेक पुरुष संतसंगतीनेंच उद्धरले आहेत. देव स्वतः दासाचें काम करितात अगर आपल्या परमप्रिय आत्मतुल्य भक्तांच्या मार्फत करतात. पंतांनीं केकावलींत देवा, तुम्ही स्वतः या अगर भक्तांना पाठवा म्हणून विनविलें आहे.

**परंतु हरि ! एकदां त्वरित दाखवा पावलें ।**

अशी प्रार्थना करितां करितां ‘ निजप्रियजनाकडे तरिहि दे हवाला’ असें म्हटल आहे.

---

## १६

आपल्या धर्मांत गृहस्थ आणि संन्यासी या दोघांनाही मुक्त होतां येतें अस सांगितलें आहे. संसार मुळींच मिथ्या असल्यामुळें स्वरूप-प्राप्तीच्या मार्गाला त्याचा अडथळा होऊं शकत नाहीं. राजा, ब्राह्मण, परीट, न्हावी, सुतार, सोनार, राजकारणी, एडिटर, वकील, जज्ज, कैदी, पोलीस, देशभक्त, सर्वांना परमार्थ खुला आहे ! देव सर्वांच्या हृदयांत आहे, त्याचें सान्निध्य सर्वांना आहे, त्याची कृपा सर्वांवर आहे, त्याला शोधायचा व मुक्त व्हायचा मार्ग सर्वांना मोकळा आहे; असें असून देवाला जो कोणी शोधणार नाहीं त्याच्या इतका दुर्भागी तोच ! ‘अशा तुज न जो भजे मनुज धिक् तयाचें जिणें !’

# १० शेतकऱ्याची गोष्ट.



## लोभ आणि संतोष.

१. Tales from Tolstoy म्ह. टॉलस्टॉय यानें लिहिलेल्या गोष्टी या नांवाचा एक ग्रंथ मूळ रशियन भाषेंत प्रसिद्ध आहे. टॉलस्टॉय हा साधुवृत्तीचा, निस्पृह व निर्भीड तत्त्ववेत्ता कांहीं वर्षांमागें रशियांत होऊन गेला. हा गरिबांचा कनवाळू व 'जे कां रंजले गांजले । त्यांसी म्हणे जो आपुले ' या कोटींतला सत्पुरुष होता. रशियाचा जुलमी झार व बडे अमीरउमराव त्यास चळचळां कांपत व गरीबांना तो मायबाप म्हणून वाटे. त्यानें लिहिलेल्या १२ गोष्टी वरील ग्रंथांत संग्रहित केलेल्या असून मूळाचें इंग्रजी भाषांतर बेन नामक इंग्रजानें इंग्रजींत केलेलें आहे. त्यांतील तिसऱ्या गोष्टीच्या आधारें हा लेख मी लिहिणार आहें. मनुष्यानें आपली संतोषवृत्ति सोडली आणि तो हांवरेपणाच्या भरीं भरला म्हणजे त्याचें फळ काय प्राप्त होतें, हें या गोष्टीवरून वाचकांच्या ध्यानांत येईल.

२ एक गरीब शेतकरी आपल्या बायकामुलांसह एका खेडेगांवीं सुखानें नांदत होता. शेतांत दिवसभर राबावें, सुखानें भाजीभाकरी खावी, आनंदानें बायकोशीं प्रेमाच्या व मुलांशीं लडिवाळपणाच्या गोष्टी सांगत व हांसतखेळत संसार करावा असा त्याचा आयुष्यक्रम होता. वस्तुतः त्याच्या सुखांत कांहीं न्यून नव्हतें. त्याच्या बायकोची धाकटी बहीण, शहरांत छानछुकीनें राहणारी, आपल्या बहिणीच्या घरीं आठ दिवस राहण्यास आली. दोघी बहिणींचा संवाद पुढीलप्रमाणें झाला व तो शेतकरी शेजारच्या खोलींतून तो सर्व ऐकत होता. आपण वडील बहिणीला शांती व धाकटीला विलासिनी म्हणूं !

विलासिनी—ताई ! तुला ह्या भिकारड्या गांवांत करमतें कसें हेंच मला समजत नाहीं. मी कांहीं इथें राहिलें नसतें.

शांती—न करमायला काय झालं ! सकाळीं उठून केरपोतेरें, शेणगोठा करावा, गाईची धार काढावी, पोराबाळांचें जेवणखाण आटोपून, धुणीं धुवाव्नींत व स्वयंपाक करावा तों दुपार होते. दुपारीं रोज दोन पाव्हणे व दोन अतिथि पंक्तीला असतातच. दुपारचीं जेवणंखाणं आटोपतात तों तिसरा प्रहर होतो. शेजारच्या देवळांत कांहीं पुराण ऐकावें, चार बायका आल्या तर गाणीं होतातच. झालं संध्याकाळ झाली कीं, धार काढून स्वयंपाक करावा. रात्रीचीं जेवणें होतांच निजावें तों सकाळीं उठावं. हा आमचा रोजचा क्रम आहे. माझें आयुष्य यांतच सुखाचें जातें. मला घर सोडून बाहेरच करमत नाहीं.

विलासिनी—इश्श ! कोण मेली ही महारकी. मी नाहीं बाई शेणाला हात लावायची !

शांती—तर मग तुला नाहीं आमच्यासारखं दूधतूप—घरचें, स्वच्छ आणि मनमुराद—खायला मिळायचें !

विलासिनी—न कां मिळेना. आमच्या शहरीं आमच्या घरीं रोज पांच शेराचा रतीब आहे.

शांती—पाहिलें मीं गुदस्तां ! तुमच्या शहरांतून चांगलें दूध कुठें मिळत आहे ? मी गुदस्तां आठ दिवस आलें होतें तुझ्या घरीं—मला कांहीं तें दुधाचें पाणी पिववेना सुद्धां. तुमच्या शहरांतून दुधांत पाणी किंवा पाण्यांत दूध घालून विकतात. आमच्यासारखें घट्ट दहीं व लोणकढें तूप कांहीं तुझ्या घरीं नाहीं मिळालें.

विलासिनी—पण, किती कष्ट पडतात त्यासाठीं तुला हे ?

शांती—मी कधींच कष्टाला कंटाळत नाहीं. कष्टावांचून सुख कधींच लागायचें नाहीं.

विलासिनी—काय पण गांव ! इथें डाक्टर वैद्याची गरज लागली तरी मिळायचा नाहीं. बाहेरूनच आणायला हवा.

शांती—पण आम्हांला औषधाची गरजच लागत नाहीं. शुद्ध हवा, स्वच्छ अन्न, मेहनत यामुळें कधीं डोकें दुखणें, ताप येणें, अपचन होणें या गोष्टी वर्षानुवर्ष आम्हांला माहीत नाहींत. माझीं मुलें राना-

वनांतून उघडींवाघडीं हिंडतात, जाडेभरडे कपडे पांघरतात, पण पहा बरं कशीं सतेज, सकस, सशक्त व निरोगी आहेत! मी मुलांची आई म्हणून असें बोलूं नये, पण बोलण्याच्या भरांत बोलून जातें. भूक लागेल तेव्हां खावें, तहान लागेल तेव्हां पाणी प्यावें, झोंप येईल तेव्हां निजावें हें आमचें आरोग्यशास्त्र. ताज्या फळभाज्या, पुरेसें दूधदुभतें, आलटून पालटून अनेक प्रकारचीं कडधान्यें यापेक्षां आम्हांला दुसरें ऐश्वर्य नको. पोटभर अन्नवस्त्र देवानें दिलें आहे यांत आम्ही सुखी आहोंत. माझीं मुलें राकट आहेत व तुझीं नाजूक व सुंदर आहेत. पण त्यांचे ते झगझगीत पोषाख, बूट व पाटलोण, नेकटाय, रिस्टवॉच आणि चष्मे, सतरा नखरे यांच्या खालीं त्यांचे देह पाहिले तर हे नुस्ते पाप्याचे पितर आहेत, त्यांचीं हाडें मोजून घ्यावींत! जरा कुत्रें आंगावर आलें तर भितात, ही स्थिति पाहिली म्हणजे तुमच्या सुधारलेल्या शहरांना दुरूनच नमस्कार करावा, असें माझ्या मनांत येतें. मी माझ्या छबकड्यांना शहरांत पाठवायचीच नाहीं कधीं!

विलासिनी—पुरे झाला अभिमान, शहर तें शहर आणि खेडें तें खेडें

शांती—माझा आठ वर्षांचा बाळसुद्धां काल त्या नदींत पोहत होता आणि तुझीं मुलें कांठावर उभीं राहून बायकांसारखीं पाहत राहिलीं होतीं! आमच्या बाबूनें गुदस्तां दोघां चोरांना २ घंटे डांबून ठेवलें होतें, आणि मग माणसें जमा झालीं आणि त्या चोरांना लोकांनीं पकडलें.

विलासिनी—ही नुस्ती शक्ति घेऊन काय बसलीस? पशुसुद्धां दांडगे असतात. शहरांतून शाळा कॉलेजें आहेत, सभा आहेत, विद्वानांचीं मंडळें आहेत, नाटकें, सीनेमा वगैरे करमणुकीचे खेळ आहेत; गाड्याघोडीं, मोटारी, सायकली आहेत!

शांती—आणि नानाप्रकारचीं व्यसनें आहेत, रोग आहेत, लांड्या लबाड्या व फसवणुकीचे सुधारलेले प्रकार आहेत!

विलासिनी--पुरें झालें, मी उठूनच जातें मुळीं!

झालें. तें भाषण तितकेंच राहिलें.

*  *  *  *

३ शहरांतल्या डामडौलाच्या गोष्टी ऐकून शांतीच्या मनावर कांहीं परिणाम झाला नाहीं. तिचें चित्त शांतच राहिलें. आपण सुखी आहोंत ही तिची निष्ठा ढळली नाहीं, तिची समाधानी व संतुष्टवृत्ति अभंग राहिली. पण तिच्या नवऱ्याच्या—त्या शेतकऱ्याच्या मनाची मात्र चलबिचल झाली ! शेतकीचा धंदा क्षुद्र, खेडेगांवचें राहणें गचाळ, कांहीं बहादुरी व मौज असेल तर शहरांतच आहे असें त्याला वाटलें ! त्याची झोंपडी त्याला भिकार वाटूं लागली. त्याची बायको रानवट व पोरें टोणपीं आहेत असें त्याच्या मनानें घेतलें. रगड पैसा मिळवावा, शेंकडों नोकर हाताखालीं ठेवावेत, मोटारगाड्यांची रांग आपल्या दारांत सदा उभी असावी, अमीरउमराव व हफीसर लोक यांची रोज संगत व पंगत असावी, नाच व गवयांचे ताफे दारीं झुलत रहावेत असलें मनोराज्य त्याचें सुरू झालें.त्याचें साधें शुद्ध अन्न त्याला रुची देईनासें झालें. संसारांतलें सुखसमाधान नष्ट झालें. रगड पैसा कधीं मिळवीन व फिरायला मोटारगाड्यांतून कधीं जाईन असें त्याला झालें. त्याचा रजोगुण बळावला. त्या छानछुकी डौली मेव्हणीच्या संगतीनें त्याची संतोषवृत्ति लय पावली व धनलोभाचा ज्वर त्याच्या अंगांत भरला. रात्रंदिवस द्रव्यलोभाचें काहूर मनांत उठलें. झोप पळाली. सुख संपलें. हा सारा ‘ इदमद्य मयालब्धं इमं प्राप्स्ये मनोरथम् ’ या रजोगुणाचा प्रताप !

म्हणे आजि मियां । संपत्ती बहुतेकांचिया ।
आपुल्या हातीं केलिया । धन्य ना मी ॥
ऐसा श्लाघों जाये । तंव मन आणिकाहि वाहे ।
सर्वांचि म्हणे पाहे । आणिकांचेंही आणूं ॥
हें जतुलें असें जोडिलें । तयांचेनि भांडवलें ।
लाभा घेईन उरलें । चराचर हें ॥
ऐसेनि धना विश्वाचिया । मीचि होईन स्वामिया ॥
मग दिठी पडे तया । उरोंचि नेदी ॥ ( ज्ञानेश्वरी अ० १६ )

अगदीं अस्सेंच त्या शेतकऱ्याचें झालें. तो महत्वाकांक्षेचा गुलाम बनला. आपली १० एकर जमीन, घरदार, दागदागिने, रोकड वगैरे सर्व भरीस घालून त्यानें पैसे जमविले व आपला वडिलार्जित गांव सोडून दूर प्रांतीं गेला. तेथें १०० एकर जमीन घेऊन त्यानें पुन्हां संसार थाटला. त्यावर त्याला ३ वर्षांत चांगली किफायत झाली, पण एवढ्यावर संतुष्ट न राहतां पुन्हां तेथलि सर्व संसार आटोपून तिसऱ्या प्रांतीं गेला. तेथेंही दैवानें त्याला चार वर्षें चांगला हात दिला. ५०० एकर जमिनीचा तो मालक झाला. तेथें ३ वर्षें राहिला. आतां तरी त्यानें समाधानानें रहावें कीं नाहीं ? पण मनाची तळमळ शमली नाहीं. तेथला संसार सोडून तो चवथ्या प्रांतीं गेला. तेथला कायदा त्याला समजला. एका दिवसांत जितकी जमीन चालून येईल तेवढ्यावर २५ हजार रुपये देऊन त्याचें स्वामित्व स्थापित व्हावें असें ठरलें. सूर्योदयाला जेथून निघायचें तेथें सूर्यास्तापूर्वीं आलें पाहिजे नाहीं तर जमिनही नाहीं व रुपयेही नाहींत असा करार ठरला होता. एक मैल चालला, दहा, वीस, पंचवीस मैल चालला. मूळ खांब जवळ आला. भराभर चालतां चालतां थकला. डोळ्याला अंधेरी आली. तसाच चालला. अगदीं वेळेवर मूळस्थानीं पोंचला, पण काय? रक्त ओकून जमिनीवर मरून पडला !!

टॉलस्टॉय ह्मणतो:—

" The grave was three Russian ells in length Pathom's exact measurment from head to foot ! "

त्याच्या हाताला एवढ्या धडपडीनंतर किती जमीन लागली म्हणून विचाराल तर त्याचा अचेतन देह ज्या साडेतीन हाताच्या जमिनीवर पडला तेवढीच जमीन त्याला मिळाली !

× × × ×

वरील गोष्टीचें तात्पर्य टॉलस्टॉयनें जें सांगितलें आहे तेंच आमच्या तुकोबारायांनीं—

**औट हात तुझा जागा। येर शिणसी वाउगा ॥ १ ॥**

ह्या अभंगपादांत सांगितलें आहे !

सर्व अभंगाचें मनन वाचकांनीं करावें म्हणून तो समग्र अभंगच पुढें देत आहें—

> एक शेर अन्ना चाड। येर वाउगी बडबड ॥ १ ॥
> कां रे तृष्णा वाढविसी। बांधवूनि मोहपाशीं ॥ २ ॥
> औट हात तुझा जागा। येर शिणसी वाउगा ॥ ३ ॥
> तुका म्हणे श्रम। एक विसरतां नाम ॥ ४ ॥

मोहपाशांत जीव आपणास व्यर्थ बांधवून घेतो, मोहामुळें तो तृष्णेच्या मागें लागतो, तृष्णा केव्हांहि तृप्त न होणारी असल्यामुळें श्रम मात्र अखेर त्याच्या पदरांत पडतात! आणि हें सर्व हरीचें विस्मरण झाल्यामुळें होतें. श्रीहरीचें स्मरण निरंतर करावें, त्याच्या स्मरणाचें उत्तम साधन जें त्याचें नाम तें मुखांत ठेवावें म्हणजे त्याच्या कृपेनें मोहतृष्णादि अनर्थपरंपरेपासून जीवाची सुटका होते म्हणून—

> हरि मुखें म्हणा हरि मुखें म्हणा। पुण्याची गणना कोण करी ॥१॥

---

१७

जनकराजानें एकदां एका ब्राह्मणास हद्दपारीची शिक्षा केली, ती ऐकून ब्राह्मणानें शांतपणानें विचारलें, "आपला अंमल कोठवर चालतो! ह्मणजे आपल्या राज्याची मर्यादा कोठवर आहे!" यावर राजानें क्षणभर चिंतन करून उत्तर केलें, "खरोखर पाहतां माझें असें कांहींच नाहीं. आजवर हजारों पृथ्वीपति होऊन गेले व प्रत्येक जण पृथ्वीला 'माझी'च ह्मणत गेला! पृथ्वीपति सारे काळमुखीं गडप झाले, पृथ्वी मात्र आहे तशीच स्थिर आहे! ह्मणून माझा अंमल व माझें राज्य ही भाषाच खोटी ठरते. माझें कांहीं नाहीं, राज्य माझें नाहीं, लोक माझे नाहींत; कुटुंब माझें नाहीं, मीही माझा नाहीं!! हे ब्राह्मणसत्तमा! माझ्या राज्याचा कोठें पत्ता नसल्यामुळें तुझ्या इच्छेस येईल तेथें तूं रहा."

दनभक्तीनें श्रीहरीला स्ववश करावें. भाऊबिजेच्या दिवशीं बुद्धीची आत्मराजाशीं भेट करवावी, व आपल्या ठिकाणचें आत्मसुख आपण भोगून तें जगास द्यावें.

**जयापरतें आणिक नाहीं । जयातें इंद्रियें नेणती कहीं ।**
**तें आपणचि आपलिया ठायीं । होऊनि ठाके ॥ १ ॥**
**जें हें चित्त लया जाये । आणि चैतन्यचि अवघें होये ।**
**ऐसी प्राप्ति सुखोपायें । आहे येणें ॥ २ ॥**
**' सुख परब्रह्माचिये ' मेळीं । मग सामरस्याचिये राउळीं ।**
**महासुखाची दिवाळी । जगेंसी दिसे ॥ ३ ॥** --ज्ञानेश्वरी.

---

१८

ईश्वराच्या प्रेमानें सारें विश्व व्यापून गेलेलें आहे व त्याच्या दयेच्या दुधावर सारे प्राणिमात्र पोसलें जात आहेत हा विचार मनांत आला म्हणजे भक्ताच्या अंतःकरणाला जें अनिवार प्रेमसुख वाटतें तें वाचेनें कोण वानूं शकेल ?

१९

प्रेम हेंच परमात्म्याचें रूप आहे. परमात्मा देवस्वरूप आहे. प्रेम हें जर ईश्वराचें स्वरूप आहे, तर द्वेष हें सैतानाचें, काळाचें, मृत्यूचें रूप आहे हें कांहीं वेगळें सांगणें नको.

# १२ धर्माकडे केव्हां वळणार ?



१ '**पहिले** तें हरिभजन, दुसरें तें राजकारण' ह्या समर्थांच्या वचनांचा बोध अद्यापही आमच्या बऱ्याच सुशिक्षित देशबांधवांस होत नाहीं हें आश्चर्य होय. निव्वळ रजोगुणी चळवळीनें कोणत्याही राष्ट्राचें खरें कल्याण होत नाहीं. चळवळींना सामर्थ्य आहे, पण 'भगवंताचें अधिष्ठान' आधीं पाहिजे. धर्माचें अधिष्ठान बळकट मिळाल्यावांचून, राष्ट्रांत व पुढाऱ्यांत स्वधर्मनिष्ठेची ज्योत पेटल्यावांचून, उपासनेला दृढ चालविणारे लोक राष्ट्राच्या धुरेला मिळाल्यावांचून केवळ राजस मनोवृत्तींनीं प्रेरित होऊन केलेल्या चळवळी दुःखपरिणामी झाल्याशिवाय राहत नाहींत. 'मामनुस्मर' हें आधीं आणि 'युद्धच च' हें नंतर असाच देवाचाही उपदेश आहे.

२ आधीं एकनाथतुकारामांच्या कार्यांनीं राष्ट्राच्या अंतरंगांत शुद्ध सत्वगुणाचा विकास झाला, नंतर सत्वगुणाच्या पूर्ण कह्यांत राहणारें समर्थांचें कार्य झालें व शेवटीं स्वधर्मनिष्ठेच्या पायावर राजकारणाची उभारणी करणाऱ्या शिवाजीमहाराजांच्या कार्याची सिद्धि झाली. हा इतिहास डोळ्यांपुढें असतांना विद्वान् लोकांचे उद्योग 'आधीं कळस मग पाया रे' या न्यायानें उलटे होऊं लागावेत हें राष्ट्राचें दुर्दैव होय. आधीं राजकीय सुधारणा पाहिजे ह्मणणारा एक वर्ग आहे, आधीं सामाजिक सुधारणा पाहिजे म्हणणारा दुसरा वर्ग आहे, आणि आधीं औद्योगिक सुधारणा पाहिजे असें ह्मणणारा तिसरा एक वर्ग आहे. राष्ट्रांतील बहुतेक सुशिक्षित लोक, ह्या तीन वर्गांत वांटले गेले आहेत. उरले सुरले 'ललित' वाङ्मयाच्या नादीं लागले आहेत. पण आधीं धर्मसंजीवन पाहिजे अशा विचाराचे लोक नवीनांत अद्याप फारसे दिसूं लागले नाहींत. आधीं धर्मजागृति झाली पाहिजे, धर्माचें तेज लोकांच्या अंगांत खेळूं लागलें पाहिजे म्हणजे बाकीच्या सुधारणा धर्माच्या तंत्रानें चालून राष्ट्रोद्धाराचा योग्य मार्ग आक्रमिला जातो. सर्व चळवळी धर्मतंत्र पाहिजेत असें निदान आपल्या राष्ट्राचा पूर्वेतिहास सांगतो.

३ आगगाडी रुळावरून चालली म्हणजे पॅसेंजर्स मुक्कामास जाऊन पोंचतात, तीच रूळ सोडून चालली कीं गाडी उलथीच्या पालथी होऊन मोडून जाते व उतारूंचे हाल होतात; त्याचप्रमाणें राष्ट्राच्या सर्व चळवळी आचारविचारयुक्त धर्माच्या रुळावर चालल्या तरच यशस्वी होतात, नाहींतर चळवळींनीं नुसत्या रजोगुणाची धूळ उडून लोकांचें शांतिसमधान बिघडतें, ऐक्यभाव मोडतो, नाना पंथ व नाना पक्ष उत्पन्न होऊन समाज जास्तच विस्कळित होतो.

४ राजकीय पुढाऱ्यांना धर्माचें दिव्य अंग नसेल तर त्यांच्यांत पक्षाभिमान संचरून अन्योन्यद्वेष माजतो व त्या द्वेषाचें विष अनुयायांच्याही अंगांत संचरून सारा समाज मत्सरद्वेषानें फाटून जातो! सामाजिक सुधारकांना धर्माचें वळण नसेल तर ते केवळ आधिभौतिक सुधारणांच्या नादीं लागून विधवाविवाह, जातिभेद व स्त्रियांची उन्नति असले विषय घेऊन त्यांचाच उथळपणानें काथ्याकूट करीत बसतात व समाजाचें तारूं भलतीकडेच झुकत जातें. ललितवाङ्मयांतही परक्यांच्या उष्ट्या कल्पना, प्रणयकथा, व धर्मविरोधी नाटकें यांचाच सुकाळ होत जातो.

५ भगवंतांनीं श्रीगीतेंत ज्ञानाचे सात्विक, राजस व तामस असे तीन प्रकार सांगितले आहेत. सर्व भूतांच्या ठिकाणीं एक अव्यय भाव पाहण्यास शिकविणारें ज्ञान सात्विक होय. 'तयापरी जया ज्ञाना। शिवादि तृणावसाना। इया भूतव्यक्ति भिन्ना। नाडळती' तें सात्विक ज्ञान होय. हें ज्ञान मोक्षलक्ष्मीचें भुवन होय. सात्विक ज्ञान भेदांतही अभेद पाहायला शिकवितें. जग हें भेदरूप आहेच, पण भेदांत अभिन्नत्वाचा जो दोरा आहे तो सात्विक ज्ञान हातांत आणून देतें. राजस ज्ञान भेदाची कास धरून चालणारें असतें. जेणेंकरून 'ऐक्यबोधाची भावना निमोनि' जाते तें राजस ज्ञान होय. Unity in Diversity हें सात्विक ज्ञान व Diversity in Unity हें राजस ज्ञान. भेद असतील तर त्यांत अभेद पाहणारें तें सात्विक ज्ञान व अभेद असेल तेथेंही भेदभाव उत्पन्न करणारें तें राजस ज्ञान. सात्विक ज्ञानानें खरें ऐक्य होतें, राजस ज्ञानानें भेदभाव, कलह, तंटेबखेडे माजतात व तामस

ज्ञानानें बाहुल्या उलट्या होऊन ऐक्य असेल तेथें भेद दिसून येतो आणि जेथें ऐक्य शोधायचें तेथें तें न शोधतां खाण्यापिण्यांत, आहार-विहारांत, लग्नकार्यांत तात्पर्य देहबुद्धिवर्धक लौकिक व्यवहारांत, ऐक्याभास उत्पन्न होतो. ज्ञानोबाराय सांगतात कीं, तामस ज्ञान 'विधीचें वस्त्र टाकून देऊन नागवें' होऊन हिंडतें. "येरीहि शास्त्रबाह्यकारीं । जे निंदेचे विटाळावरी । बोळविलेंसें डोंगरीं । म्लेंच्छधर्माच्या ॥" (ज्ञानेश्वरी १८–५५० ) तामस ज्ञानाच्या वर्णनांत पुढील ओंवी आढळते:–

तैसें निषिद्ध सांडूनि घावें । कां विहित आदरें घ्यावें । हें विषयांचोनि नांवें । नेणेंचि जे ॥ ५५७ ॥

तामसज्ञानी ह्म० वस्तुतः अज्ञानीच. कावळ्याला जसा खाद्याखाद्यांत विवेक नसतो त्याप्रमाणें निषिद्ध टाकायचें व शास्त्रानें सांगितलेलें विहित तेवढेंच आचरायचें असा विवेक त्याला रहात नाहीं. 'जेतुलें आड पडे दिठी । तेतुलें घेचि विषयासाठीं' जें दृष्टीला पडेल व मोहक वाटेल तें भोगार्थ घ्यायचें हाच त्याचा स्वभाव. सुशिक्षित समजलेली व गोरटी मुलगी दिसली मग तिच्या जातपातीचा कुलशीलाचा विचार न करतां हुरळून जाऊन तिच्याशीं लग्न कर, किंवा स्वच्छ दिसणारे रुचकर पदार्थ कोणाच्याही दुकानांत दिसले कीं, टाक तोंडांत, असला प्रकार तामस ज्ञानालाच शोभतो. ह्या स्वछंदीपणाला शास्त्र आड येतें म्हणून शास्त्राला व जातिवर्णधर्माला शिव्या देऊन तामस पुरुष पुन्हां आपल्या 'उदारमतां' चा ( Liberal views ) टेंभा पाजळायला मोकळेच ! ज्ञानोबाराय सांगतात:–

**तयाचिपरी खाद्याखाद्य । न म्हणे निंद्यानिंद्य ।**
**तोंडा आवडे तें मेध्य । ऐसाचि बोध ॥ ५६० ॥**
**आणि स्त्रीजात तितुकें । त्वचेंद्रियेंचि वोळखे ।**
**तियेविषयीं सोयरिके । सादराचि बहु ॥ ५६१ ॥**

तात्पर्य, देहभरण व विषयसेवन हेंच इतिकर्तव्य मानून त्याच्या प्राप्तीसाठीं वेदशास्त्रपुराणें व संतवचनें यांना धाब्यावर बसविणें व स्वेच्छाचारानें वागणें हें तामस ज्ञान होय ! मग त्याला कितीही गोड

गोड नांवें द्या, त्याचा जयजयकार करा व अशा स्वच्छंदी वर्तनाला आळा घालणाऱ्या धर्माच्या नांवानें बोटें मोडा. तें ज्ञान तामसच होय.

जें चामाचे डोळे दाविती । जें इंद्रियें गोडी लाविती । तेंचि साच—
हे प्रचीती । फुडी जया ॥ ५७३ ॥

चामाच्या डोळ्याला दिसेल तेंच खरें व इंद्रियांना रुचेल तेंच गोड असा निर्धार करविणारें तें तामस ज्ञान. तात्पर्य, वेदशास्त्राच्या आज्ञेनें चालणारें व भेदांत अभेद पाहणारें तें **सात्विक** ज्ञान, वेदशास्त्रांच्या भानगडींत न पडतां कामक्रोधाभिमानाच्या ऊर्मीप्रमाणें चालणारें व भेदभाव वाढविणारें तें **राजस** ज्ञान व वेदशास्त्रांच्या आज्ञा उल्लंघून इंद्रियवशतेनें चालणारें तें **तामस** ज्ञान, अशा त्रिविध ज्ञानाच्या सामान्य व्याख्या लक्षांत ठेवून सांप्रतच्या चळवळींकडे पाहिलें म्हणजे काय बोध होतो, तो प्रत्येकानें आपल्याशीं विचार करूनच घ्यावा. सात्विक ज्ञान धर्मानुकूल आहे, राजस ज्ञान धर्मबुद्धीला अवरोधक आहे व तामस ज्ञान धर्मप्रतिकूल आहे. धर्म हा एकच इहपरलोकीं तारक असल्यामुळें धर्माच्या अनुरोधानें चालण्यांत कल्याण आहे, एवढें मात्र निश्चित आहे.

६ आपल्याला पाश्चात्य राष्ट्रांच्या समाजस्थितीचा विचार करण्याचें कारण नाहीं, पण आमच्या चळवळी त्यांच्या अंध अनुकरणानें चाललेल्या असल्यामुळें आपल्यापुरता प्रसंगवशात् त्यांचा उल्लेख करणें क्षम्य होईल असें वाटतें. **योने नोगुची** नामक एक प्रख्यात जपानी ग्रंथकर्ता अमेरिकेंतील ' न्यू यॉर्क नेशन ' पत्रांत लिहितो: " सांप्रतच्या महायुद्धाचा अर्थ आम्हीं पौर्वात्यांनीं काय समजायचा ? माझ्या मतानें तो एवढाच आहे कीं, पाश्चात्य सुधारणेचा किंवा संस्कृतीचा रम्य डोलारा कोसळून पडला आहे ! आमच्या समाजघटनेपेक्षां तो अधिक उदात्त व मजबूत पायावर उभारला असेल असा आमचा आजवर भ्रम होता तो यानें पार उडाला आहे ! आम्ही आमच्या समाजघटनेपेक्षां त्याची योग्यता अधिक समजत होतों; पण आमची चूक आम्हांस आतां कळून आली. आम्ही पाश्चात्य सुधारणेच्या बाह्य भपक्याला व्यर्थ भुलून गेलों होतों........ह्या मायेच्या मृगजळाच्या

मागें आम्हीं उर्गाच लागलों होतों; पण तिच्या पोटांत मुळच्या रानटीपणाचे राज्यतृष्णादि अनेक दोष आहेत. पाश्चात्य राष्ट्रांत मोठालीं कॉलेजें व जगडव्याळ भपकेदार अनेक संस्था असल्या तरी आफ्रिकेच्या नागव्या जंगली लोकांसारखेच तिकडचे लोक आहेत. एकमेकांवर तोफांचे गोळे टाकणारे, मृत माणसांना तुडवीत जाणारे हे लोक

**वृक्षवल्ली आह्मां सोयरीं वनचरें ।**
**पक्षीहो सुस्वरें आळविती ॥ १ ॥**

ह्याप्रमाणें वृक्षांवर व पशुपक्ष्यांवर प्रेम कसें करूं शकतील ? गेल्या चाळीस वर्षांत युरोपांत अनेक कवि, धर्मोपदेशक व तत्वज्ञ झाले व 'शांति व मनुष्यजातीचें भ्रातृत्व' ह्यावर त्यांनीं ग्रंथ लिहिले व व्याख्यानें दिलीं. त्या सर्वांचा परिणाम काय हाच व्हावा कीं, जिकडे तिकडे रक्ताच्या नद्या वहाव्यात, व एकेका रात्रींत प्रेतांचे पर्वतप्राय ढीग पडावे !! त्यांनीं शुद्ध मनानें उपदेशिलेली ती 'दिव्य शांति व भ्रातृत्व' कोठें गेलें ? चाळीस वर्षें शांततेचा केलेला उपदेश कोठें गेला ?....आह्मी पौर्वात्य लोक यापुढें पाश्चात्यांच्या 'प्रेम, भूतदया, शांति' इत्यादि विषयांवरील तत्वज्ञानाच्या गोष्टींवर विश्वास ठेवणार नाहीं. आमचा जपान देश पाश्चात्य राष्ट्रांपासून इतका दूर आहे याबद्दल मला आनंद वाटतो ! माझा पाश्चात्यांच्या सुधारणेविषयींचा पूज्यभाव नष्ट होत चालला आहे. मी नुकताच युरोपांतून आलों आहें व तिकडची सुधारणा व्यक्तीच्या सुखावर व अहंकारावर उभारली आहे असें मला आढळून आलें ! त्यांच्यांत परस्परप्रेम कमी आहे, त्यांची संघटना तुटकपणाची आहे व तिचा शेवट कलहांत व युद्धांत व्हावा हें साहजिक आहे. पाश्चात्यांची रहाणी सुखशांतीला व आत्मविकासाला पोषक नाहीं, तिच्यापासून नेहमीं खळबळ व दुःखच उत्पन्न होणार." ह्या जपानी लेखकाच्या भाषेंत थोडासा कडकपणा असला तरी त्यांतील सिद्धांत खरा असल्यास त्याचा आमच्या पुढाऱ्यांनीं विचार करावयास नको काय ? आमच्या बालविवाहादि व जातिभेदादि समाजसंस्था पाश्चात्य लोकांत नाहींत म्हणून आमच्या

सुधारकांनीं त्यांच्यावर हत्यार उपसण्याचा जो सपाटा चालविला आहे तो चालविण्यापूर्वी प्रौढविवाहादि चालींनीं पाश्चात्यांचें तरी काय कोटकल्याण केलें आहे याचा विचार करावयास पाहिजे. उलट आमच्या समाजसंस्था धर्ममूलक असल्यामुळें शेंकडों वर्षें टिकल्या आहेत व अनेक आपत्तींतून व राज्यक्रांत्यांतून व धर्मक्रांत्यांतून त्यांनीं आमच्या राष्ट्राचें संरक्षण केलें आहे. त्यांच्या मुळाशीं खोल हितकर जीं तत्त्वें आहेत त्यांचा विचार करून त्यांचें पुनरुज्जीवन करा, त्यांत कांहीं अज्ञानानें दोष शिरले असतील तर तत्त्वाला धक्का न लावतां ते कळकळीनें काढून टाका, पण सर्व चळवळी धर्माच्या जागृतीला व समाजाच्या ऐक्यभावाला पोषक होतील अशा रीतीनें करा.

७ धर्माच्या जागृतीनें सात्विकभाव प्रगट होऊन दया, क्षमा, शांत्यादि दिव्य गुणांचा समाजांत प्रसार होईल. भेद आतां पुरे झाले! भेद समाजांत कलह पेटवितात, प्रेमभावाचा व ऐक्याचा नाश करितात व राजस–तामस अहंकारांना लोकांचीं मनें धर्मबोध जाणण्यास असमर्थ करतात. भेदभाव मोडून सर्वांचा धर्माच्या पायावर एकदिल होईल अशा धोरणावर उद्योग करावयास पाहिजेत. राजकीय व सामाजिक सुधारकांनीं व सामान्यतः सर्व प्रपंची जीवांनीं समर्थांच्या पुढील बोधानुरूप आपलें वर्तन ठेवल्यास सर्व राष्ट्राचें कल्याण होणार आहे.

———

२०

सर्व विश्व ईश्वरमय आहे. भक्त देवालयांतच देवाला पाहतो असें नाहीं, तर सर्वत्र पाहतो, कारण देवावांचून अणुभर रिता ठाव नाहीं. ‘ जिकडे पाहे तिकडे बाप । विठ्ठल आणि रखुमाई. ’ देवाला सर्वत्र पहावें आणि अश्व, चांडाल, गाय, गाढव, हे सर्वच ईश्वरमय भासावें. विष्णुमय जग पाहणें हाच वैष्णवांचा धर्म आहे म्हणजे भक्तांचाच स्वभाव आहे असें तुकोबाराय म्हणतात.

# १३ साधुकथा.



Whatever is is for the best. –*Pope.*

**जें कांहीं करिसी तें माझें स्वहित । —श्रीतुकाराम.**

१. एक होते साधुबुवा. ते नेहमीं आनंदी असत. दुःख कसें तें त्यांना ठाऊक नव्हतें. कांहीं झालें तरी 'वा! फार उत्तम' असे शब्द त्यांच्या तोंडून बाहेर पडत. एक प्रपंची मनुष्य एकदां त्यांजकडे गेला व आपली संसाराची रडकथा त्यांस सांगून म्हणाला, 'काय करावें, वीस वर्षें झालीं, तीन बायका केल्या पण पुत्र होत नाहीं, एवढी संपत्ति असून चोरापोरी जाणार!' साधुबुवा एकदम म्हणाले 'वा! फार उत्तम.' त्या मनुष्यास वाईट वाटलें व तो हिरमुष्टी होऊन गेला. एका वर्षानें त्याला मुलगा झाला, आनंद होऊन त्यानें थाटाचें बारसें केलें व पेढ्यांचा पुडा घेऊन तो साधुबुवांकडे गेला. साधुबोवा म्हणाले, 'वा! फार उत्तम!' चार दिवसांनीं तें पोर मेलें. पुन्हा तो साधूकडे जाऊन तें रडगाणें गाऊन रडूं लागला तरी साधूच्या तोंडून 'वा! फार उत्तम' असेच शब्द निघाले. मग मात्र तो गृहस्थ फार संतापला, चिडला व हा साधु नसून ढोंगी आहे असें वाटून तो शौचास गेला असतांना मागून त्याच्या डोक्यांत कुऱ्हाड घालून त्याला ठार मारण्याचा त्यानें गुप्तपणें निश्चय केला. याप्रमाणें त्या साधूला मारण्याची संधी मिळाली, पण मध्यंतरीं एक विघ्न आलें. तो गृहस्थ हातीं पाजळलेली कुऱ्हाड घेऊन एका झुडपाआड दबा धरून बसला. साधूची स्वारी तिकडेच चालली होती. पांच हात राहिले असतील तों साधूच्या पायांत भला मोठा कांटा शिरला, व तेथेंच बसून तो कांटा काढूं लागला. रक्ताची धार लागली होती तरी साधूची प्रसन्नता अचल राहिली. त्या गृहस्थास वाटलें कीं, अशा स्थितींत साधूस मारण्यापेक्षां पुन्हा केव्हां तरी मारूं आणि आज त्याच्या साह्यास जाऊन त्याचा विश्वास संपादन करून ठेवूं. त्यानें कुऱ्हाड मागेंच टाकिली व साधूच्या जवळ आला आणि तो दणाट्या कांटा व ती रक्तबंबाळ स्थिति पाहून

त्याचें चित्त जरा मवाळ झालें. साधूनें त्यास पाहतांच ‘ वा! फार उत्तम ’ म्हणून उद्गार काढले. असें दुःख प्राप्त झालें असतांना असा आनंदोद्गार कां काढतां असें त्या गृहस्थानें विचारलें तेव्हां साधू ह्मणाला, “ बाबारे ! देव ज्या वेळीं जें योग्य तेंच करीत असतो. पहा बरं ! या कांट्यानें मजवर केवढे उपकार केले ते. हा कांटा पायांत बोंचला नसता तर या वेळीं माझ्या डोक्यांत कुऱ्हाड पडणार होती ! ” तो गृहस्थ ओशाळला व त्यानें अपराध कबूल करून साधूची क्षमा मागितली. साधु म्हणाला; “ बाबा रे ! जगणें किंवा मरणें जसें आपल्या हातचें नाहीं, तसें मधलीं सुखदुःखेंही आपल्या हातचीं नाहींत, मग उगीच कुंथत बसण्यापेक्षां देव न्यायी व दयाळू आहे यावर पूर्ण विश्वास ठेवून समाधानांत राहणें हें अधिक शहाणपणाचें नाहीं का ? ”

२. एकदां एक गृहस्थ सहज बागेंत फिरत असतां एका कवठाच्या झाडाखालीं आला. त्याला कवठें फार आवडत. समोर तांबड्या भोपळ्याचे वेल पसरले होते व त्याला घागरीएवढाले भोपळे आले होते. त्याच्या सहज मनांत आले कीं ‘कवठें इतकीं गोड असून किती लहान असतात, त्यापेक्षां तीं या भोंपळ्याएवढीं मोठीं असतीं तर किती बहार झाली असती ! हें त्याच्या मनांत येतें न येतें तोंच एक कौठ वरून पडलें तें नेमकें त्याच्या डोक्यावर पडलें. थोडेंसें लागलें व पुन्हां तो आपल्याशीं म्हणाला “ काय चमत्कार आहे पहा. खरेंच मीं मनांत आणलें त्या-प्रमाणें कौठ जर भोपळ्याएवढें असतें तर या वेळीं माझा कपाळमोक्षच झाला असता. बरें झालें कीं देवानें कौठें एवढीं लहान केलीं ! देवानें जें केलें आहे तें बरोबर आहे. त्यांत नांव ठेवण्याला मनुष्याला अणुरेणुइतकीही जागा नाहीं. ”

३ एक होता राजा. त्याच्या दरबारीं एक उत्तम ज्योतिषी होता. तो पिढीजाद ज्योतिषी असून त्याला दर सोमवारीं वाड्यांत येऊन आठवड्याचें ज्योतिष सांगावें लागे. त्याचें ज्योतिष अगदीं तंतोतंत बरोबर उतरे व त्याचा राजदरबारीं मानमरातब मोठा असे. राजाला मुलगा होत नव्हता म्हणून त्यानें वारंवार ज्योतिषीबोवाला आपली व राणीची पत्रिका पाहून गणित वर्तवायला सांगावें. ज्योतिष्यानें

राजाला सांगितलें कीं, आपल्याला तिसऱ्या राणीपासून वयाच्या ४७ व्या वर्षीं पुत्र होणार आहे. राजाचें राणीवर अत्यंत प्रेम असे तरी त्यानें पुत्रलोभानें आणखी दोन राण्या केल्या. ज्योतिष्यानें सांगितल्याप्रमाणें ठरलेल्या वर्षीं त्या महिन्यांत त्या दिवशीं तिसऱ्या राणीला पुत्र झाला. लोकांस बहुत देणग्या मिळाल्या. ज्योतिषीबुवासही मोठी देणगी मिळाली. राजपुत्र मोठा होत होत सोळा वर्षांचा झाला. प्रथम फाजील लाडांमुळें व पुढें राजकीय गुंतागुंतीमुळें राजकारणांत दुफळ्या त्रिफळ्या होऊन एका पक्षानें राजपुत्राचा पक्ष उचलून धरिल्यामुळें राजपुत्र अत्यंत चढेल, गर्विष्ठ, क्रूर व व्यसनी निघाला, आणि राज्यांतलें सुखसमाधान पार जाऊन त्याच्या ऐवजीं बेदिली व अशांति यांचा राज्यभर प्रसार झाला. राजा चिंतातुर झाला तरी पुत्रमोहानें अंध होऊन पुत्राच्या वाईट कृत्यांवरही पांघरूण घाली व प्रजेस राजी राखण्याचा प्रयत्न करी. अशा स्थितींत एक दिवस राजपुत्र सर्पदंश होऊन एकाएकीं मरण पावला. राजा फार शोकाकुळ झाला. आणि ‘ ज्योतिषानें हा प्रसंग येणार म्हणून आधींच मला कां नाहीं सांगितलें’ हा विचार मनांत येतांच स्वारी ज्योतिषीबोवावर फार गरम झाली. राजे लोक सामान्यतः लहरी आणि चंचल स्वभावाचे असतात. एका क्षणांत संतुष्ट होऊन सोन्याचा पाऊस पाडतील, दुसऱ्या क्षणांत घरावरून नांगर फिरवतील. जो आज त्यांचा कंठमणि असेल तो दुसऱ्या कोणाच्या शिकवणीवरून उद्यां दुष्मानासारखा वाटेल. वाऱ्याची मोट बांधवेल पण राजाचें मन कोणालाही हातीं घेऊन दीर्घकाळ राखवणार नाहीं. ज्योतिषी राजाच्या अत्यंत प्रीतींतला पण आज त्याच्यावर मर्जी खप्पा होऊन ‘ त्याचें घरदार जप्त करावें व त्याची गाढवावरून धिंड काढून नगराबाहेर हाकून द्यावें ’ असा राजाचा हुकूम सुटला. राजसेवक ज्योतिष्याच्या घरीं हुकूम बजावण्यास जातात तोंच राजाच्या मनांत दुसरी लहर येऊन तो घोडा फेकीत ज्योतिष्याच्या घरीं आला. तेथें पहातो तों ज्योतिषीबुवा राजाच्या तसबीरीवर पुष्पहार घालून घरांत सर्वांस पेढे वांटीत आहेत ! राजाचा संताप शिगेला चढला व तो मोठ्या त्वेषानें म्हणाला, ‘ सारी नगरी राजपुत्राच्या मर-

णानें दुःखशोकाकुल झाली असून तुम्ही पेढे वांटून आनंद करितां काय?" ज्योतिषी धिटाईनें म्हणाले, 'महाराज! आनंद करायचाच हा दिवस आहे,' असें म्हणून त्यानें एक सील केलेलें पत्र राजाच्या हातीं दिलें. हें सील राजपुत्र जन्मला त्याच दिवशीं केलें असून ज्योतिष्यानें पांच बड्या अंमलदारांच्या त्यावर त्याचवेळीं सह्या घेऊन ठेवल्या होत्या. राजानें तें सील फोडलें व आंतील राजपुत्राची पत्रिका व त्यावरील भविष्य वाचलें. त्यांत स्पष्ट लिहिलें होतें कीं, "याच्या बालपणीं राजाला फार सुख वाटेल पण हा राजपुत्र अत्यंत वाईट निघेल. हा सोळा वर्षें सात महिनें व नऊ दिवस होतांच सोमवारीं सायंकाळीं सर्पदंशानें मरेल व या गंडांतरांतून वांचलांच तर याच्या हातून अठराव्या वर्षीं त्याच्या दोन माता, याचा बाप, सात प्रसिद्ध मुत्सद्दी व तीन लक्ष प्रजाजन यांची हत्या होईल." हें वाचतांच त्या प्रजावत्सल राजाच्या डोळ्यांतून आनंदाश्रु वाहिले व तो म्हणाला, "ज्योतिषीबुवा, माझें चित्त समाधान पावलें. खरोखर दयाळू परमात्मा जें करितो तें आपल्या हिताचेंच करितो. तुम्ही घरीं आनंद केला असाच दौंडी पिटवून आपण सर्व राज्यांत आनंद करूं."



२१

सत्य, दान, क्षमा, सदाचार, अहिंसा, तप व दया हे गुण जेथें आहेत तेथें ब्राह्मणत्व आहे. हे गुण ज्यापाशीं आहेत तो शूद्र असून शूद्र नव्हे व हे ज्यापाशीं नाहींत तो ब्राह्मण असून ब्राह्मण नव्हे!

२२

वेद, वेदांत, शास्त्रें, पुराणें, सद्ग्रंथ ह्या सर्वांत परमात्मा वास करितोच. पण संतांच्या प्रेमपूर्ण व परम पवित्र हृदयमंदिराइतकें अत्यंत प्रिय स्थळ त्याचें दुसरें कोणतेंही नाहीं!!

# १४ पतिपत्नीसंबंध.



१. हा लग्नकार्यांचा मोसम असून जिकडे तिकडे वधूवरांची मिळवणी होत आहे. प्लेगनें वजाबाकी करावी व लग्नांनीं बेरीज करावी ! बेरीज व वजाबाकी मिळून प्रपंचाचा प्रवाह चालला आहे. जन्म आणि मृत्यु हे एकमेकांच्या पोटांत आहेत !

२. लग्न ह्मणजे एकी, लग्न म्हणजे जुळणें, एक होणें, सांधणें. लग्नानें वधूवर एक होतात, पण व्याहीविहिणी मधल्या मध्यें उगीच रुसतात, फुगतात, भांडतात व एकीच्या ऐवजीं बेकी करितात. लग्नानें दोन घराण्यांत सख्य व्हावें, पण बहुशा वांकडें आलेलें दृष्टीस पडतें !

३. लग्न म्हणजे केवढा पवित्र प्रसंग, पण याची जाणीव किती थोड्या जागीं असते ! कालिदासानें म्हटल्याप्रमाणें 'गृहिणी सचिवः सखी मिथः प्रिय शिष्या ललिते कलाविधौ' म्हणजे स्त्री ही गृहिणी आहे, सचिव आहे, सखा आहे व शिष्य आहे. लग्न ही दोन जीवांची गांठ आहे.

४. स्त्री ही केवळ शिष्या आहे एवढेंच नव्हे तर गुरुही आहे. सोशिकता, समाधानी, प्रेम, भाविकपणा व संस्कारशुद्धि या गुणांत हिंदु स्त्रिया हिंदु पुरुषांहून श्रेष्ठ आहेत, त्या त्यांना गुरुरूप आहेत.

५. "प्रेयो मित्रं बंधुता वा समग्रा । सर्वे कामाः शेवधिर्जीवितं वा ॥
स्त्रीणां भर्ता धर्मदाराश्च पुंसां । इत्यन्योन्यं वत्सयोर्ज्ञातमस्तु" ॥ १ ॥

वरील श्लोक भवभूतीनें मालतीमाधव नाटकांत नूतन वधूवरांच्या सबंधानें घातला आहे तो सर्व वधूवरांनीं आपल्याला लावून घ्यावा. स्त्रीला भर्ता व भर्त्याला धर्मपत्नी प्रिय मित्राप्रमाणेंच असून एकमेक एकमेकांला सर्वस्वाइतके किंबहुना जीविताइतके प्रिय आहेत.

६. तापत्रयनिवारणाचें छत्र । भार्येपरता नाहीं मित्र ॥ ८७ ॥
भार्या सकळ श्रमांतें हर्ती । भार्या सकळ सुखांतें कर्ती ।
भार्या पवित्र वंशधर्ती । यशकीर्ति स्त्रीसंगें ॥ ८८ ॥

वरील ओंव्या मुक्तेश्वरी भारतांतल्या आहेत. स्त्रीजातीची निंदा करूं नका, स्त्री ही भीष्मरामहनुमंतादि नररत्नांची खाण आहे असा कबीराचा दोहरा आहे:—

नारी वोका निंदो नये नारी नरका खान।
जिस खानमे पैदा हुवे भीष्मरामहनुमान॥ १॥

७. स्त्रीची निंदा धर्मशास्त्रानें केली नाहीं, कोणत्याही सुजनानें केली नाहीं; तथापि त्यांना डोक्यावर घेऊन सुधारकांप्रमाणें कोणी नाचलेही नाहींत. गृहिणी घराचें सौभाग्य आहे, सौख्य आहे व समाजसुधारणेचा पाया आहे; तथापि 'न स्त्री स्वातंत्र्यमर्हति' हा मनूचा सिद्धांत व 'स्त्री राखावी जैसी दासी' हा तुकारामाचा सिद्धांत उल्लू सुधारकांशिवाय इतरांना मननार्ह वाटल्याशिवाय राहणार नाहीं.

८. हिंदु लोक आपल्या बायकांना गुलामासारखें क्रौर्यानें वागवितात ही मिशनऱ्यांनीं उठविलेली व 'स्त्रियांच्या परवशतेचें' रडगाणें गाणाऱ्या सुधारकांनीं झेललेली एक गप्प आहे ! स्त्रियांना प्रेमानें न वागविणारे व त्यांना केवळ विषयसुखाचें साधन समजणारे असंस्कृत लोक आमच्या समाजांत नाहींत असें नाहीं, तथापि इंग्लंडांतल्या 'मताभिलाषिणी' स्त्रियांप्रमाणें उच्छृंखलपणा करण्यास मात्र आमच्या स्त्रिया तयार होणार नाहींत !

९. कुटुंब हें एक ऑफिस आहे,राज्य आहे.ऑफिसचें काम नीट चालावें म्हणून सुपरिंटेंडंट, हेडक्लार्क, इत्यादि व्यवस्था जशी इष्ट आहे किंबहुना अशा उच्चनीचपणाच्या पायऱ्या लावल्याशिवाय ऑफिसचें काम सुयंत्रित चालत नाहीं; त्याप्रमाणें कुटुंबव्यवस्थेंत स्त्रीनें पुरुषाच्या अंकित राहिलें पाहिजे एवढाच आमच्या धर्मशास्त्रकारांचा मुद्दा आहे. घरांत स्त्रियांना मुबलक स्वातंत्र्य आहे व सौख्यहि आहे.

१०. आफिसांतला उच्चनीचपणा ज्यांनीं निमूटपणें सहन करावा त्यांनींच गृहव्यवस्थेंतला नीचोच्चभाव उडविण्यास तयार व्हावें हा अविचार नव्हे तर काय !

११ तात्विकदृष्ट्या सर्व विश्व ब्रह्मरूप आहे तथापि व्यवहार व्यवहार ह्मणूनच यथाशास्त्र चालला पाहिजे.

१२ गृहस्थधर्म उत्तम प्रकारें चालविण्यास व संसार सुखाचा व परमार्थरूप करण्यास धर्मपत्नीची अनुकूलता पाहिजे. धर्मपत्नी या 'पदवीवरूनच स्त्रीच्या मुख्य कामगिरीचा बोध होतो. पतिपत्नींनीं मुख्यतः धर्मसाधन करावयाचें आहे.

१३ 'धर्मे चार्थे च कामे च' ही प्रतिज्ञा वराला लग्नप्रसंगीं करावी लागते. पण हाय हाय! किती थोडे पुरुष या पवित्र प्रतिज्ञेचें परिपालन करीत आहेत!

१४ एका पुरुषाला एक पत्नी व एका पत्नीला एकच भर्ता ही 'नीति.' एका पुरुषानें अनेक बायका करणें गैर आहे, तसेंच एका स्त्रीनें दुसऱ्या भर्त्याची कल्पना मनांत आणणेंही पापमूलक आहे.

१५ आमच्या धर्मशास्त्रानें स्त्रियांसंबंधाचा बंदोबस्त करून पुनर्विवाहास बंदी केली आहे. सुधारकांनीं विधवापुनर्विवाहासाठीं अकांडतांडव करण्यापेक्षां एकपत्नीव्रताचरणावर भर देऊन स्त्रियांप्रमाणें पुरुषवर्गाच्या उन्नतीची धडपड करायला हवी होती व आहे. विधवांना पुनर्विवाह करितां येत नाहीं तर विधुरांचे पुनर्विवाह बंद करण्याची धडपड करा! पुरुषवर्गाला पुनर्विवाहाची मोकळीक आहे तर ती स्त्रीवर्गालाही द्या असें ह्मणणें ह्मणजे इमारतीचा पूर्वभाग पडका झाला आहे ह्मणून पश्चिमभागाची तटबंदी पाडण्याइतकें वेडगळपणाचें आहे!

१६ धर्माचरण हा मनुष्याच्या जीविताचा प्रधान हेतु आहे. विषयवैराग्य पावून भगवत्पदप्राप्ति करून घेणें व अवशिष्ट आयुष्य परोपकारांत वेंचणें हा नरजन्माचा मुख्य हेतु आहे. हें अनुसंधान तुटूं न देतां सामाजिक प्रश्नांचा विचार करा. देवासाठीं जगणें आहे का विषयासाठीं जगणें आहे याचा प्रथम विचार पाहिजे.

१७ अर्वाचीन सुधारणेनें विषयसुखलालसा वाढत आहे, स्त्रियांना शिक्षण नको व त्यांची उन्नति करूं नका असें कोण म्हणेल! समर्थ रामदास स्वामींनीं अक्का व वेणु या बालविधवांसाठीं लौकिक विषयांचें शिक्षण देणाऱ्या व त्यांना पुनः विषयांत पाडणाऱ्या 'शाळा' काढल्या नाहींत तर त्यांना ब्रह्मविद्या शिकवून कृतार्थ केलें. समर्थांना स्त्रीवर्गाची कळकळ नसती तर त्यांनीं या बालविधवांना दूर केलें असतें. पण

साधूंची ह्मणजे खऱ्या समाजधुरीणांची दृष्टि फार व्यापक असते व धर्मशास्त्राला न अवमानितां व पूर्वपरंपरेला न लाथाडतां ते समाजाचीं सर्व कामें करीत असतात.

१८ भगवत्प्राप्ति हा मनुष्यजन्माच्या सफलतेचा मुख्य हेतु डोळ्यांपुढें ठेवून 'तस्मात् शास्त्रं प्रमाणं ते कार्याकार्यव्यवस्थितौ' या तत्वानुसार सामाजिकप्रश्न सोडविण्याचा समाजहितेच्छूनें प्रयत्न करावा.

१९ लग्नाचा प्रसंग ह्मणजे दोन जिवांच्या जीवनांतला अत्यंत महत्वाचा प्रसंग होय. लग्न ह्मणजे कॉन्ट्रॅक्ट नव्हे. वधूवरांच्या अंतरात्म्याची ऐक्यता ह्मणजे लग्न. "जीव जीवांत घालावा। आत्मा आत्म्यांत मिसळावा" हा समर्थांचा उपदेश वधूवरांनीं आपापल्यापुरता तरी सार्थ करावा. पतीची पत्नीवर सर्वतोपरी प्रभुता स्थापित होते व पत्नीच्या उद्धाराचा बोजा पतीच्या शिरावर पडतो! पण हें ओळखील त्याला!

२० निरंजन माधव योगी या पेशवाईतल्या सत्कवीनें आपल्या गंगावती नामक भार्येच्या आध्यात्मिक उन्नतीसाठीं सहा ग्रंथ केले आहेत, त्यापैकीं एका ग्रंथांत निरंजन माधव प्रेमानें पत्नीस 'तूं तव भाक्तिमती नारी। माझी परमप्रिय सुंदरी' याप्रमाणें गौरवून म्हणतातः—

**गौरीशंकराची वल्लभा। किंवा सूर्याची प्रभा।**
**अग्निशक्ति शुभा। स्वाहा जैशी॥ १॥**
**किंवा चंद्राचा दीप्ती। किंवा वायूची सदागती।**
**कुबेराची संपत्ती। तैशी तूं मम प्रिया॥ २॥**
**किंवा ब्रह्माणी ब्रह्माची। इंदिरा जैशी विष्णूची।**
**प्राणप्रिया आत्मयाची। चित्कळा जैवी॥ ३॥**
**जैशी शर्करेची मधुरता। कां उदकाची शीतळता।**
**सुधेची शुभ्रता। नये निवाडितां भिन्नत्वें॥ ४॥**
**तुज मज भिन्नभाव तत्वता। नसोन बोलापुरता।**
**जल लहरी हे वार्ता। उपाधीकृत!॥ ५॥"**

पतिपत्नींच्या एकात्मतेचे इतके प्रेमळ उद्गार मला दुसऱ्या कोठेंही आढळले नाहींत. असें ऐक्य होणें हा विवाहाचा हेतु लक्षांत ठेवून वधू व वर परस्परांशीं प्रेमानें वागतील तर मृत्युलोक स्वर्गच होईल! विषयबुद्धीचें ऐक्य नको, तें पशुपक्षांतही असतें.

# १५ गोपाळराव आगरकर.



१. आगगाडींतून प्रवास करीत असतां आपल्या उद्दिष्ट ठिकाणीं पोंचेतों वाटेंत किती तरी गांवें लागतात ! स्टेशन आलें कीं आपण चवकशी करितों, परंतु तें स्टेशन सोडून गाडी पुढें चालू झाली कीं त्या स्टेशनाचें नांवही विसरतों ! तरी एखाद्या महत्वाच्या स्टेशनाचें नांव आपल्या सहज लक्षांत राहतें. विद्यार्थिदशेंत अभ्यासाची गाडी चालू झाली म्हणजे इयत्तारूपी स्टेशनें लागतात ! आपण आपल्या मुक्कामाला येऊन पोंचलों ह्मणजे मागील प्रवासांतील बहुतेक गोष्टी विसरून जातों. आपल्या शिक्षणक्रमांत किती तरी विद्यार्थ्यांची व शिक्षकांची ओळख होते; पण त्यांतील दहा पांच विद्यार्थी व चार दोन शिक्षक यांखेरीज सर्वांच्या ओळखी बहुधा बुजून जातात.

२. आमच्या शिक्षकांपैकीं ज्यांचें अद्यापही आह्मांस सप्रेम स्मरण होतें त्यांपैकी गोपाळराव आगरकर हे एक होत. त्यांची साधी राहणी, निगर्वी वृत्ति, शिकवण्याची कळकळ, विद्यार्थ्यांनीं किती वेळां, कोणत्याही प्रकारच्या व कितीही शंका विचारल्या तरी न रागावतां समाधान करण्याची उत्सुकता, मतविरोध झाला असतांही विद्यार्थ्यांविषयीं प्रेम अबाधित ठेवणारी मनाची उदारता इ. त्यांचे गुण ज्यांच्या प्रत्ययास आले त्यांना त्यांना गुरुवर्यांविषयीं प्रेम व आदर वाटल्यावांचून राहिला नाहीं. त्यांच्या हाताखालीं शिकत असतां सहांपैकीं शेवटच्या दोन वर्षांत बहुधा असा एखादाच दिवस गेला असेल कीं, ज्या दिवशीं आमचा आणि या गुरुजींचा कोणत्या तरी विषयावर वाद झाला नाहीं ! त्यांना वाद फार प्रिय असे व वाद करितांना त्यांच्या मनाची समता सहसा ढळत नसे. सामाजिक विषयांसंबंधीं त्यांच्या आणि आमच्या स्वभावसिद्ध विचारौघांत जमीनअस्मानाचें अंतर ! ते सुधारणावादी, आमचा ओढा परंपरेच्या विचारांकडे ! त्यांच्या मतांचा पुरस्कार करणें आम्हांला आतांही इष्ट वाटत नाहीं. त्यांचें मन मिळ,

हक्सले वगैरे पाश्चात्य तत्वज्ञांच्या विचारांनीं अगदीं भारून टाकलें होतें. बुद्धीलाच मुख्य प्रामाण्य दिल्यामुळें स्वबुद्धीला न पटेल तें सारें झूट असें मानणाऱ्यांपैकीं ते एक प्रमुख होते. शास्त्रपुराणांविषयीं त्यांचें मन पूर्वग्रहदूषित झालेलें असल्यामुळें शास्त्रपुराणांचा अभ्यास करण्याची त्यांना आवश्यकता वाटली नाहीं. त्यांच्याजवळ तर्कास्त्र नेहमीं सज्ज असे व यच्चयावत् विषयांवर ते या अस्त्राचा उपयोग करीत !

३. आगरकरांशीं विद्यार्थिदशेंत वाद करायची ताकद आम्हांत कोठून असणार ? तथापि आम्ही त्यांच्याशीं झोंबी घेत असूं व वस्ताद मुलाला कुस्ती खेळायला शिकवतो तसे ते वादपटुत्वाच्या नाना तऱ्हा शिकवीत. त्यांच्या शिक्षणांत अभ्यासक्रमाला धरून असा फार थोडा भाग असे. परीक्षेचीं उत्तरें मुलांनीं कशीं द्यावींत इकडे त्यांचें बिलकूल लक्ष नसे. मुलांना स्वतंत्र विचार करण्याची संवय लागावी असें त्यांचें मुख्य धोरण असे. त्यांचा आमचा गुरुशिष्यत्वाचा संबंध चांगला सहा वर्षें टिकला, व त्यांच्या आमच्यांत स्वाभाविक विचारप्रवृत्तींचा जरी ३६ चा आंकडा होता तरी त्यांच्याविषयीं आमच्या मनांत निरंतर प्रेमादर असे व आम्हांला नक्की सांगतां येतें कीं, मतभिन्नतेमुळें त्यांच्या मनांत आमच्याबद्दल गढूळपणा उत्पन्न झाला नाहीं इतकेंच काय पण त्यांचें शुद्धप्रेम केव्हांही कलुषित झालें नाहीं. ‘ सुधारक ’ आणि ‘ मुमुक्षु ’ यांच्या विचारांत आज जो भेद तोच तेव्हांही त्यांच्या आमच्यांत होता. तथापि गोपाळरावजी मनाचे अत्यंत थोर होते. त्यांचें मन मोकळें, व अंतःकरण उदार असे. त्यांच्या कर्कशतर्कपद्धतीहून त्यांचें अंतःकरण अगदीं भिन्न होतें; ह्मणजे ते ममताळु व सहनशील असत. वादांत खंबीर पण चित्तांत मृदु यांत त्यांचें सर्व वर्णन आलें. शिष्य वादप्रवीण झाला म्हणजे त्यांना पुरे, ते त्याच्या मतांकडे पहात नसत. ते वादांत सहसा कधीं रागावत नसत, फार फार रागावले तर बुक्की टेबलावर जोरानें आपटून ‘ तुला या गोष्टी आज समजत नाहींत, पण पुढें कळून येतील ’ असें म्हणून क्षणभर गंभीर होत, पण दोन मिनिटांच्या आंतच आपल्या विशाळ मिशांतून फार गोड हंसत व त्याबरोबर सर्व मुलांचें

हास्य मिसळलें जाऊन जो क्लासभर निर्भेळ आनंद पिके त्याची कल्पना गोपाळरावांच्या विद्यार्थ्यांवांचून इतरांस होणें कठिण !! त्यांची विनोदी, निष्कपट व आनंदी मुद्रा आमच्यापुढें अजून दिसते. मतें काय, मतें कालाच्या पोटांत विलय पावतात. मनुष्याचीं मतें त्याच्या परिस्थितीप्रमाणें, त्याच्या व्यासंगाप्रमाणें, त्याच्या संगतीप्रमाणें, बनत असतात. पण हीं मतांचीं बाहेरचीं टरफलें टाकून आंत पाहिलें पाहिजे, व तशीं आगरकरांचीं मतें विसरून त्यांच्या अंतरात्म्याकडे पाहिलें म्हणजे त्यांचा आत्मा फार प्रेमळ, अत्यंत निष्कपट व उदार, पराकाष्ठेचा कनवाळु होता व याच त्यांच्या गुणांचें स्मरण होऊन अम्हांला त्यांचेविषयीं अत्यंत प्रेम वाटतें. असा विशुद्धात्मा दुर्लभ होय.

४. आमच्या गरीबीमुळें न्यू इंग्लिश स्कुलांतील आमचा सर्व विद्याभ्यास व कालेजांतील दोन वर्षें इतकीं 'फी' ह्म० नादार विद्यार्थी ह्मणून गेलीं. एकदां सहामाही परीक्षेंत मी नापास झालों तेव्हां अर्थातच फीशिपवरचा हक्क बुडाला, पण प्रि० आगरकरांस भेटून फीशिप चालू ठेवण्याची विनंति करण्यासाठीं मी वर गेलों. शिक्षकांच्या खोलींत फीशिपच्या वांटणीचाच विचार चालला असून एक शिक्षक म्हणाले, " पांगारकराला फीशिप देतां उपयोग नाहीं. तो पेट्रिअट आहे, टिळकाइट आहे !' यावर आगरकर झट्दिशीं आवेशानें म्हणाले ! ' छे छे ! त्याला फीशिप दिलीच पाहिजे. तो होतकरू, उत्साही आहे ! ' हें वाक्य कानावर पडतांच आम्ही तसेच खालीं आलों व दुसऱ्या दिवशीं बोर्डावरील यादींत नांव मिळालें ! ही गोष्ट क्षुल्लक आहे पण आपल्याहून भिन्न विचारांच्या ओघांतला हा विद्यार्थी आहे हें कळूनही गोपाळरावांच्या चित्ताची समता व औदार्य कसें ढळत नसे हें दाखविणारी आहे म्हणून येथें दिली आहे. हा विद्यार्थी आपल्या संस्थेंत असून त्याचे विचार आचार आपल्याहून भिन्न आहेत एवढ्याचसाठीं त्याच्यावर नाराजी करणारे शिक्षक कोठें कोठें असतील त्यांनीं यापासून फार धडा घेण्यासारखा आहे. गोपाळराव आगरकरांच्या

मनाचा मोठेपणा अनुपम आहे. मोठ्या गोष्टींत मोठेपणा दाखविणारे मोठे लोक पुष्कळ असतात, पण लहान गोष्टींतही ज्यांचा मोठेपणा प्रगट होतो तेच खरे मोठे होत !

५. इ० स० १८९० सालीं आम्ही मॅट्रिकच्या वर्गांत होतों. आगरकर आमचे इंग्रजीचे गुरु. आमचे वर्गांत वेलणकर म्हणून एक विद्यार्थी होता. तो वयानें, समजुतीनें व धीटपणानें सर्वांत वरचढ होता. वर्गांत आगरकरांच्या तासाला नेहमीं देव आहे कीं नाहीं, धर्म, स्त्रीशिक्षण, पुनर्विवाह, मुलांमुलींना एकत्र शिकवणें, जातिभेद, असल्या विषयांवर गप्पा व चर्चा चालत. आगरकरांचे विचार आम्हांला आवडत नसत, पण आगरकर फार आवडत. वेलणकरानें एके दिवशीं येथें जोगेश्वरीच्या देवळांत आगरकरांच्या कुटुंबाला देवी-पुढें नाकदुऱ्या काढतांना व सुवासिनीची खणानारळांनीं ओटी भरतांना पाहिलें. त्यानें ही गोष्ट शाळेंत येतांच आम्हां विद्यार्थ्यांना सांगितली व आगरकर वर्गांत येतांच त्यांना प्रश्न विचारण्याचें सर्वानुमतें ठरविलें. प्रश्न फार नाजुक, पण आगरकरांना विचारस्वातंत्र्य व उघड चर्चा फार आवडे. पहिलाच तास आगरकरांचा होता. गुरुजी वर्गांत आले ! सर्व वर्गांत क्षणभर गांभीर्य पसरलें. वेलणकर उभा राहिला त्या वेळीं प्रश्नोत्तरें झालीं तीं येणेंप्रमाणें:—

‘ Sir ! I have to ask a question ‘ मला एक प्रश्न विचारायचा आहे. ’

‘ हूं, विचार. ’ वेलणकर स्तब्ध ! ‘ विचार, विचार. ’

‘ मला ! ’ पुन्हां स्तब्ध !

‘ मला काय ? ’

‘ मला भय वाटतें ! ’

‘ भय ! आणि माझें ! मी का वाघ आहें का सिंह ? मुलांना खातों काय ? ’

‘ मला अभय असावें ! ’

‘ पूर्ण अभय आहे. वाटेल तें बोल. मी रागावत नाहीं ’ गुरुजी

विश्वास उत्पन्न करणाऱ्या गोड आवाजानें ह्मणाले.

' मी काल जोगेश्वरीच्या देवळांत गेलों होतों. तेथें मिसेस आगरकर यांना देवीपुढें कान धरून मस्तक वाकवतांना व बायकांची खणानारळांनीं ओटी भरतांना पाहिलें ! '

गुरुजी शांतपणानें हंसून म्हणाले, ' बरं मग ? '

' मग काय ? '

मग मला काय म्हणतोस ? ' What a fool you are ! '

' त्यांचें हें वागणें आपल्या मताशीं विसंगत आहे ! '

' पण मी म्हणजे मिसेस आगरकर नव्हे ( हंशा ).

' पण त्या आपलें कुटुंब आहेत ! '

' दोघांचे देह वेगळे आहेत हें तुला कबूल आहे ना ? '

' हो, उघडच आहे. '

' मग तिचे विचार माझ्या विचारांहून भिन्न असतां कामा नयेत असें कां तुझें म्हणणें ? '

' होय असेंच. '

' किती मूर्ख ! माझें वागणें माझ्या विचारांशीं विसंगत आहे असें तू सिद्ध करून दाखवितोंपर्यंत ह्या तिच्या कृतीमुळें माझ्यावर आक्षेप कसा येऊं शकतो ? हें पहा, ती एक जुन्या विचारांची मूर्ख बायको आहे. (' She is an old-fashioned foolish lady. ') मी तिला माझे सुधारणेचे विचार सांगत असतों, पण तिच्या मतांत फरक होऊन हे नवे विचार तिला पटले नाहींत तोंवर तिच्या वर्तनस्वातंत्र्यांत ढवळाढवळ करण्याचा मला हक्क आहे असें मी समजत नाहीं. लोकांना सुधारायचा प्रयत्न करावा, पण नवे विचार त्यांना पटले नाहींत तोंवर त्यांचें आचारस्वातंत्र्य हिसकावून घ्यावें असें मी कधीं सांगायचा नाहीं. हा जुलूम होईल ! सुधारणा म्हणजे जबरदस्ती नव्हे, ज्याला त्याला आपल्या मताप्रमाणें वागूं द्यावें यालाच मी सुधारणा म्हणतों. '

६. गोपाळरावजींचा स्वभाव असा उमदा व मोकळा असे. त्यांत आंत एक बाहेर एक असें नसे. कुत्सितपणा त्यांच्या निर्मळ मनाला

कधीं शिवलाच नाहीं. देवाधर्मावर त्यांचा विश्वास नव्हता. पांढरा चुना; हिरवीं पानें, काळी सुपारी यांच्या संयोगांत तांबडा रंग उत्पन्न होतो त्याप्रमाणें पांच असोत पंचवीस असोत तत्वांच्या संयोगांत जी चेतना उत्पन्न होते तिला जीव अगर आत्मा म्हणतात; पुनर्जन्म, परलोक, देव इ० सर्व भ्रम आहेत हे त्यांचे विचार ते वर्गांत मुलांना नेहमीं सांगत असत. हे विचार नास्तिकपणाचेच होत. या विचारांचा माझ्याही मनावर वर्ष सहा महिने परिणाम होऊन नास्तिकपणाकडे मनाचा ओघ वाहूं लागला होता ( इ० स० १८९४ ), पण पूर्वजांच्या पुण्यानें व भगवत्कृपेनें नास्तिक्यपिशाचिकेच्या हातून मी लवकरच सुटलों ! आगरकरांचें वर्णन 'अंतरीं निर्मळ वाचेचा रसाळ' या शब्दांत होतें. तारुण्यांतच त्यांना दम्यानें झपाटलें होतें.

७. आगरकरांसारखे शुद्धमनस्क पुरुष—मग ते सुधारकांत अथवा जुन्या वर्गांत असोत—दुर्मिळ होत. आगरकरांच्या योग्यतेचा सुधारक त्यांच्यानंतर आमच्या पहाण्यांत कोणीही आला नाहीं.त्यांचीं मतें कालांतरानें कदाचित् सुधारलीं असतीं पण जर त्यांत प्रामाणिक फरक झाला असता तर माधवराव कुंटे प्रार्थनासमाज नीरस म्हणून सोडून म्हातारपणीं पायांत चाळ बांधून तुकोबांच्या अभंगांचें भजन करीत त्याप्रमाणें गोपाळरावही आपल्या बदललेल्या मताप्रमाणें वागण्यास कचरले नसते याविषयींही आम्हांस शंका नाहीं ! त्यांच्या ठिकाणीं मतस्वातंत्र्याप्रमाणें आचाराचेंही धैर्य होतें. आगरकरांची लेखनपद्धति फार परिणामकारक असे. त्यांच्या जोरदार, विनोदी व भेदक भाषाशैलीला मराठी वाचक एका काळीं फार लुब्ध झाले होते. 'केसरी' व 'सुधारक' यांचे त्यावेळचे सामने आम्हांला चांगले आठवतात. आगरकर देशाभिमानी होते, खंदे मराठी लेखक होते, प्रसिद्ध शिक्षक होते, पण ते मुख्यतः सुधारणेचे पुरस्कर्ते होते. त्यांच्या मतांचा कलिकालक्रमानुसार पुष्कळ प्रसार झाला आहे. आम्हांस तो पसंत नाहीं तथापि मोकळी व प्रांजळ मनोवृत्ति, शुद्ध व निष्कपट अंतःकरण व लोकहिताची खरी कळकळ या त्यांच्या गुणांस्तव त्यांचें नांव आम्हांला अत्यंत प्रिय आहे. त्यांचें देहा-

वसान इ० स० १८९५ सालीं झालें. त्यावेळीं त्यांचे प्रेतयात्रेला जमलेला विद्यार्थिसमूह आपला प्रेमळ बाप गेला असें समजून ढळढळां रडला. विद्यार्थ्यांशीं ते एकजीव झाले होते. इतका शिष्यजन-प्रिय गुरु विरळच सांपडेल. ते नास्तिक असले तरी असले उदारधी नास्तिक लक्षावधि आस्तिक ह्मणविणाऱ्यांपेक्षां व ‘ चित्ते वाचि क्रियायां ’ एकरूप नसलेल्या लोकांपेक्षां फार श्रेष्ठ होत. आम्ही आस्तिक्युबुद्धि हा सर्व सद्गुणांचा राजा समजतों, तथापि त्याच्याही अभावीं गोपाळरावांची योग्यता कमी समजत नाहीं. ते थोरच होते.

---

२३

वारंवार नित्य व्यवहारांत दुसऱ्याच्या उपयोगीं पडणें, ममतेचे चार शब्द बोलून त्याच्या अंतरात्म्याला सुखविणें, प्रच्छन्नपणानें म्ह. गुप्तपणानें दानादि प्रकारें परोपकारांत निमग्न असणें, परोपकाराच्या कामांत देहकष्ट होत असतांना देहाचें सार्थक होत आहे असेंच भावणें व ‘ जीव जीवांत घालून आणि आत्मा आत्म्यांत मिसळून ’ व्यापक होणें हीच विष्णूची खरी पूजा होय ! ह्या पूजेनेंच तो प्रसन्न होतो. व्यापक होऊन व्यापकाला पुजावें.

२४

प्रवृत्ति आणि निवृत्ति अशीं इंजनें, म्हणजे परमार्थ पुढें आणि प्रपंच मागें अशा थाटांत, साक्षात्काराच्या घाटमाथ्यापर्यंत गेलें कीं दोन्ही पाणी प्यावयास सोडून कांहीं काळ बुद्धिरूपी गाडी खुशाल विसांवा घेत थांबतें. असें केल्याशिवाय तिला गत्यंतरच नसतें !

# १६ नामदार गोखले !

—·—:०:——

१. गेल्या शुक्रवारीं रात्रीं ( ता. १९।२।१५ ) १०॥ वाजतां हिंदुस्थानचा एक मोहरा गमावला !! ना० गोपाळ कृष्ण गोखले हे ५० वें वर्ष सुरू होण्यापूर्वींच परलोकवासी झाले. शनिवारीं पुणें शहरावर अपूर्व शोकाची छाया पसरली होती. गोपाळरावांच्या स्मशानयात्रेस २० हजार समाज जमला असून त्यांत सर्व धर्मांचे, जातींचे व पंथांचे लोक होते ! एवढा मोठा समुदाय ओंकारेश्वराच्या वाळवंटावर केव्हांहीं जमला नसेल ! यावरून पुण्यांत अनेक पंथभेद असले तरी मोठ्या मनुष्याचें खरें गुणगौरव करण्याची पुण्याच्या जनतेंत शक्ति आहे हें सिद्ध झालें.

२. गोपाळरावांचा जन्म इ. स. १८६६ च्या मे महिन्यांत चिपळूण तालुक्यांत झाला. हे १८ व्या वर्षीं बी. ए. झाले व पुण्याच्या डेक्कन एज्युकेशन सोसायटीस ह्म० न्यू स्कुलास येऊन मिळाले. पुढें फर्ग्युसन कॉलेजांत यांनीं इंग्लिश प्रोफेसरचें काम केलें. तें करीत असतांनाच ते राजकारणांत शिरले व गेल्या २० वर्षांत विलायतेंत व हिंदुस्थानांत हिंदी लोकांची राजकीय स्थिति सुधारावी म्हणून त्यांनीं अश्रांत परिश्रम केले. मुंबईच्या व कलकत्याच्या कायदेकौन्सिलांत त्यांनीं लोकांच्या तर्फे फार उत्तम कामगिरी केली. ते दोनदां राष्ट्रीय सभेचे अध्यक्ष होते. त्यांनीं राजकीय सुधारणेचा प्रयत्न सुव्यवस्थित रीतीनें व्हावा म्हणून येथें ‘ सर्व्हंटस ऑफ इंडिया सोसायटी ’ नामक एक संस्थाही स्थापन केली असून तिला बरेच कार्यक्षम सभासदही मिळाले आहेत. गोपाळरावजी राजकरणांत चांगले निष्णात झाले असून हिंदुस्थानांतलि पहिल्या पंचकडींतच त्यांची गणना होत असे.

३. गोपाळरावजींचा स्वभाव प्रेमळ होता. ते उत्तम वक्ते, उत्तम हिशेबी व उत्तम मुत्सद्दी म्हणून प्रसिद्ध होते. त्यांचीं भाषणें इंग्रजींतच

होत. प्रजा व राजा यांच्या दरम्यान शक्य तितका सलोखा घडवून आणण्याची त्यांची खटपट होती. लोकांचा व सरकारचा विश्वास त्यांनीं संपादन केला असून आणखी ५।१० वर्षें ते जगते तर त्यांनीं शिक्षण-विषयक बाबतींत मोठी क्रांति घडवून आणली असती. सरकाराकडे त्यांचें मोठें वजन होतें तरी तें लोकहितार्थ त्यांनीं मिळविलें होतें यांत शंका नाहीं. हिंदुस्थानचें—आहे या स्थितींत—शक्य तितकें अधिक कल्याण व्हावें, लोकांना राजकीय हक्क जास्त मिळावे, लोक शिक्षण-संपन्न होऊन आपल्या हक्कांकरितां तयार व्हावे असा त्यांचा हेतु होता. नृपतिजनपदानां दुर्लभः कार्यकर्ता ' या कोटींत त्यांची गणना कर-ण्यास कोणतीच हरकत नाहीं. सरकारचा रोष होऊं न देतां लोकांच्या तर्फेनें लोकांच्याच हितासाठीं निःस्वार्थपणानें काम करणारे कांहीं मुत्सद्दी देशाला पाहिजेच असतात. त्यांपैकीं गोखले प्रमुख होते.

४. गोपाळरावजी एवढ्या लौकिकास जे चढले त्यास मुख्य कारण त्यांची अलौकिक ' गुरुभक्ति ' होय. त्यांचे गुरु न्यायमूर्ति माधवरावजी रानडे हे होते. त्यांनीं राजकारणाचा व अर्थशास्त्राचा अभ्यास माधव-राव रानडे यांजपाशीं केला व ते गुरूनें रेखून दिलेल्या राजमार्गानें गेले. गुरूनें शिष्यास मनःपूर्वक शिकविलें व शिष्यानें गुरुभक्ति उत्तम प्रकारें गाजविली यांत शंका नाहीं. राजकारणविषयांत अशी बुद्धिवंत व कार्यक्षम गुरुशिष्यांची जोडी दुसरी नाहीं. गुरु बहुरंगी होते, शिष्यानें त्यांचा एकच रंग उचलला पण तो गुरूला व साऱ्या देशाला भूषणभूत होईल अशा रीतीनें पुरा उचलला व त्यांत कांहीं अंशीं गुरू-वरही ताण करून दाखविली. न्या० रानडे आज हयात असते तर ' शिष्यादिच्छेत्पराजयम् ' या न्यायानें या बाबतींत शिष्याचा उत्कर्ष पाहून त्यांस धन्यताच वाटली असती. गुरूच्या पश्चात् १५ वर्षें त्यांनीं लोककार्य केलें.

५. गोपाळरावजींत कर्तृत्व किती उत्तम प्रकारचें होतें, हें त्यांनीं आपल्या पद्धतीनें काम करणारे तरुण एकत्र जमवून त्यांना कामाला लावलें या एकाच गोष्टीवरून दिसून येतें. त्यांच्या कामाशीं व मतांशीं

कोणाचा मतभेद असेल, पण गोपाळरावांचा स्वार्थत्याग, त्यांची निष्कपट देशभक्ति, व त्यांची उत्साहपूर्ण कर्तृत्वशक्ति याविषयीं समंजस माणसांत मतभेद नाहीं अशी आम्हांस खात्री वाटते.

६. गोपाळरावजींच्या मृत्यूची वार्ता शनवारीं हिंदुस्थानभर पसरून सर्वत्र लहानथोरांना पराकाष्ठेचें दुःख झालें. मुंबईस व्यापारपेठा व शाळा बंद ठेवण्यांत आल्या होत्या. गोखल्यांच्या सोसायटीकडे व त्यांच्या कन्येकडे चोहोंकडून थोरामोठ्यांच्या तारांचा जो वर्षाव होत आहे व कलकत्ता, मद्रास, लाहोर, प्रयाग वगैरे ठिकाणीं दुःखप्रदर्शक सभांवर सभा भरत आहेत त्यावरून त्यांच्याविषयीं लोकांचा केवढा पूज्यभाव होता हें स्पष्ट दिसतें. एवढा लौकिक गोखल्यांना त्यांच्या अंगच्या गुणांमुळेंच अल्पावकाशांत मिळाला. अठराव्या वर्षीं ते बी. ए झाले; विसाव्या वर्षीं प्रोफेसर, एकविसाव्या वर्षीं सार्वजनिक सभेच्या त्रैमासिकाचे संपादक, पंचविसाव्यांत प्रांतिक सभेचे सेक्रेटरी, एकोणतिसाव्यांत राष्ट्रीयसभेचे सेक्रेटरी, एकतिसाव्यांत रॉयल कमिशनचे साक्षीदार, चौतिसाव्यांत मुंबईकायदेकौन्सिलचे सभासद, छत्तिसाव्यांत व्हॉइसरॉयच्या कायदेकौन्सिलचे सभासद, एकोणचाळिसाव्यांत राष्ट्रीय सभेचे अध्यक्ष व चाळिसाव्या वर्षीं सर्व्हंट ऑफ इंडिया सोसायटीचे संस्थापक; ह्याप्रमाणें विसाव्या वर्षीं त्यांच्या भाग्याची कमान जी चढूं लागली तिचा ४० व्या वर्षीं कळस होऊन ४० वर्षांच्या वयांतच गोखले हिंदुस्थानांतल्या पहिल्या रांगेंतल्या कार्यकर्त्या पुरुषांच्या माळिकेंत जाऊन बसले! ह्या योग्यतेस चढण्यास त्यांची बुद्धिमत्ता, कामाची चिकाटी, ध्येयाची निश्चितता, राष्ट्रहिताची कळकळ, सततोद्योग, लोकमान्यता इत्यादि अनेक दुर्मिळ गुण कारण झाले यांत शंका नाहीं.

७. हिंदुस्थानच्या दुर्दैवानें आमच्यांत अनेक बाबतींत तीव्र मतभेद आहेत. बऱ्याच वेळां हा मतभेद विरुद्ध पक्षाचे मनुष्याचे यथार्थ गुणग्रहणाचे बाबतींतही आड येतो असें राजकारणांत, सामाजिक व वाङ्मयात्मक बाबतींतही दिसतें! आपल्या पुठ्यांतला मनुष्य असला कीं त्याचें स्तुतिस्तोत्र गायचें व तो विरुद्ध पुठ्यांतला असला किंवा

दिसला अगर नुसता भासला तर त्याच्या चांगल्या कामाचीही वाखा-णणी करण्याला लाजायचें, किंबहुना होईल तितका त्याचा पाडाव करायला पाहायचें, ही पक्षपाती दृष्टि सर्वच पक्षांत आढळून येते ! हा दोष जाऊन निर्मल गुणग्रहणता ज्या दिवशीं उत्पन्न होईल त्या दिवशीं मतभेदांचाही तीव्रपणा जाऊन अंतःकरणें एक होऊं लागतील. हिंदी लोकांना अनेक पक्ष कशाला पाहिजेत ? सर्वांचा मिळून एकच पक्ष असावा. ज्याला जें काम उत्तम साधेल तें त्यानें कायावाचामनानें करीत असावें व इतर कार्यकर्त्या माणसांविषयीं आदरभाव ठेवावा, फारच फार तर औदासीन्य ठेवावें. सर्वच पक्ष पोटांत घेऊन सर्वांशीं समानतेनें व आत्मीयत्वाच्या भावनेनें वागणारा हिंदी लोकांचा एक मोठा राष्ट्रीय पुढारी निर्माण व्हावा अशीं स्पष्ट चिन्हें दिसत आहेत. ही आत्मीय-त्वाची भावना मारून मुटकून आणलेली कामास पडणार नाहीं. खऱ्या धर्माच्या जागृतीनें ही उत्पन्न होईल. ‘ जीव जीवांत घालावा—आत्मा आत्म्यांत मिसळावा ’ ही उदात्त धर्मभावना भरतपुत्रांत उत्पन्न होवो व सर्व भारती पुढारी प्रेमानें, सहकारितेनें राष्ट्रकार्य करायला लागोत अशी पांडुरंगचरणीं प्रार्थना करून पुरें करितों.

---

२४

दगडांच्या राशीकडे पाहून एक सत्पुरुष एकदां आपल्याशीं म्हणाला:—“हे सर्व पदार्थ नरदेहाच्या प्राप्तीची लालसा धरून बसले आहेत!” धन्य नरदेहाची, कीं ज्यांत सर्वत्र आत्मीयपणानें पाहतां येतें!

२५

पाटांत गाळ सांचल्यामुळें शेतास पाणी हवें असूनही चार दिवस पाणी सोडण्याचें काम बंद ठेऊन गाळ काढावा लागतो. तद्वत् ज्ञानो-पार्जनांत खंड पाडून चित्तशुद्धीसाठीं कांहीं दिवस मन कोरडें ठेवावें लागतें. साधु पुरुषांच्या चरित्रांत या संधिकालाची कांहीं अपूर्वच मौज दृष्टीस पडते.

# १७ सर्वराष्ट्रीय प्रार्थना.



१. हे पांडुरंगा ! आम्ही सर्व जीव तुझ्या कृपेची याचना करितों. ममैवांशो जीवलोके ' या तुझ्याच वचनाधारें तुझ्याशीं सजातीयत्वाचें नातें लावायचें धारिष्ट करून तूं जसा सर्व करून अकर्ता आहेस, तसे प्रपंचव्यवसाय करीत असूनही तुझें असंगपणाचें सुख आह्मांला भोगूं दे. तुझें सच्चिदानंदपणाचें वस्त्र आमच्या अंगावर घाल, व देहबुद्धीची फाटकी घोंगडी काढून टाक.

२. हें कर्मचक्र तूं केव्हां फिरवलेंस तें तुझें तुलाच माहीत. हें अनादि असलें तरी तुझ्या सुदर्शनचक्रापुढें हें शांतच होणार. तुझें मंगल दर्शन आह्मांला दे, ह्मणजे या दुस्तर कर्मापासून आम्ही सुटूं. तुझ्या कृपेवांचून आमची सुटका कशानेंही होणार नाहीं.

३. कर्म निष्काम करावें असें शास्त्र सांगतें, पण कामनेवांचून प्रायः आमचें कर्मच होत नसल्यामुळें निष्कामकर्मयोग तूंच शिकव. तूं बुद्धीचा प्रेरक आहेस. आम्ही जीवपणाच्या अहंकारानें जें जें कर्म करितों तें तें दुःखपर्यवसायी होतें, ह्मणून जें कर्म बंधक होणार नाहीं व तुझी प्राप्ति करवील तें कर्म करण्याची बुद्धि तूंच दे. आमच्या बुद्धीला तूं प्रकाशित कर. ' ददामि बुद्धियोगं तं येन मामुपयांति ते ' असें तुझ्याच तोंडचें वचन आहे. कर्म तुला वाहिल्यानेंच निष्काम होणार. तुझ्याशीं तन्मय होऊन केलेलें सर्व कर्म निष्कामच होय.

४. तूं सगुण आहेस, कां निर्गुण आहेस, कां सगुणनिर्गुण आहेस याविषयीं जाणत्यांत मतभेद असोत, सगुणनिर्गुण हीं दोन्ही तुझींच रूपें आहेत असा तुझ्या प्रिय भक्तांचा अनुभव आहे. दोनही रूपें जर तुझींच आहेत तर त्यांत एक श्रेष्ठ व एक कनिष्ठ किंवा एक अलीकडचें व एक पलीकडचें असें आह्मीं कसें ह्मणावें ? आमचें तुझ्या उभय रूपांना निरंतर वंदन असो.

५. देवा ! दोन्हीं तुझींच रूपें आहेत असें म्हटलें खरें, पण खरेंच विचारशील तर आह्मांला तुझें ' गोजिरें सगुण रूप ' च पुरें .आहे. आह्मांला तुझें सगुणरूपच आवडतें. माझ्या अव्यक्तरूपाला झोंबणाऱ्यांना अधिकतर क्लेश आहेत, असें तूंच अर्जुनाजवळ ह्मणालास ना ? मग आम्हांला तुझें व्यक्त रूप—सगुणसाकार रूप आवडलें तर त्यांत काय चुकतें ? जाणते लोक हंसोत, पण तुझी प्रसन्नता जोडली ह्मणजे झालें.

६. तुझें साजिरें रूप डोळे भरून आम्हांला पाहतां येतें, तुला बाहूंनीं कवटाळतां येतें, तुझ्या पायावर मस्तक ठेवतां येतें, हातांनीं तुझी पूजा करितां येते, तुला हितगुज पुसतां येतें. असा संतांनीं तुला आम्हांसाठीं सोपा करून ठेवला आहे. सिद्धान्न आयतें पुढें वाढून आलें असतां त्याला झिडकारून स्वयंपाकाची सिद्धता करूं पाहणाऱ्याला काय म्हणावें ? तुझ्या सगुण प्रेमाचा सुखसोहळाच आम्हांला भोगूं दे.

७. नारायणा ! अहो तुह्मी ही पाषाणाची खोळ पांघरून बसलांत तरी तुह्मी भक्तवात्सल्यानें अनेक संतांना दर्शनें दिलींत ना ? त्यांच्या घरचीं कामेंही प्रेमानें केलींत ना ? त्यांचीं विघ्नें वारलींत ना ? ध्रुव बाळाला पोटाशीं धरणारे, प्रल्हादाच्या कपोलाला स्पर्श करून त्याची वाचा पल्लवित करणारे, उपमन्यूला क्षीरसागर देणारे,शबरीचीं उच्छिष्ट फळें खाणारे, समर्थांना स्वतः अनुग्रह देणारे, नामदेवाच्या हातचें जेवणारे, जनीसवें दळूं लागणारे, तुकयाला बाळकृष्णरूपानें भेटणारे तुम्हींच ना ? ती तुमची भक्तवत्सलता आम्हांला प्रत्यक्ष दिसूं द्या. सगुणदर्शनाची आमची भूक निववा.

८. देवा ! आमच्या व्यक्तिक किंवा सार्वजनिक पापांमुळें आह्मी कष्ट भोगीत आहोंत हें खरें आहे. आह्मी लहान मुलांसारखे आपापसांत भांडतों, एकमेकांचा हेवादेवा करितों, पण तुह्मी आह्मां सर्वांचे अपराध पोटांत घाला. आमच्या दुर्बुद्धीला ओहोटी लागूं द्या. सात्विक गुणांचा आह्मांत उदय करा. आमचीं मनें परस्परांविषयीं प्रेमपूर्ण करा.

दुजेपणाला हद्दपार करा. द्वेषमत्सरांना कैदेंत टाका. निंदकांचीं तोंडें बंद करा. सहनशीलता द्या. सात्विक धैर्य द्या. आमचीं मनें विस्तृत व व्यापक करा. दुसऱ्याचे दोष दिसूं देऊं नका. सद्गुणप्रेमाचें बीज आमच्या मनोभूमींत लावून त्याचा प्रचंड वृक्ष करा. गुणांविषयीं आदर, दोषांविषयीं मौन असा गोड स्वभाव आह्मांस द्या. सर्वांभूतीं तुह्मीं आहांत तसे आम्हांस दिसा.

९. दयासागरा ! तुम्हांला मी डोळ्यांनीं पाहिलें आहे असें सांगणारा तुमच्या सलगीचा एक तरी संतवीर आमच्यांत उत्पन्न करा. कोणत्याही प्रांतांत, जातींत, स्थितींत असा भक्तोत्तम जन्माला घालून त्याच्या करवीं भागवत धर्माचा डांगोरा पिटा. हा भक्तोत्तम स्त्री असो, पुरुष असो, मूल असो, ब्राह्मण असो, शूद्र असो, चांडाळ असो, वृद्ध असो, तरुण असो—पण ' मज रघुनाथजी वेगळे जिवलग कोणी नाहीं' असें सप्रत्यय सांगणारा एक तरी ' समर्थ ' आमच्या डोळ्यांपुढें खेळूं द्या.

१०. निष्कामकर्मयोग, ज्ञानयोग, व भक्तियोग हे तीनही एकरूपच आहेत असा अविरोधी बोध आह्मांला द्या. शिवरायाचा कर्मयोग, समर्थांचा ज्ञानयोग व तुकोबांचा भक्तियोग हे तीनही एकरूपच आहेत, व यांच्यांत विरोध नाहीं असा शुद्ध भाव आह्मांला शिकवणारा—कर्मज्ञानउपासना याची एकवाक्यता करणारा—एक तरी महात्मा भरतखंडाला द्या. पाश्चात्य व पौर्वात्य यांच्यांतील सद्गुणांचें एकीकरण करून आमचें राष्ट्र ऐहिक व पारलौकिक कल्याण साधून घेईल असा आम्हांला वर द्या. आम्हांला शिवाजी द्या, रामदास द्या आणि तुकोबाही द्या. आह्मांला तिघेही पाहिजेत. तीनही सूर्य आहेत. तिघेही विभूति आहेत. तिघेही भगवदंश आहेत. ' भवो हि लोकाभ्युदयाय तादृशाम् ! "

११. आणि ह्या [illegible]ही आम्ही पात्र नसलों तर त्यांना आम्ही जाणून शरण जाऊं अशी आह्मांला पात्रता द्या. पात्र नसलों तर पात्र करून घ्या व अंगीकार करा.

१२. भगवंता ! विश्वाचीं सर्व सूत्रें तुझ्या हातीं आहेत.

**चाले हें शरीर कोणाचिये सत्ते । कोण बोलवितें हरीवीण ? ॥ १ ॥**
**देखवी ऐकवी एक नारायण । तयाचें भजन चुको नका ॥ ध्रु० ॥**
**मानसाची देव चालवी अहंता । मीचि एक कर्ता ह्मणोनियां ॥ २ ॥**
**वृक्षाचेंही पान हाले ज्याची सत्ता । राहिली अहंता मग कोठें ? ॥ ३ ॥**
**तुका म्हणे विठो भरला सबाह्य । उणें काय आहे चराचरीं ॥ ४ ॥**

अशा सबाह्य भरलेल्या विठोला आमचे अनंत प्रणिपात असोत. तुझी सत्ता आह्मांला प्रतिपदीं जाणवो.

१३. अर्जुनाला तुह्मीं आधीं दिव्यचक्षु दिलेत आणि मग आपलें विश्वरूप दाखविलेंत, तशी तुमच्या कृपेची आधीं आह्मांला पात्रता द्या आणि मग पूर्ण कृपा करा.

सामुग्रीही देणारे तुह्मी व अन्न वाढणारे तुह्मीच. देवा, आमचें साधनही तूं व साध्यही तूंच ! या विश्वाचे सर्व कारभार तुझ्याच सत्तेनें चालले आहेत. आमच्या अंगबळानें आह्मी कृतकार्य होऊं असें नाहीं. पण तुझ्या बळानें आम्हीं त्रैलोक्याचें राज्य मिळवूं व तुलाही मिळवूं. तूं प्रसन्न चित्तानें आह्मांकडे पहा कीं आह्मीच दिव्य होऊं. तुझा चरण-स्पर्श आमच्या अहल्यारूप बुद्धीला लागूं दे कीं तात्काळ ती दिव्यरूप होईल ! तुझा हस्तस्पर्श आमच्या कपोलाला होऊं दे कीं प्रल्हादासारखी अमोघवाणी आह्मांला प्राप्त होईल व मग आमच्या वक्तृत्वानें पाषाणालाही पाझर फुटेल, व तूं आमच्या हृदयमंदिरांत निरंतर जागा राहून तें पावन कर कीं तुझ्या संगतीनें आमची सर्व काया दिव्य लखलखीत होईल.

१४. वदान्यवरा श्रीकृष्णनाथा ! तूं परीस आहेस व तुझ्या स्पर्शानें ह्या लोखंडाचें सोनें कर. याहून आणखी काय प्रार्थना करूं ?

१६. पांडुरंगा ! राम तूंच, कृष्ण तूंच, शिव तूंच, दत्त तूंच, अंबा तूंच. हें सर्व जगत् तूंच नटला आहेस. तूं सर्वांतर्यामी आहेस व सर्व भूतेंही तूंच आहेस. प्रकृतिपुरुषांची ऐक्यता तुझ्याच ठिकाणीं आहे.

असा अंतर्बाह्य तूं नटला आहेस व आम्हांला असाच प्रत्यय दे. या प्रत्ययाला विरोध करणाऱ्या सर्व कामना, भावना, विचार, विकार, संकल्प–विकल्प तूंच आपल्या स्वरूपानें धुवून टाक. आमच्या मनोरूप वारूचा लगाम तूं आपल्या हातीं घे. आमची बुद्धि तुलाच सर्वकाळ संलग्न होऊन राहूं दे. आमचा अहंकार तुझ्या प्रेमानें भरून टाक. असा तूंच सर्व होऊन गेल्यावर जें जें कर्म होईल ते खरें निष्काम होईल.

---

२६

चंद्राची वांकडी कोर पहाणाराची दृष्टि सरळ करते. रामचंद्राचा वनवास वानरांना नागरिक बनविता झाला. थोराचा कुटिलक्रम असाच सरळपणाला वांकवितो.

२७

गजाननांतील गजत्वाची प्रतीति कोणास झाली आहे काय? ज्यांना झाली असेल त्यांचा कोणी हेवा करण्याचें कारण नाहीं.

२८

कुंभार विटा मोजून देतांना फेंकतो. पण त्याच्या फेंकण्यानें वीट क्वचितच फुटते. त्याचप्रमाणें आत्मीयत्वाच्या दृष्टीनें पाहणाऱ्याच्या कडून कडक टीका झाली तरी ग्रंथकाराची क्वचितच मानहानि होतें.

२९

घासलेट चुलीपाशीं आलें तरी त्याचा अन्नांत प्रवेश होऊं देतां कामा नये. तद्वत् परकीय संस्कृती कितीही जवळ येऊन थडकली तरी तिचा आपल्या जीवनांत अंतर्भाव करणें धोक्याचें आहे.

## १८ भागवतधर्माचे मादर.



( आकोला येथील साहित्यसंमेलनप्रसंगीं झालेल्या व्याख्यानाचा गोषवारा. )

१ आपल्या कवींनीं मनाला जिंकल्यामुळें ' कवि ' शब्द आमच्याकडे ' संत ' शब्दाचाच पर्याय झाला आहे. आमचे संतकवि मनाचे मालक झाल्यामुळें ब्रह्मानंद भोगणारे व तो इतरांना देण्यास समर्थ असे आहेत. ज्ञानेश्वरतुकारामादि संतकवि हेच ग्रंथकार ह्या पदवीस खरोखर पात्र आहेत. हृदयग्रंथि सोडणारे, अज्ञानग्रंथि उकलवून जीवाला ब्रह्मपदावर आरूढ करणारे तेच खरे ग्रंथकार होत. जीवाचें कल्पित दारिद्र्य नाहींसे करून त्याला निजपद गांठून देणारे महात्मेच ग्रंथकार आहेत. आपण सगळे ग्रंथकार ह्मणविणारे येथ जमलों आहोंत, चार दोन ग्रंथ लिहून आपण ग्रंथकार बनतों, पण अज्ञानग्रंथिछेद करण्याचें सामर्थ्य ज्यांच्या वाणींत व लेखणींत आहे तेच ' ग्रंथकार ' ह्या पवित्र पदवीस योग्य आहेत. असे परम वंदनीय ग्रंथकार मराठी भाषेस तिच्या सुदैवानें मिळाले आहेत. ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ, रामदास, तुकाराम असले ग्रंथकार मराठी भाषेस मिळाल्यामुळें, आपण गर्भश्रीमंत आहोंत, श्रीमंतांचीं लेंकरें आहोंत, त्यांची औरस संतति आहोंत व म्हणून त्यांचे उच्चतम परम पवित्र संस्कार आपल्या अंतःकरणांतून नाहींसे होणें केव्हांही शक्य नाहीं, ही गोष्ट ग्रंथकारांनीं विसरतां कामा नये. आपल्या वाडवडिलांचे व पूर्वजांचे विचार आपण कायम ठेविले पाहिजेत. त्यांच्या विचारांची शुद्ध परंपरा कायम ठेवण्याची श्रेष्ठ जबाबदारी आपल्या शिरावर आहे. मनाचे मालक झालेल्या आमच्या ग्रंथकारांपैकीं चार ग्रंथकारांसंबंधानें पुढील अभंग प्रसिद्ध आहेः—

### अभंग.

**संतकृपा झाली । इमारत फळा आली ॥ १ ॥**
**ज्ञानदेवें रचिला पाया । बांधियेलें देवालया ॥२॥**
**नामा तयाचा किंकर । तेणें केला हा विस्तार ॥३॥**
**जनार्दनीं एकनाथ । ध्वज उभारिला भागवत ॥४॥**
**तुका झालासे कळस । भजन करा सावकाश ॥५॥**

अभंग प्रक्षिप्त आहे असें वारकरी मानतात. तो तुकाराममहारा-

जांचा असो वा दुसऱ्या कोणाचा असो त्यांतील कल्पना सुंदर आहे. त्यांत महाराष्ट्रांत संतांनीं उभारलेल्या भागवतधर्माच्या मंदिराचें फार मार्मिक वर्णन केलेलें आहे. महाराष्ट्रशारदेचें मंदिर बांधण्यास **श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीं** प्रारंभ केला ही गोष्ट अगदीं खरी आहे. आपण ज्ञानेश्वरी, अमृतानुभव, हरिपाठाचे व इतर अभंग व महाराजांचें चरित्र ह्या सर्वांचा ऐतिहासिक दृष्ट्या विचार केला तर महाराष्ट्रवाङ्मयाचा व महाराष्ट्रांतील भागवतधर्माचा ज्ञानेश्वरांनीं कसा 'पाया' रचिला हें आपणांस समजेल. थोडेसें स्पष्टीकरण करून सांगतों. शंकराचार्यांनीं अद्वैतसिद्धांत प्रस्थापित केला व रामानुजमध्वांनीं सगुणभक्तीचा प्रसार केला; आमच्या ज्ञानेश्वरमहाराजांनीं अद्वैतसिद्धांत ग्रहण करून भक्तीचा स्वीकार केला व यामुळें 'अद्वैतभक्ति किंवा अभेदभक्ति' ह्या मताचे खरे प्रवर्तक ज्ञानेश्वर हेच होत. एकनाथ तुकारामादि महाराष्ट्रीय संतांनीं ज्ञानेश्वरांच्या ह्या 'अभेदभक्ती' चाच संसार केला आहे. "तुज सगुण म्हणों कीं निर्गुण म्हणो रे। सगुण निर्गुण एक गोविंदु रे ॥" हा ज्ञानेश्वरमहाराजांचा सिद्धांत आहे. सगुणनिर्गुण, ब्रह्म आणि जगत् यांचा जीवाशिवाप्रमाणेंच पूर्ण अभेद आहे. जातिभेदाचें साधुसंतांनीं अवडंबरही माजविलें नाहीं व त्याच्यावर हत्यारही उपसलें नाहीं! ज्यांनीं त्यांनीं आपल्या स्थितींत राहूनच भगवत्प्राप्ति करून घ्यावी असा त्यांचा उपदेश आहे. ब्रह्मज्ञानाचा, भगवत्प्राप्तीचा, नामस्मरणाचा, उद्धरून जाण्याचा अधिकार मात्र प्रत्येक जीवास आहे असें ह्मणून ब्रह्मज्ञानाचें कपाट त्यांनीं सर्वांस खुलें करून दिलें आहे. 'सकळांसी येथें आहे अधिकार' असें त्यांचें सांगणें आहे. 'देखो आवडे तो खाणी ब्रह्मविद्येची' ह्मणजे ब्रह्मविद्येची गीताख्य खाण वाटेल त्यानें पहावी असें ज्ञानेश्वर म्हणतात. ज्ञानेश्वरीच्या उपसंहारांत त्यांनीं स्पष्ट म्हटलें आहे कीं, "वेद मोक्षदानीं समर्थ असून त्यांनीं फार कृपणपणा केला व ते तीन वर्णांच्याच कानीं लागले. स्त्रीशूद्रादिकांना भवव्यथा प्राप्त झाली, तर त्यांना वेदांनीं अवसर ठेवला नाहीं." हें मागलें उणें फेडून टाकण्यासाठीं वेदच गीतारूपानें सर्वसेव्य झाले आहेत. तात्पर्य 'वेदांची सुसेव्यता। ते हे जाण मूर्त गीता' गीता

आणि भागवत हे दोन उत्कृष्ट ग्रंथ संतांनीं हातीं घेऊन त्यांच्याच सिद्धांतांचा स्वानुभवाच्या बळावर त्यांनीं प्रसार केला. ज्या धोरणावर ज्ञानेश्वरांनीं मराठी भाषेचें कार्य केलें व भागवतधर्माचा प्रसार केला, तेंच धोरण नाथतुकारामांनीं कायम केलें. ज्ञानेश्वरांनीं पाया घातलेल्या भागवतधर्माच्या मंदिराचा विस्तार 'नामा तयाचा किंकर' त्यानें केला. नामदेवरायांच्या चरित्रांत विशेष गोष्टी दोन. एक त्यांनीं सगुणप्रेमा सर्व जातींस शिकविला व दुसरें त्यांनीं आपल्या अंगच्या उत्कट प्रेमानें आपले सर्व कौटुंबीय आपल्याच योग्यतेस आणून त्यांच्याकरवीं अभंगरचना करविली. नाथ-कबीर यांच्या संगतीनें त्यांच्या स्त्रिया तरल्या; पण नामदेवांच्या संगतीनें त्यांचे 'नारा, महादा, विठा, गोंदा' हे चार पुत्र, चार सुना, चार लेंकी व दासी जनी ही सर्व मंडळी भगवद्भक्त झाली व ह्यांनीं अभंगरचना करून मराठी भाषेचें आध्यात्मिक सामर्थ्य वाढविलें. ज्ञानेश्वरांची ब्रह्मनिष्ठा, नामदेवांचा सगुणप्रेमा, नाथांचें ज्ञानभजन व तुकोबांचें वैराग्ययुक्त प्रेम ह्या सर्वांच्या समुच्चयामुळें मराठी लोकांना पूर्ण ब्रह्मज्ञान मिळण्याचा सोपा उपाय सिद्ध झाला. 'तुका झालासे कळस' हा ( निबंधमालाकार समजतात तसा ) गर्वाचा उद्गार नाहीं, तर इमारतीची सांगता म्हणजे भागवतधर्माची पूर्णता व्यक्त करणारा हा उद्गार आहे. नाथांनीं संसारांत राहून परमार्थ पिकविला व गृहस्थाश्रमाची थोरवी वाढविली. ह्याप्रमाणें वरील अभंगांत भागवतधर्ममंदिराचा गौरव केलेला आहे व तो यथार्थ आहे हें कोणीही कबूल करील. आज सहाशें वर्षें ज्ञानेश्वरांचें मराठी भाषेंतलें व लोकांतलें आद्य व श्रेष्ठस्थान कायम राहिलें आहे. महाराष्ट्रीयांच्या मनावर ज्ञानेश्वरतुकारामादि ग्रंथकारांचाच पूर्ण पगडा अजून आहे आणि तो कायम रहाणार. मराठ्यांच्या मनावर त्यांची पकड कायमची आहे. महाराष्ट्र त्यांच्या चरणीं लीन आहे. महाराष्ट्र त्यांच्या वचनांचीं पारायणें करण्यांत व त्यांच्या उपदेशामृताचें पान करण्यांत गुंगून राहिला आहे. ज्ञानेश्वरी आद्यंत पाठ म्हणणारे निदान शेंदोनशें लोक महाराष्ट्रांत आहेत. ज्ञानेश्वरांच्या मार्गानें आम्ही जात आहोंत. पंढरपूर हें मरा-

ह्यांचें हृदय आहे. महाराष्ट्रसारस्वताची युनिव्हर्सिटी अजूनही पंढरपूर हीच आहे. ज्ञानेश्वरांनीं ह्या युनिव्हर्सिटीला जोडून आळंदीस पहिलें कॉलेज काढलें. ह्यानंतर सासवड, त्र्यंबक, पैठण, देहू येथें कॉलेजें निघालीं. ह्या सर्वांचें संमेलन दरसाल आषाढीकार्तिकीस पंढरीस भरत असतें. ह्या संमेलनाचा अध्यक्ष श्रीपांडुरंग हा कायमचा ठरलेला आहे. अध्यक्ष नेमायची तेथें पंचाईत पडत नाहीं. सर्व-मान्य अध्यक्ष पांडुरंग असून लक्षावधि वारकरी हे मराठी वाङ्मयाचे विद्यार्थी आहे. शंभरापासून पांचशेंपर्यंत अभंग तोंडपाठ असणारे हजारों वारकरी आहेत. ह्यांचीं जागोजाग भजनमंडळें आहेत. अशा रीतीनें, ज्या मराठी भाषेचा उत्सव करण्यासाठीं आपण आज येथें जमलों आहोंत, ती मराठी भाषा राष्ट्रभर अभ्यासली जात आहे. मराठी भाषेचें हृदय म्हणजे वरील संतमंडळीचे ग्रंथ. त्या ग्रंथांचें गर्भ म्हणजे भागवतधर्म. तेव्हां मराठी भाषेचा जयजयकार म्हणजे भागवत-धर्माचा जयजयकार अशी अजूनही स्थिति कायम ठेवून गद्यग्रंथ-रचना चालूं द्या, भागवतधर्माचें वळण संभाळून ग्रंथ करा, पूर्वपरंपरा-प्राप्त संस्कार कायम ठेवून शास्त्रीय ग्रंथ, इतिहास, काव्यें, चरित्र वगैरे होऊं द्या अशी माझी सर्व मराठी ग्रंथकारांस सविनय विनंति आहे. मराठी भाषामंदिर हें शांतिरसाचें घर आहे. भक्तिज्ञानवैराग्याचा हा आधार आहे. मराठी भाषा ही ब्रह्मविद्येची कसोटी आहे. इतर रसांना, इतर विषयांना येथें मान आहे पण ते रस व विषय अध्यात्माचें साम्राज्य कबूल करून गरिबीनें राहतील, तर तो आहे. आपणां सर्व मराठी लेखकांना व ग्रंथकारांना आमचे ज्ञानेश्वरादि खरे ग्रंथकार प्रेम व स्फूर्ति देवोत व भागवतधर्माचें वैभव कायम ठेवून त्यांच्या अनुरोधानें नानाविध गद्यग्रंथ रचण्याचें व तेणेंकरून भाषेचें व्यापकत्व वाढविण्याचें सामर्थ्य देवोत अशी त्यांच्या चरणीं नम्र विनंति करून मी आटोपतों.

---

# १९ मातृभाषेचें प्रेम.



( इंदूर येथें मराठी साहित्यसभेच्या वार्षिकोत्सवप्रसंगीं [ सप्टेंबर १९१६ ] जें व्याख्यान झालें त्याचा गोषवारा पुढें दिला आहे. )

" गुदस्तां याच दिवसांत येथें साहित्यसभेचा जन्म झाला, त्याप्रसंगीं आपण मला मराठी वाङ्मयावर व्याख्यान देण्यास उभें केलें होतें व आजही सभेच्या पहिल्या वाढदिवशीं मलाच मराठी भाषेसंबंधीं भाषण करण्यास सांगत आहांत, हा माझ्या सुदैवाचाच योग मी समजतों. सभेच्या जन्मदिवशीं व वाढदिवशीं स्वभाषेची अल्पशी सेवा आपण मजकडून घेतां याबद्दल मी आपला आभारी आहें. हें इंदूरचें राज्य महाराष्ट्रीयांचें आहे; मल्हारराव होळकरांनीं हजारों मराठ्यांच्या मदतीनें हें स्वपराक्रमानें संपादन केलें व विश्ववंद्य देवी अहल्याबाईच्या पुण्यप्रतापानें हें चाललें आहे व अनेक शतकें चालेल. हें राज्य आपणां मराठ्यांचें आहे व येथें मराठी भाषेच्या उत्कर्षासाठीं प्रयत्न व्हावेत हें उचित आहे. नेहमीं राज्यविस्ताराबरोबर भाषेचाही विस्तार होत असतो. इंग्रजांचें राज्य आधीं जगभर पसरलें आणि मागोमाग इंग्रजी भाषेचाही प्रसार झाला. शंभर वर्षांमागें मराठ्यांची राजसत्ता सर्व हिंदुस्थान व्यापूं पाहत होती व तसें झालें असतें तर आज मराठी भाषा ही सर्व हिंदुस्थानची राजभाषा झाली असती; पण ईश्वरी नेमानेम कांहीं वेगळा होता. त्याप्रमाणें घडून आलें व आपला इंग्रजी भाषेशीं निकटसंबंध येऊन आपला एक प्रकारें फायदा झाला. आपलें गद्य वाङ्मय गेल्या शतकांतलेंच आहे. मराठी भाषा मुख्यतः पद्यरूपांत होती. तिचें कार्यक्षेत्र अधिक विस्तृत झालें व इंग्रजी भाषेच्या अनेकविध ग्रंथांशीं आपला परिचय होऊन भाषेच्या अभिवृद्धीसाठीं काय काय उद्योग केले पाहिजेत हें आपणांस समजून आलें. मराठीगद्यरचनेच्या पूर्वरंगांतच निबंधमालेसारखा सुंदर ग्रंथ निर्माण झाला.

राजवाडे, पारसनीस, खरे, धुळ्याची सत्कार्योत्तेजक सभा यांचे प्रयत्न, ठाणें व मुंबई येथलि ग्रंथसंग्रहालयें, मोफत वाचनालयें, साहित्य परिषदा, नुकता संपलेला प्रो. रानडे यांचा कोश, इ० प्रकार मराठी भाषेच्या उत्कर्षाचेच द्योतक आहेत व त्याच कार्यासाठीं सतत वर्षभर काम करणारी साहित्यसभा स्थापन करून आपण इंदूरकरांनीं स्वकर्तव्यतत्परता दाखविली याबद्दल सर्व महाराष्ट्र आपलें अभिनंदन करील. ग्रंथसंग्रहालयाची दिशा जशी ठाण्यानें दाखविली, मोफत वाचनालयांचा प्रारंभ जसा पुण्यास रा. फडणीस या गरीब विद्यार्थ्यानें केला, तसा साहित्यसभा स्थापून स्वभाषेची सेवा करण्याचा इंदूरकरांनीं उपक्रम केला आहे, त्याचें अनुकरण इतरत्र होईल अशी मला उमेद आहे. विद्याव्यासंगी लोकांनीं महिन्यांतून दोनदां जमून साहित्याची वेगवेगळ्या तऱ्हेनें चर्चा करावी व आपल्या मातृभाषेचें प्रेम कायम ठेवावें, तिच्यावरचीं संकटें निवारावीं; तिची अभिवृद्धि कोणत्या उपायांनीं होईल याचें चिंतन करून त्याप्रमाणें कांहीं तरी कार्य करूं लागावें हें त्यांचें पवित्र कर्तव्यच आहे.

" मनुष्यमात्राला जशी स्वभावतः जन्मभूमि अत्यंत प्रिय असते त्याप्रमाणें जन्मभाषाही प्रिय असते. मात्र तें प्रेम कृतींत उतरलें पाहिजे तरच शोभा आहे. आपलें जन्मापासून नित्याचें सर्व व्यवहार ज्या आपल्या मातृभाषेंत होतात, ज्या स्वभाषेंतले ग्रंथकार व साधुसंत आपले शुद्ध संस्कार जागृत करितात, आपल्याला ज्ञानाचा व आनंदाचा लाभ देतात, आपल्या राष्ट्रीय भावना व परंपरा कायम ठेवतात, त्या मातृभाषेविषयीं आपल्याला परम प्रेम नसलें तर आपण कुपुत्रच तिच्या पोटीं जन्माला आलों असें जग म्हणेल. पंताच्या कुशलवाख्यानांतले दोन सुंदर श्लोक मला या संबंधानें वारंवार स्मरतात. लवाला रामाच्या सैनिकांनीं पकडून नेल्यावर सीता शोकाग्रस्त होऊन आश्रमद्वारांत रडत बसली होती. तों कुश बाहेरून आला व आपल्या मातेची ही शोकविव्हल स्थिति पाहून म्हणालाः—

**वद रोदनमोहहेतुला। उचिता अंब ! दशा न हे तुला।**
**तव दुःख न नाशिलें जरी। तरी लोकीं न्यसुताचि साजिरी॥ १॥**

**अहह श्रम जाहला तुला । न दिसे यासि जगत्त्रयीं तुला ।**
**तव वक्त्रनिशीन कोमला । मग तें जीवितही नको मला ॥ २ ॥**

निस्सीम मातृभक्ताला हे उद्गार किती शोभतात ! त्याच्या चित्तांतला शुद्ध प्रेमभाव त्यांत कवीनें कसा नामी प्रकट केला आहे तो पहा. सुपुत्राचें मायदेशाविषयीं, जन्मदात्या मातेविषयीं व आपल्या मातृभाषेविषयीं असेंच निर्मळ प्रेम असावें व असतें. " हे अंब ! तुला रडायला काय कारण झालें ? ही दशा तुला उचित नाहीं. आम्हीं तुझे पुत्र जिवंत असून तूं शोकाकुल व्हावेस हें आम्हांला लाजिरवाणें आहे. आम्हीं तुझ्या पुत्रांनीं तुझ्या दुःखाचें निवारण केलें नाहीं तर मग आम्हीं जगावें कशाला ? आम्हीं मरावें हेंच बरें ! आईच्या दुःखक्लेशांचें पुत्रांना निवारण करितां आलें नाहीं तर ते जिवंत राहण्यापेक्षां मेलेलेच काय वाईट ! आई!तुला कोण हे अतुल श्रम होताहेत ! तुझा मुखचंद्र जर असाच कोमेजलेला असूं दिला तर आम्हीं कां जगावें ? तूं प्रसन्नचित्त असावीस, तुला सुखांत ठेवावें हा आमचा धर्म. बोल तुला काय दुःख होतें तें. तुला अप्रसन्न पाहून माझें जीवितही मला नकोसें वाटतें. " मराठी भाषेविषयीं आपण मराठ्यांनीं असेंच निर्मळ प्रेम ठेवावयाला नको काय ? मनुष्याला आईविषयीं स्वाभाविक प्रेम असतें व आईचाही जीव त्याच्यासाठीं तसाच कासावीस होत असतो. आपली आई काळी व गरीब कशीही असली तरी इंद्राच्या अप्सरेपेक्षांही आपणाला प्रिय आहे. दुनियेंतल्या सर्व प्रौढ, पोक्त व वृद्ध बायांना आपण ‘ आई किंवा आईसारखी ’ म्हणत असतों, पण हा उपचाराचा भाग आहे. आपल्या आईला जसा प्रेमाचा पान्हा फुटेल तसा अन्य स्त्रियांना फुटेल काय ? स्वभाषेविषयीं असाच प्रकार आहे. इंग्रजी किंवा अन्य भाषा कितीही प्रौढ व अभियुक्त असल्या तरी आपला जिव्हाळा मराठीकडेच असणार. जिच्या अंकीं आपण वाढलों, खेळलों, जिच्या उदरीं जन्म घेतला, जिनें आपल्याला लहानाचें मोठें केलें, जिनें नानाविध सुखें दिलीं त्या मातेची सर इतरांस कशी येणार? हा साधारण मातृप्रेमाचा स्वभाव झाला आणि त्यांतही आपली

आई जर अत्यंत प्रेमळ, अत्यंत सद्गुणी, अत्यंत मान्य व दैवीसंपत्तीनें संपन्न असली तर आपलें तिजवरील प्रेम किती शुद्ध व निस्सीम पाहिजे? मराठी भाषा आपली म्हणून प्रिय एवढेंच नसून ती अशीच सर्वगुणसंपन्न आहे. तिच्या उदरीं प्रथमच जें बालक जन्मलें तें अत्यंत दिव्य, तेजस्वी व पराक्रमी निपजलें.संस्कृतांत, इंग्रजींत, मराठींत किंवा अन्य भाषांत गीतेचीं कितीही भाष्यें, भाषांतरें, रूपांतरें झालीं असलीं तरी ' ज्ञानेश्वरी ' ची योग्यता कोणत्याही अन्य ग्रंथाला यायची नाहीं. भगवंताचें खरें व पूर्ण मनोगत ज्ञानेश्वरीद्वारांच प्रगट झालें आहे, आणि ' ज्ञानेश्वरी ' हा मराठी भाषेंतला आद्य परमश्रेष्ठ अनुपम असा सर्वांगसुंदर ग्रंथ आहे. ह्या दादाच्याच वळणावर त्यांचीं सर्व धाकटीं भावंडें गेलीं आहेत ! अमृतानुभव,नाथभागवत, दासबोध, वामनमोरोपंताचे ग्रंथ, श्रीधर व महीपति यांचे ग्रंथ, नामदेवतुकोबांचे अभंग, पदें, मुक्तेश्वरी भारत, मराठी सारस्वतांत कोणतीं रत्नें नाहींत ? या तोलाचें वाङ्मय कोठें आहे ? यांत कोणते रस, कोणते वर्णनप्रकार नाहींत ? नवरसांचें विविध प्रकार यांत आहेत. मराठी कविता सारी भक्तिपर आहे असें कोणी म्हणतात, पण हा काय तिचा महद्गुण कां दोष ? एखाद्या बाईनें एखाद्या राणीला म्हटलें कीं, 'काय हो ! तुमच्या अंगावर सारेच हिऱ्यामोत्याचे दागिने आहेत, आमच्या सारखे चांदी सोन्याचें कां नाहींत ? ' तर ती काय म्हणेल ? ' होय बाई !' एवढेंच म्हणून मंदस्मित करील कीं नाहीं ? परमात्मा जर सर्वोत्तम आहे तर त्या सर्वोत्तमाला आपली मराठी भाषा बिलगून राहिली हा तिचा अत्यंत थोर गुणच वाखाणायला नको काय ? अमृत सेवन करणाऱ्या रसनेला कांजी प्यायची इच्छा राहिली नाहीं तर हा काय त्या रसनेचा दोष ? जगांतले सर्व धर्म, सर्व तत्त्वज्ञान, सर्व विचारी महात्मे जर विश्वाद्य परमेश्वराच्या शोधांत आहेत, तर परमेश्वराला शोधून त्याच्या पायीं दडी देऊन त्याच्या भक्तिसुखाचा आनंद लोकांना देणारी आमची मराठी भाषा श्रेष्ठच म्हणायला नको काय ? मराठी भाषा भक्तिप्रधान आहे असें म्हणणाऱ्यांना आम्ही सांगतों कीं, ' होय बाबा ! ती तशी

आहे ! बरें कोणाला इतर रस पाहिजे असतील तर त्यांचाही दुष्काळ नाहीं. निर्मल श्रृंगार ज्यांना पाहिजे त्यांनीं नलदमयंती आख्यान पहावें. उत्तान श्रृंगार ज्यांना हवा त्यांना लावण्यांवर, नाटककादंबऱ्यांवर आपली तहान भागवावी. वीररस पाहिजे तर मुक्तेश्वर, मोरोपंत, श्रीधर यांच्या ग्रंथांतून हवे तेवढे उत्कृष्ट उतारे देतां येतील. शिवाय 'शूर मर्दाचा पोवाडा शूर मर्दानें ऐकावा' असे वीररसप्रचुर उत्कृष्ट पोवाडेही पुष्कळ आहेत. मुक्तेश्वरमोरोपंताच्या काव्यांत विविधरसांचे, स्वभावपरिपोषाचे, वर्णनाचे किती तरी सुंदर प्रसंग आहेत ! इंग्रजी कवितेंत अमुक आहे तें मराठींत कोठें आहे, असें कोणी म्हणेल तर मराठींतले अनेक सुंदर प्रसंग काढून आम्हीही विचारूं कीं, या तोलाचें इंग्रजींत काय आहे ? आतां इंग्रजींत गद्यरचनेचे अनेक सुंदर ग्रंथ झाले असून मराठींत गद्यरचनेचा प्रारंभ आहे ही गोष्ट खरी आहे; पण म्हणून मराठीला नावें ठेवणारांना उलट सवाल करितां येईल कीं, बाबा ! हा दोष तुझाच आहे. तुझी मातृभाषा मराठी आहे तर तिचें ऐश्वर्य वाढविण्यासाठीं कायावाचामनानें तूं कां तयार होत नाहींस ? शेजारणीच्या अंगावर बहुमोलाचे दागिने आहेत पण माझ्या गरीब आईच्या अंगावर तसले कोठे आहेत असें म्हणणाराला स्वतःचीच लाज वाटली पाहिजे ! तूं आपलें करंटेपण टाकून पराक्रम गाजविण्याची ईर्ष्या धर व दुनयेंतलि सर्व संपत्ती मिळवून आईच्या चरणीं ठेव; तुझा हात कोणीं धरला आहे ? गजगौरीव्रताख्यानाचें मर्म काय आहे ? पांडवांनीं खिन्न झालेल्या आईचे मनोरथ पूर्ण केले तसा पराक्रम भाषेच्या साम्राज्यांत गाजविण्याची, मातृभाषेचे डोळे निववविण्याची, तिचे पांग फेडण्याची उमेद आपण बाळगली पाहिजे. जग खुलें आहे, जगांतल्या सारस्वताचे दरवाजे खुले झाले आहेत, हवे तितके विद्याधन परदेशांतून लुटून आणून आपलें घर भरणाऱ्याचे हात कोणी धरलें नाहींत. आमच्या भाषेंत उत्कृष्ट गद्य ग्रंथ नाहींत म्हणून रडत बसण्यांत पुरुषार्थ नाहीं. नाहींत तर तसे निर्माण करा. ग्रंथ कांहीं आकाशांतून खालीं पडत नाहींत. ते माणसांच्याच

मुखांतून व लेखणींतून प्रगट होतात. त्याला अवश्य तें मिळवा, शोध करा, निश्चय, प्रतिभा हे गुण संपादून ग्रंथ लिहा व स्वभाषेचें ऐश्वर्य वाढवा. मराठी भाषा मूळची शुद्ध परमपवित्र, सात्विक, भगवत्परायण आहे. ती थोर आहे. साध्वी आहे व आपली माउली आहे. तिची एकनिष्टपणें सेवा करणें हा आपला धर्म आहे. हें होळकरांचें राज्य आपलें—मराठ्यांचें—आहे. येथें मराठी भाषेचा उत्कर्ष झाला पाहिजे. तिला इतर भाषांच्या पुढें मान खालीं घालायचा प्रसंग आणून कुपुत्र होऊं नका, इतकी माझी सर्वांना हात जोडून विनंति आहे. ह्या मराठी राज्यांतील प्रजाजन, मुत्सद्दी व राज्यकर्ते मराठी भाषेवर असली अपत्ती येऊं देणार नाहींत अशी मला उमेद आहे. मराठी सारस्वताचा जगतावर जयजयकार असो."

———

३०

कॉपीइंग इंक पेन्‌सिलीनें लिहिलें म्हणजे लागलीच लिखाण शाईमय होत नाहीं. त्याला ओल्या टीप कागदानें टिपावेंच लागतें. भक्तिशास्त्राचा मनावर निबोळ ठसा उमटण्यास साधकाचीं टिपें गळालींच पाहिजेत.

३१

पुस्तकांतील अर्थ लुटील तो खरा लुटारू. एरव्हीं एके ठिकाणची वस्तू दुसरे ठिकाणीं नेऊन ठेवणें ही शुद्ध हमाली. तिला वस्तादगिरी म्हणूं नये.

३२

पीक देते धरणी पाणी पण बी निवडतो मनुष्य प्राणी. संकल्प करणाऱ्यानें खबरदारी घेतली म्हणजे प्रारब्धभूमि वरकड पीक देऊं शकत नाहीं. रामाचें ध्यान करणाऱ्या मारुतीला विश्वमूर्ति कृष्णालाही रामरूपांतच दर्शन द्यावें लागलें. म्हणून दास म्हणतात 'मना ! सत्य संकल्प जीवीं धरावें.

# २० दयेचे प्रकार.



१. दया धर्माचें व हिंसा पापाचें मूळ आहे असें कबीरसाहेबांनीं म्हटलें आहे. गेल्या गणेशोत्सवाचे वेळीं (स. १९१५) फिरतींत दयाशीलतेचे दोन प्रकार आमचे पाहण्यांत आले. त्यापासून फार बोध घेण्यासारखा आहे असें वाटल्यावरून आमच्या वाचकांकरितां त्यांचा उहापोह करण्याचें आज योजलें आहे. ज्या दोन व्यक्तींच्या संबंधानें आम्हीं लिहिणार आहोंत त्यांना आपलें नांवगांव प्रसिद्ध होणें बिलकूल आवडणार नाहीं, तथापि सामान्य स्थितींतल्या माणसांनाहि दयेचा थोर धर्म आचरतांना पाहिलें म्हणजे परिस्थितीनें लहान असलेल्या माणसांचेहि आत्मे कसे उदार व ईश्वरसन्निध गेलेले असतात हें मनावर बिंबून मनाला मोठा आल्हाद वाटतो. शरीरानें, मनानें, वाचेनें, धनानें, स्वतः किंवा परभारेंहि परोपकार करणारे लोक या स्वार्थमूलक दुनियेंत खरोखर दुर्मिळ आहेत. संसारी माणसांत साधुत्वाचे दुर्मिळ गुण पाहिले ह्मणजे त्या माणसाचा संसार हा परमार्थच आहे असें वाटल्याशिवाय रहात नाहीं. लौकिकासाठीं, मनाच्या संतोषासाठीं स्वार्थत्याग करण हें टाकऊ नाहीं, तथापि दुसऱ्या जीवाला सुख व्हावें यासाठीं मनांतही कुरकुर न करितां स्वसुखावर तिळांजली देणें हा असामान्य गुण ज्या पुरुषांत दिसतो तो साधुच होय असें ह्मणायला काय हरकत आहे ? आपण नेहमीं प्रसिद्ध मनुष्याचे गुणवर्णन करीत असतों, पण अगदीं अप्रसिद्ध स्थितींत असलेल्या मनुष्यांतही जेव्हां थोर सद्गुणांचें, सदाचाराचें व दयाधर्माचें व्यवहार्य स्वरूप स्पष्ट दृष्टीस पडतें तेव्हां हा सत्पुरुषच होय असें वाटून त्याचे पाय धरावेसे वाटतात. दयेच्या मोठ्या व्याख्यानापेक्षां अशा सज्जनाचें उदार कृत्य अधिक परिणामकारक होतें.

*   *   *

२ गेल्या जून महिन्यांत रामभाऊची बदली पुण्याहून दूर एका आडवाटेच्या स्टेशनवर झाली. त्याला पगार सारा चाळीस रुपये. आई, बायको व दोन मुलें एवढा परिवार. साल दुष्काळाचें, महागाईचें सर्वांस माहितच आहे. रामभाऊजवळ एक गाय आहे. संसारखर्च भागणेंहि जेथें मुष्किलीचें, तेथें गाय संभाळणें किती बिकट आहे याचा अनुभव पुष्कळांस आहे. गाय सुंदर, पुष्ट व शांत आहे. रामभाऊचें गाईवर आपल्यासारखें प्रेम आहे. दोन तीन सुखवस्तु मित्रांनीं गाय मागितली, पण नेहमीं वेळेला दोनतीन शेर दूध देणारी गाय अर्धाशेरही दूध देत नाहीं हें माहीत असून रामभाऊला गाईचा वियोग सहन होईना. त्यानें मृदु शब्दानें नाकारलें. बदली झाल्यावर २८ रुपये रेल्वेभाडें खर्चून त्यानें गाय बरोबर नेली. तेथेंही स्वतःच्या पोटाला चिमटा घेऊन गाईची सेवा त्यानें मनोभावें चालविली आहे. त्याचा आमचा संवाद झाला तो असाः—

प्रश्नः—तुह्मांला ही गाय संभाळणें जड वाटत नाहीं का ?

उत्तर—खर्चाची तारंबळ उडते, पण करायचं काय ? असल्या दुष्काळांत या गाईऐवजीं मला मोठी मुलगी असती तर मीं तिला टाकून कां दिली असती ?

प्रश्न—चांगल्या माणसाला देऊन कां टाकीत नाहीं ?

उत्तर—परवां तो रामशेट मागत होता, मीं ‘ हो ’ म्हटलें, पण घरीं येऊन विचार करूं लागलों तों माझा विचार पालटला. मला वाटलं तिला बाहेर नीट वागवणार नाहींत, पोटभर खायला घालणार नाहींत, वेळेला पाणी पाजणार नाहींत, तिनं दूध दिलें नाहीं तर तिला मारतील. तिला कोणी मारलें तर मला पाठींत सोटा बसल्यासारखें होतें ! ती पुनः माझ्या दृष्टीस पडणार नाहीं या विचारानें माझा जीव कासावीस झाला व मी गाय देत नाहीं असा निरोप रामशेटला कळविला.

प्रश्न—गाय दूध देत नाहीं ना ?

उत्तरः—मला त्याचं कांहींच वाटत नाहीं. पांच वर्षांपूर्वीं मीं दुधा-

साठीं घेतली खरी व तिनें चार वर्षें दूधहि पुष्कळ दिलें. आतां यंदां नाहीं देत, आपलें प्रारब्ध ह्मणून स्वस्थ बसतों. पण खरें सांगू का? ती दूध देवो न देवो मला ती घरच्या माणसासारखी प्रिय आहे. मला चतकोर भाकरी मिळते तोंवर मी तिला माझ्यापासून नाहीं दूर करणार. संध्याकाळीं ऑफिसांतून परत आलों ह्मणजे प्रथम तिचें दर्शन घेतों व मला समाधान वाटतें. ती माझी देवता आहे.

* * * *

३ मुंबईला जातांना लोणावळ्याच्या स्टेशनवर गाडी उभी राहिली. आमच्या डब्यांत हसनबावा ह्मणून एक सभ्य मुसलमान होता. एक मावळा नव्या रोपांच्या दोन कुंड्या घेऊन 'बाबा, या विकत घ्याना' म्हणून त्याच्या विनवण्या करूं लागला. 'मला नकोत त्या, लावायला जागा नाहीं' असें तो म्हणाला. त्या मावळ्यानें फार गयावया केली व पोरंबाळं दुष्काळानें हैराण झाली आहेत, महागाई भयंकर असल्यामुळें सगळ्यांना पोटभर भाकर मिळत नाहीं इ० हकीकत सांगूं लागला. त्या मुसलमानाला त्याची दया आली व 'तुला किती रुपये पाहिजेत' असें त्यानें विचारलें. दोन रुपये तरी पाहिजेत असें तो मावळा म्हणाला. त्या भल्या गृहस्थानें तीन रुपये त्याच्या हातावर टाकले तेव्हां तो त्याला दुवा देत आनंदानें तेथून निघून गेला.

आपण जो माल घेतला तो तीन रुपयाच्या किंमतीचा आहे कीं नाहीं याचा विचार न करितां त्या गरीब माणसाची गरज भागविण्याचा उदार विचार त्याच्या मनांत आला यांतच त्याच्या दयाशीलतेचें बीज आहे.

रामभाऊ आणि हसन या दोघांच्या औदार्याचें चिंतन करीत आम्ही मुंबईस जाऊन पोंचलों. रामभाऊचें गाईवरील निःस्वार्थ प्रेम व हसनचा कनवाळूपणा पाहून आमचें मन अत्यंत द्रवलें व त्यांच्या त्या दयाशील अंतःकरणांत मंगलमूर्तीचें अधिष्ठान आहे असें वाटून त्या पवित्र आनंदाच्या अनुभवांत वाट केव्हांच संपली. रंजल्या गांजलेल्या जीवांना व मुक्या जनावरांना जेथून दयाप्रेम सोडवायला धांवतें तेथें देवाची वसती निःसंशय आहे.



# २१ वेदांताचीं चार मतें.



१. वेदांतशास्त्र हें हिंदूंचें हृदय आहे. हिंदूजवळ आज दुसरी कसलीही संपत्ति याहून महत्तर अशी उरलेली नाहीं, पण वेदांताचीं तत्वें हिंदुमात्राच्या रोमरोमांत भिनून गेलीं आहेत, व ह्यापासून आह्मांला शांतिसुखाचा लाभही अपूर्व झाला आहे, होत आहे व होईल.

२. वेदांतशास्त्राचे आधारभूत ग्रंथ तीन आहेत. ( १ ) उपनिषदें, ( २ ) ब्रह्मसूत्रें व ( ३ ) भगवद्गीता. ह्या तीन ग्रंथांसच प्रस्तानत्रयी म्हणतात. ह्या प्रस्थानत्रयीवर श्रीशंकराचार्य, श्रीरामानुजाचार्य, श्रीमध्वाचार्य व श्रीवल्लभाचार्य ह्यांनीं आपआपल्या मतानुसार वेगवेगळीं भाष्यें केलीं आहेत व त्याप्रमाणें ह्यांचे चार संप्रदाय भरतखंडांत प्रचलित आहेत. शंकराचार्यांचा मायावादी अद्वैतसंप्रदाय, रामानुजांचा परिणामवादी विशिष्टाद्वैत संप्रदाय, मध्वाचार्यांचा तारतम्यवादी द्वैतसंप्रदाय व वल्लभाचार्यांचा ब्रह्मवादी शुद्धाद्वैत संप्रदाय. हे चार संप्रदाय वेदांतशास्त्राचे प्रतिपादक आहेत. ह्या सर्वांत शंकराचार्यांचे मतानुयायी सर्वांत अधिक आहेत. डॉ. डयुसेन ह्या जर्मन पंडितानें शोध करून लिहिलें आहे कीं, हिंदुधर्मी लोकांत शेंकडा ७५ लोक शांकरमतानुयायी, १५ रामानुजी,५ माध्व व ५ वाल्लभ आहेत !

३. उपनिषदें १०८ आहेत असें आपण आजवर ऐकत होतों, पण आतांपर्यंत एकंदर १५० वर उपनिषदें उपलब्ध झालीं आहेत ! तथापि आचार्यांनीं बारा उपनिषदांवर भाष्य केलें आहे:—

**ईश केन कठ प्रश्न मुण्ड माण्डुक्य तित्तिरिः ।**
**छान्दोग्य बृहदारण्यमैतरेयं तथा दश ॥ १ ॥**

ह्याशिवाय ' श्वेताश्वतर ' व कौशीतकी ' हीं दोन उपनिषदें त्यांत धरिलीं म्हणजे बारा होतात. ह्या उपनिषदांच्या आधारानें बादरायण व्यासांनीं ' **ब्रह्मसूत्रें** ' रचिलीं. व्यासांनीं ५५८ ब्रह्मसूत्रांत वेदांताचें

सार आणलें आहे. ब्रह्मसूत्रांना शारीरिक सूत्रें किंवा उत्तरमीमांसाही म्हणतात.

४. उपनिषत्प्रणीत वेदांतशास्त्रांत चार मुख्य गोष्टींचा विचार सांगितला आहे:—

( रा ) सृष्टीचें आदिकारण ऊर्फ ब्रह्मज्ञान.
( म ) सृष्टीची उत्पत्ति ( Cosmology ).
( कृ ) पुनर्जन्म.( Rebirth )
( ष्ण ) मोक्षप्राप्ति.

ह्या चार गोष्टींबद्दल वेदांतशास्त्र काय म्हणतें तें आपण पाहूं. (रा) केनोपनिषदांत गुरुशिष्यसंवादांत ' श्रोत्रस्य श्रोत्रं मनसो मनोयत् ' म्ह० मन बुद्धि, इंद्रियांचा प्रेरक कोण आहे या प्रश्नांच्या उत्तरांत " जो प्रेरक आहे तो मनाचें मन, वाचेची वाचा, प्राणाचा प्राण, इंद्रियांचें इंद्रियस्वरूप आहे " असें म्हटलें आहे. याचें स्पष्टीकरण छांदोग्यांत एका मनोरंजक दृष्टांताच्या द्वारें केलें आहे. उद्दालक अरुणीनें आपला मुलगा श्वेतकेतु याला मिठाचे चार खडे पाण्यांत सोडण्यास सांगितले व ते पाण्यांत विरघळून गेल्यावर ' मीठ कोठें आहे? ' असा प्रश्न केला. श्वेतकेतूनें पाहिलें तों मीठ कोठें दिसेना. बापानें मुलास तळचें, मधलें व वरचें पाणी चाखण्यास सांगितले. तेव्हां मुलगा म्हणाला कीं, ' सारेंच पाणी खारें लागत आहे ! ' यावर पिता म्हणाला कीं, " पाण्यांत सर्वत्र मीठ कालविलें असून जसें तें दिसत नाहीं पण आस्वाद घेणारास तें कळून येतें, त्याप्रमाणेंच ब्रह्म सर्वत्र व्यापून राहिलें असून तें अनुभवाशिवाय हातीं येणारें नाहीं ! ! " केनोपनिषदांत ' यद्वाचानभ्युदितं ' इत्यादि मंत्रांत सांगितलें आहे कीं, ज्याला वाणी नाहीं पण ज्यामुळें वाणीचा विकास होतो, ज्याला मन नाहीं पण ज्यामुळें मन मनन करितें, ज्याला डोळे नाहींत पण जें डोळ्यांचा डोळा आहे, ज्याला कान नाहींत पण जें कानांचा कान आहे. तें ' ब्रह्म ' होय. ब्रह्मज्ञान हें अमृत आहे. ( म ) दुसरी गोष्ट सृष्टीच्या उत्पत्तीची. उत्पत्तीबद्दल श्रुतींत म्हटलें आहे, " आत्मनः

आकाशः संभूतः । आकाशाद्वायुः । वायोरग्निः । अग्नेरापः । अद्भ्यः पृथिवी । पृथिव्या ओषधयः । ओषधिभ्योऽन्नम् । अन्नात्पुरुषः । " (क्र) पुनर्जन्माचा सिद्धांत हिंदुमात्राच्या रोमरोमांत भिनून गेला आहे. 'वासांसि जीर्णानि यथा विहाय,' 'बहूनि मे व्यतीतानि' हे गीताश्लोक पुनर्जन्मच दाखवितात. बृहदारण्य श्रुतींत म्हटलें आहे:— "तद्यथापेशस्करी पेशसो मात्रामुपादाय अन्यन्नवतरं कल्याणतरं रूपं तनुते एवमेवायमात्मा इदं शरीरं निहत्याऽविद्यां गमयित्वा चान्यन्नवतरं कल्याणतरं रूपं कुरुते." पापपुण्य, सुखदुःख इत्यादि जीं कोडीं अन्यधर्मीयांना सुटायला कठीण जातात तीं आम्हांला पुनर्जन्माच्या या तत्वामुळें सहजासहजीं कळतात. (पण) मोक्षप्राप्तीची कल्पना तर इतकी उच्च दर्ज्याची आहे कीं, ती वेदांतधर्माचें गुणसर्वस्व आहे असें म्हटल्यास अत्युक्ति होणार नाहीं. 'मनुष्य मनोनिग्रह करून फलेच्छा व कर्तृत्वाहंकार सोडून ईश्वरार्पणबुद्धीनें आपलें कर्तव्य करील तर त्याला ब्रह्मतादात्म्य प्राप्त होईल'–ही नुसती कल्पनाही इतकी उदात्त व उत्साहजनक आहे कीं कांहीं पुसायची सोय नाहीं. कठोपनिषदांत:—

**तं दुर्दर्शं गूढमनुप्रविष्टं गुहाहितं गव्हरेष्टं पुराणम् ।**
**अध्यात्मयोगाधिगमेन देवं मत्वा धीरो हर्षशोकौ जहाति ॥१॥**

असो. ह्या चार गोष्टींवरून उपनिषदांत ह्म० वेदांतशास्त्रांत काय सांगितलें आहे याची थोडीशी कल्पना होईल. मनुष्यसमाजांत हजारों घडामोडी झाल्या व होत आहेत, तथापि अतिप्राचीनकाळीं उपनिषदांत सांगितलेले सिद्धांत इतके सत्य, शाश्वत व श्रेष्ठतम आहेत कीं विसाव्या शतकांतही पाश्चात्य पंडित ते पाहून थक्क होऊन गेले आहेत. इतर राष्ट्रांच्या बाल्यावस्थेंत हिंदूंच्या पूर्वजांना हें अत्युच्च तत्वज्ञान प्राप्त झालेलें आहे. हिंदूंना अन्यवैभव मिळेल किंवा जाईल, पण त्यांचें आध्यात्मिक वैभव अनंत व अपार आहे आणि तें कोणालाही हरण करतां येणार नाहीं ! कालचक्रानुसार हिंदुराष्ट्राचें वैभव नष्ट झालेलें असलें तरी हें आमचें आध्यात्मिक वैभव नाहींसें करण्याची कोणांतही शक्ति नाहीं. सांप्रतकाळीं ज्यांच्या भाग्याचा, विधेचा व

कर्तृत्वाचा डंका जगभर गाजत आहे ते पाश्चात्य पंडितही निर्मत्सर होऊन वेदांतशास्त्रापुढें मान लववीत आहेत.

५. येथवर वेदांतशास्त्राचें दिग्दर्शन केलें, आतां वेदांतांतील मत-मतांतराचा थोडासा विचार करूं. प्रस्थानत्रयीवर आपापल्या मता-नुसार भाष्य करून चार संप्रदाय कोणते प्रचलित झाले आहेत तें मागें सांगितलेंच आहे. चार आचार्यांपैकीं पहिले श्रीशंकराचार्य हे ८ व्या शतकांत होऊन गेले, दुसरे रामानुजाचार्य हे ११ व्यांत, तिसरे मध्वाचार्य हे १३ व्यांत व वल्लभाचार्य हे १५ व्यांत होऊन गेले. चारी आचार्यांचीं मतें दिसायला भिन्न भिन्न आहेत, पण ते सर्व श्रुतिप्रमाणांवरच चालणारे आहेत अर्थात् हे चारी संप्रदाय श्रुतिसंमत आहेत. ‘ सूत्रे मणिगणा इव ’ ह्याप्रमाणें ते श्रुतीच्या दोरींत ओंवलेले चार दिव्य मणीच आहेत. वर वेदांतशास्त्राचे जे चार मुख्य विषय सांगितले त्याबद्दल त्यांची एकवाक्यता आहे; चार्वाक, बौद्ध, सांख्य, वैशेषिक इत्यादिकांचें व्यासांनीं जें खंडण केलें आहे तेंही त्यांना मान्यच आहे. फक्त पुढील गोष्टींसंबंधानें त्यांच्यांत मतभेद आहे:—

( १ ) ईश्वरानें सृष्टि कशी निर्माण केली ?

( २ ) सृष्टि उत्पन्न करण्याची परमात्म्याच्या ठिकाणीं जी शक्ति आहे तिचें स्वरूप काय आहे ?

( ३ ) मोक्षसाधनाचा मार्ग कोणता ?

आतां ह्याबद्दल चारी आचार्यांचें काय म्हणणें आहे तें आपण क्रमशः पाहूं:—

**( रा ) श्रीशंकराचार्य**:—यांच्या मताप्रमाणें जीव व ब्रह्म यांचें ऐक्य आहे. ‘ ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या जीवो ब्रह्मैव नापरः ’ हें शांकर-मताचें मुख्य तत्व आहे. ब्रह्म सत्य आणि नित्य आहे, सृष्टि मिथ्या आणि अनित्य आहे, व जीव ब्रह्मच आहे–त्याहून भिन्न नाहीं हा यांचा मुख्य सिद्धांत आहे. ब्रह्म अनंत असल्यामुळें जग त्याहून भिन्न मानल्यास ब्रह्माच्या अनंतत्वाला बाध येणार आहे; त्याप्रमाणेंच ब्रह्मानें एक प्रकारचें स्वरूप धारण करून सृष्टि निर्माण केली असें

मानल्यास ब्रह्माच्या 'अविकारी' ह्या गुणास बाध येणार ! म्हणून सृष्टि मिथ्या भासमान आहे व हिला उत्पन्न करणारी परमात्म्याची गूढ शक्ति आहे तिला 'माया' म्हणतात. हें अद्वैतमत होय.

(म) **श्रीरामानुजाचार्यः**—ह्यांच्या मताप्रमाणें ब्रह्मही सत्य आहे व सृष्टीहि सत्यच आहे. दोन्ही सत्य आहेत तरी दोन्ही भिन्न नाहींत तर सृष्टि ब्रह्माच्या अंतर्लीन आहे. सृष्टि भिन्न मानल्यास ब्रह्माच्या अनंतत्वाला बाध येईल हें यांनाही मान्य आहे. सृष्टीच्या उत्पत्तीसंबंधानें ब्रह्माला चित् व अचित् अशा दोन शक्ति आहेत. सृष्ट पदार्थांना रामानुज 'प्रकार' म्हणतात. 'प्रकार' भासमान नसून सत्य आहेत. ते ब्रह्मरूपांत बीजरूपानें राहतात व त्यांना परिणतावस्था प्राप्त होते तेव्हां ते दृश्य होतात. त्याला परिणामवाद म्हणतात. ह्या मतालाही अद्वैतमत म्हणतां येणार आहे, पण चित् व अचित् ह्या भेदामुळें त्याला विशिष्टाद्वैत म्हणतात.

(क) **मध्वाचार्यः**—यांच्या मताप्रमाणें जीव व सृष्टि दोन्हीं एक होऊं शकत नाहींत. हे तारतम्यवादी आहेत. अर्थात् त्यांत वेदांताच्या तत्वशास्त्राच्या दृष्टीपेक्षां तारतम्य (Common sense) जास्त आहे. ब्रह्मसूत्रें किंवा उपनिषदें यांत जीवशिवांत भेद दिसणारीं जेवढीं वाक्यें आढळलीं तेवढीं घेऊन त्यावर यांनीं आपला सिद्धांत उभारला आहे. मध्वाचार्यांनीं सर्वोत्तम विष्णूच्या आत्यंतिक भक्तीचें उत्कृष्ट वर्णन केलेलें असल्यामुळें हे आपणास मान्य आहेत; पण हें निश्चित आहे कीं, तत्वज्ञानाच्या तात्त्विक सिद्धांताच्या उच्च सिंहासनावरून खालीं उतरून यांनीं व्यवहाराच्या दृष्टीनें आपलें मत बनविलें आहे. हें द्वैतमत आहे.

(ष्ण) **वल्लभाचार्यः**—ह्यांनीं ब्रह्माला सच्चिदानंदस्वरूप मानलं आहे. जगत्सृष्टि ब्रह्माच्या इच्छेनें झाली आहे असें हे मानतात. ब्रह्माला जेव्हां सृष्टि उत्पन्न करण्याची इच्छा झाली तेव्हां 'अग्नेः विस्फुलिंगा इव' म्ह० अग्नीपासून ठिणग्या निघतात त्याप्रमाणें ब्रह्मापासून अनंत अणु उत्पन्न होतात, त्यांतील 'सत्' अंशाची प्रकृति बनते, 'चित्'

अंशाचा जीव बनतो व ' आनंद ' अंशाचा आंतरिक पदार्थ (Spirit) बनतो असें यांचें मत आहे. हे श्रीकृष्ण व परब्रह्म एकच मानतात. यांच्या मतांत भक्ति प्रधान आहे. ह्याला शुद्धाद्वैत म्हणतात.

६ असो. हीं चारही मतें दृष्टांतरूपानें सांगावयाचीं म्हणजे मध्वाचार्यांच्या मताला यंत्र आणि यंत्रकाराचा दृष्टांत लागतो. **यंत्र आणि यंत्रकार** हे एक होण्याचा संभव नाहीं, परंतु यंत्रकारावांचून एकटें यंत्र कांहींही करूं शकत नाहीं. रामानुजांच्या मताला **चुंबकमणि आणि लोह** हा दृष्टांत लागतो. मण्याची लोह आकर्षण करण्याची शक्ति दिसत नाहीं, पण ती परिणामावरून कळते. वल्लभाचार्यांनीं **अग्नि आणि स्फुलिंग** हा दृष्टांत स्वतःच दिला आहे. शंकराचार्यांच्या मताला **समुद्राची** उपमा शोभते.

७. चारी आचार्यांचीं मतें वर थोडक्यांत सांगितलीं आहेत. त्या मतानुसार त्यांच्या मोक्षसाधनांची व धर्मनियमांची रचना झालेली आहे. सृष्टि मिथ्या मानल्यामुळें शंकराचार्य सर्व कर्म अज्ञानदशायोग्य समजतात व ज्ञानानें कर्मबंधापासून मुक्तता होते असें म्हणतात, पण हें रामानुज मानीत नाहींत. धर्मकर्माचेंही महत्व आहे व धर्मकर्माचरण मनुष्यमात्रानें केलें पाहिजे, असें ते म्हणतात. संन्यासावांचून ब्रह्मैक्य नाहीं असें शंकराचार्य सांगतात व संसारांत राहूनही मनुष्याची आध्यात्मिक उन्नति होऊं शकते असें रामानुज म्हणतात. ब्रह्म निर्गुण-निराकार मानल्यामुळें भक्ति हें एक साधन आहे असें शंकराचार्य सांगतात, उपास्यउपासकांचें ऐक्य म्हणजे जीवब्रह्मैक्य हें त्यांच्या मतें सार आहे. रामानुजांचें ब्रह्म सगुण असल्यामुळें उपासक उपास्याहून सर्वकाळ भिन्न राहाणार आहे. त्यांच्या मतें जीवानें यावज्जन्म भगवद्भक्ति केली म्हणजे त्याला ब्रह्मलोकाची प्राप्ति होते. शंकराचार्यांना ब्रह्मलोक नको आहे तर जीवब्रह्मैक्य पाहिजे आहे. ह्यासंबंधानें मध्वाचार्य आणि वल्लभाचार्य यांचीं मतें रामानुजांच्याच मताला जुळणारीं आहेत. ह्या तिन्हीं आचार्यांचा शंकराचार्यांच्या मायावादाला विरोध आहे, तथापि ' प्रकार ' ' इच्छा ' कांहीं तरी त्यांना गृहीत धरावें

लागल्यामुळें मायावादाचें खंडण त्यांच्या हातून झालेलें नाहीं. शंकराचार्यांनीं ज्ञानाला प्रधान मानलें आहे व कर्म आणि भक्ति गौण मानलीं आहेत, इतर तीन आचार्यांनीं ज्ञानाची निंदा केली नाहीं पण ज्ञानाबरोबर भक्ति आणि कर्म सुद्धां श्रेष्ठच मानलीं आहेत.

८. ज्ञानमार्ग सर्वसाध्य नाहीं पण ज्ञानावांचून गतिही नाहीं. ज्ञानाला बुद्धिची गरज असल्यामुळें बुद्धिवैभव सर्वांच्या सारखें वांट्याला येणें कठीण असल्यामुळें ज्ञानाधिकारी जीव थोडे आहेत. भक्तिपंथ त्या मानानें बहु सोपा आहे. शुद्ध व पवित्र अंतःकरणाची त्याला अपेक्षा आहे. कर्म आणि भक्ति ह्या ज्ञानसोपानाच्या पायऱ्या आहेत असें म्हटलें तरी चालेल. असो. सर्व आचार्य ब्रह्मनिष्ठ व भगवद्भक्त होते व त्यांनीं आपणा संसारी लोकांवर असंख्य उपकार केले आहेत, त्यांना प्रणाम असो. ' मुमुक्षू ' चा अद्वैतसंप्रदाय असला तरी इतर संप्रदायांविषयींही त्याला प्रेमादर वाटतो. सर्व आचार्य त्याला गुरुरूप आहेत.

---

३३

पाण्यांत राहूनही पाण्याच्यावर पद्मिनीनें आपलीं सुमनें ठेविलीं तरी त्या पद्मांना जीवनावेगळें राहतां येत नाहीं. याचप्रमाणें सुबुद्धि आपल्या संकल्पांना संसारसरोवरांत वरचेवर पेलून धरीत असली तरी त्या संकल्पांना संसारजीवनाहून अलग राहतां येत नाहीं. प्रकृति जपूं नये. प्रकृतीस जपावें ! संसाराशीं वागणूक दाईसारखी ठेवावी, आई सारखी ठेऊं नये हा इत्यर्थ.

३४

प्रसंग मात्र योग्य असावा, मग सर्व कांहीं खपतें. अभिमन्यूच्या मृत्युसमयीं द्रोणादिकांचा रडवेपणाही खुलून दिसत नाहीं काय ?

# २२ " सर्वांघटीं राम. "



भक्ति म्हणजे सर्वां भूतीं । सप्रेम भजनयुक्ति ॥
प्राप्ती म्हणजे परोक्षस्थिति । भगवत्स्फूर्ति अनिवार ॥ १ ॥

—श्रीएकनाथ.

१ कर्म, उपासना व ज्ञान हीं भगवत्प्राप्तीचीं तीन मुख्य साधनें आहेत व जपतपादि हे त्या साधनांचे मार्ग आहेत. हे सर्व योग्यच आहेत, पण हरिप्राप्तीच्या सर्व साधनांत मुख्य आणि हरीला अत्यंत आवडणारें साधन कोणतें आहे म्हणून विचाराल तर तें ' सर्वांघटीं राम ' पाहणें हेंच होय असें संतमहात्म्यांचें स्वानुभवपूर्वक सांगणें आहे. या साधनानें हरीचा प्रसाद शीघ्र व निश्चयानें होतो. सर्व भूतभौतिक सृष्टि हरीची असून हरि सर्वांतर्यामित्वानें तिच्या पोटांत आहे; किंबहुना सृष्टिरूपानें श्रीहरीच नटलेला आहे. नाथांनीं म्हटलें आहे कीं, घृत आणि घृतकणिका याप्रमाणें हरि आणि जग यांचा समन्वयसंबंध आहे. ज्ञानेश्वरमहाराजांनीं अमृतानुभवांत ' जग आघवें वस्तुप्रभा ' हा सिद्धांत मोठ्या बहारीनें स्थापित केला आहे. जग वेगळें सारून हरीला शोधायला नको आहे, जगच हरिस्वरूप आहे. हरीच्या स्वरूपीं जग आणि जगांत हरि पाहतो तो उत्तम भक्त, असें गीताभागवतांत अनेकशः सांगितलें आहे. ' वासुदेवः सर्वमिति स महात्मा सुदुर्लभः ' असें भगवान् म्हणतात.

२ भागवतांत भक्तांच्या तीन पायऱ्या सांगितल्या आहेत. पाषाणप्रतिमा हाच देव असें मानून तेथें पूजाअर्चादि भक्तिभावानें जो करितो, पण देवाचे जे भक्त त्यांच्यापुढें जो वांकत नाहीं व इतर जनांना मुळींच मानीत नाहीं तो अधम किंवा प्राकृत भक्त होय. प्रतिमा हीच देवाची मूर्ति व याबाहेर देव न पाहतां प्रतिमा पाहिली कीं देव आला व प्रतिमा भंगली कीं देव मेला असें मानून प्रतिमेपुरता देवाचा जो संकोच करितो व बाहेर अगदीं मूढाप्रमाणें वागतो तो भक्त जड होय. ह्याहून

वरच्या पायरीचा भक्त जो आहे तो ईश्वराला उत्तम मानून त्यावर प्रेम ठेवतो, तद्भक्ताला मध्यम मानून त्याशीं मित्रभाव ठेवतो, अज्ञ व बद्ध जीवांना अधम मानून त्यांना हलके लेखून कृपापात्र समजतो व द्वेष्यांना पापी समजतो. अधम भक्तापेक्षां ह्याच्या भेदबुद्धींत कांहींसें तारतम्य आहे व हा देवभक्तांबद्दल प्रेममैत्रीसारखा सद्भाव बाळगतो, म्हणून हा त्यावरून वरचढ मानला आहे. उत्तम भक्त म्हणजे भागवतोत्तम. तो सर्वांत श्रेष्ठ होयः—

**सर्व भूतेषु यःपश्येद्भगवद्भावमात्मनः ।**
**भूतानि भगवत्यात्मन्येष भागवतोत्तमः ॥** (भागवत ११-२-४५.)

३ जो सर्व भूतांच्या ठिकाणीं आत्मनः ह्म. परमात्मनः ह्म. श्रीहरीचा भगवद्भाव पाहतो व भगवंताच्या ठिकाणीं भूतें पाहतो तो उत्तम भक्त होय. सर्वांभूतीं भगवद्भाव ज्याचा अखंड आहे तो प्राप्तपुरुष धन्य होय. ‘ सर्वांभूतीं मी भगवंत । सर्वभूतें मजआंत ’ असें साक्षात् भगवंताचें वचन आहे व ह्या अनुभवाच्या हद्दीवर जो आरूढ होऊन स्थिर झाला तोच भक्तोत्तम होय. योग्यांचा अग्रणी, ज्ञान्यांचा शिरोमणी व सिद्धांचा मुगुटमणी तोच होय ! वासुदेवमय झालेला तो महात्मा विषयेंद्रियसंयोगापासून होणाऱ्या सुखदुःखादि द्वंद्वांच्या फार पलीकडचा आहे. त्याचें कुल पाहायला नको, कर्म पाहायला नको, ज्ञान पाहायला नको, त्याच्या अवस्थेंत वर्णाश्रमाचीं बंधनें सुद्धां नाहींत. तो सर्वभूतसम झालेला महात्मा निरपेक्ष, शांत, दांत, निर्वैर समभावन इ० इ० असतो म्हणून त्याचें वेगळें वर्णन करून सांगायला कशाला पाहिजे ? हरिचरणीं रमलेला, हरिनामांत रंगलेला व आंतबाहेर अवघा हरिमय झालेला तो हरिभक्त हरिवेगळा कसा राहील ? माशाला जसें जीवन तसा त्याचें सर्वस्व हरि असतो. त्रैलोक्याचें राज्य त्याच्यापुढें टाकलें तरी तो तिकडे ढुंकून सुद्धां पाहणार नाहीं:—

**हरिचरणीं अपरोक्षस्थिति । तेथील क्षणार्धाची जे प्राप्ती ॥**
**त्यापुढें त्रिभुवनविभवसंपत्ती । भक्त मानिती तृणप्राय ॥ १ ॥**

४ कोणी प्रपंची मनुष्य म्हणेल कीं, हरीला क्षणभर विसरून जर मोठी संपत्ती मिळून जन्माचें दारिद्र्य जात असेल, तर काय हरकत

आहे? खरोखर हा विचार मूढांनाच योग्य आहे. तसें नसतें तर शिवाजीकडून पालखीजवाहीर वगैरे संपत्ती आलेली तुकाराममहाराजांनीं पायानें दूर लवंडून दिली नसती ! शिष्यांकडून वर्षासनें ठरवून घेऊन रोजच्या मनीऑर्डरींचे पैसे अगर देणग्यांच्या रूपानें त्यांच्याकडून कर उपटणारे ' गुरु ' जगांत पुष्कळ आहेत. तुकाराममहाराज अस्सल प्रतीचे महात्मे होते. वित्त विष्टेसमान मानून पळभर हरीला न विसरणारे ते भक्तोत्तम होते. त्यांच्या दृष्टीला लौकिकव्यवहार मायिक व खोटा भासत असून हरिस्वरूपीं तल्लीन होऊन राहणें हेंच त्यांना सत्य वाटत होतें. स्वप्नांतलें राज्य टाकून जागृतींतला रुपया आपण घेऊं. तसेंच भक्तांना प्रपंच स्वप्नतुल्य भासत असल्यामुळें प्रपंचांतल्या कुबेराच्या संपत्तीपेक्षां हरिचिंतनांतली ' क्षणार्धाची प्राप्ती ' ज्यास्त किंमतीची वाटते. नित्यानित्यविवेक त्यांचा जागरूक असल्यामुळें ते नित्य हरीच्या भजनचिंतनांत निमग्न असतात.

५ सर्व भूतांच्या ठिकाणीं हरि आहे ही भावना नित्य ठेवून सर्वत्र हरि पाहण्याचा अभ्यास ठेवणें किती उन्नतिप्रद व आनंददायक आहे! आपणां संसारिकांचा अहोरात्र भूतमात्रांशींच संबंध येत असतो. दुसऱ्यांचे गुणदोष पाहून त्यांच्या ठिकाणीं मित्रशत्रुभाव ठेवण्याची आपली साहजिक प्रवृत्ति होते. आपल्या विचारांशीं व स्वभावांशीं जुळणारे लोक आपल्याला प्रिय वाटतात व विरुद्धप्रकृतीचे लोक नकोसे वाटतात. हा प्रियाप्रियभाव जीवमात्राला सहज आहे, पण त्याचा निरोध करणें व अंतर्मुखवृत्ति करून सर्वांकडे समतेनें पाहणें याला विलक्षण प्रकारचें धैर्य लागत असतें. जीवभाव जिंकणारे पुरुष बाह्य शत्रु जिंकणाऱ्या वीरांपेक्षांही वीर आहेत ! बाह्यशत्रु जिंकणाऱ्या लढवय्यांपेक्षां अंतःशत्रु जिंकणारे संत ज्यास्त शूर आहेत. बाहेरचे शत्रु समोर येतात म्हणून त्यांना मारणें सुलभ जातें, पण शरीरांत राहून शरीराला तापविणारे पण दृष्टीपुढें न ठरणारे अशरीरी शत्रु जिंकणें अत्यंत कठिण आहे. बाह्य शत्रूला ज्या शरीरबळानें मारतां येतें तें बळ रानडुक्कर, वाघ, सिंह यांच्या ठिकाणीं मनुष्यापेक्षांही जास्त असतें ! ह्या पूर्वोक्त

दोन कारणांमुळे अंतःशत्रु म्हणजे काम, क्रोध, लोभ, मोह, मत्सर, इत्यादि मनोविकार जिंकणें म्हणजे त्यांचा आवेग धैर्यानें सहन करणें; किंबहुना त्यांचा उद्भवच होणार नाहीं अशी हरिप्रेमानें हृदयभूमि तयार करणें हें अत्यंतात्यंत शौर्याचें काम आहे. हे सर्व विकार ज्या द्वैताच्या संगतीनें उत्पन्न होतात तें द्वैत गिळून 'एकमेवाद्वितीय' ब्रह्मस्वरूपाच्या चिंतनानें ब्रह्मरूप होणें हें मनुष्यमात्राचें अत्युच्च कर्तव्य आहे. ब्रह्म स्वयें अंगें व्हावें ह्मणजे रामरूप व्हावें व रामरूपच सर्व भूतांच्या ठायीं पहावें. ह्या समतेच्या भूमिकेवर अखंड नांदणारे महात्मे धन्य होत. लोकांत वागतांना इतर लोकांचे गुणदोष पाहून हे जड प्रकृतीचे धर्म आहेत असें मानणारे व वैषम्यदर्शनानेंही आपल्या समतेस धक्का बसूं न देणारे वीर आमचे संतबहाद्दरच होत. संत हे सर्वत्र समदर्शी होऊन सर्वांघटीं राम पाहतात. ज्ञानेश्वरमहाराज म्हणतातः—

**हें समस्तही श्रीवासुदेव। ऐसा प्रतीतिरसाचा वोतला भाव।**
**म्हणोनि भक्तांमाजी राव। आणि ज्ञानिया तोचि॥ १॥**

भक्तिमार्ग उर्फ भागवतधर्म तो हाच. महाराज म्हणतातः—

**जें जें भेटे भूत। तें तें मानिजे भगवंत।**
**हा भक्तियोग निश्चित। जाण माझा॥ २॥**

भगवान् श्रीकृष्ण स्वतः गीतेंत सांगतातः—

**सर्वभूतेषु येनैकं भावमव्ययमीक्षते।**
**अविभक्तं विभक्तेषु तज्ज्ञानं विद्धि सात्त्विकम्॥**

अ. १८—२०

ह्याचा अर्थ ज्ञानेश्वरमहाराजांच्याच शब्दांनीं सांगावासा वाटतो. "ज्याच्या उदयाबरोबर ज्ञात्यासह ज्ञेय बुडून जातें म्हणजे त्रिपुटी मावळते तें सात्त्विक ज्ञान होय. सूर्याच्या गांवीं जशी अंधाराची वार्ता नाहीं किंवा सागराला नदी ह्मणजे काय हें ठाऊक नाहीं त्याप्रमाणें शिवापासून तृणापर्यंत सर्व व्यक्तींत भिन्नत्व ज्याला दिसत नाहीं तें खरें ज्ञान होय. सर्वांभूतीं भगवंत पाहण्याची दृष्टि हेंच मोक्षलक्ष्मीचें भुवन होय!"

---

# २३ वाङ्मय तप.



१. वाङ्मय तप म्ह० वाणीचें तप फार थोड्यांना साधतें. वाचिक हिंसा आपली नित्य होत असते. कळून न कळून, मुद्दाम, चुकीनें, गैरसमजुतीनें, आपले शब्द कित्येकांना व्यथित करीत असतात ! आजपर्यंत आपल्या वाचेनें किती अहिंसा केली आहे, कितीकांचीं वर्में उच्चारिलीं आहेत, कितीजणांना दुखविलें आहे, कितीकांचें बहुकाळचें मित्रत्व तोडलें आहे, किती सत्कार्यांच्या विघाताला ती कारणीभूत झाली आहे याचा इतिहास आपण आपल्या मनश्चक्षूपुढें आणूं तर लज्जेनें, दुःखानें व पश्चात्तापानें आपलें अंतःकरण करपून जाईल ! !

२. जी वाचा हरिस्मरणांत खर्च केली तर मोक्षाचा मुक्काम आपण गांठूं, ती परनिंदा व आत्मस्तुति यांत खर्च करून आपण नरकाच्या द्वाराकडे धांव घेत असतों !

३. वाचा ही श्रीहरीची अमोलिक देणगी आहे; तिचा दुरुपयोग करून आपण कृतघ्नपणाचें पाप जोडीत असतों. वाचेचा हरिनामस्मरणांत किंवा सदुपदेशांत व्यय केला तर आत्मपरहित साधून आपण धन्यता पावूं.

४. वाचिकतपाचें पहिलें लक्षण म्हणजे मौन ! इतर इंद्रियांचें दमन करणें जसें अवश्य तसेंच किंबहुना त्याहून अधिक वागिंद्रियाचें दमन अवश्य आहे. ज्ञानोबारायांनीं आपल्या गीताभाष्यांत वाचिकतपाचा जागोजाग फार नामी विचार केला आहे. त्यांच्या गीताभाष्यांतील अध्याय १३ ओंव्या २६१–२७२ मनन करण्यायोग्य आहेत. ते म्हणतात " तंव बोलणेंचि नाहीं । बोलों म्हणे जरी कांहीं । तरी बोल कोणाही । खुपेल कां ॥ २६४ ॥ " बोलाचा मार कठिण असतो. तलवारीच्या धारेहून अधिक तिखटपणा त्यांत असतो, ह्मणून न जाणों आपला बोल कोणाला खुपेल यासाठीं सज्जन आधीं बोलतच नाहीं ! कारण ' बोलतां अर्थाकही निघे ' वादविवादाच्या भरांत, विषयप्रति-

पादनाच्या जोरांत एखादा कमजास्त शब्द तोंडून निघण्याचा संभव असतो. कोणाच्या वर्मी लागेल, कोणाच्या मनांत शंका उत्पन्न करील, चालत्या गाड्याला खीळ घालणें ह्या म्हणीप्रमाणें चालू भरांत आलेला विषय मोडेल, कोणी मनांत खोचेल किंवा भय पावेल, सभा बेरंग होऊन जाईल, इत्यादि विचार मनांत घेऊन सज्जन आधीं बोलणेंच कमी ठेवतो.

५. श्रोत्यांच्या आग्रहावरून त्यानें तोंड उघलेंच तर तो कसें बोलतो हो? "मग प्रार्थिला विपाये। जरी लोभे बोलों जाये। तरि परिसत्या होये। मायबाप ॥ २६८ ॥ कां नादब्रह्माचि मुसें आलें। कीं गंगापय असळलें। पतिव्रते आलें। वार्धक्य जैसें ॥ २६९ ॥ तैसें साच आणि मवाळ। मितले आणि रसाळ। शब्द जैसे कल्लोळ। अमृताचे ॥ २७० ॥" असें बोलतां येईल तरच बोलावें, नाहीं तर मौन धरून एकाकी असावें. बोलून वैरी करण्यापेक्षां दूर राहून व मौन धरून उदासीन राहणें चांगलें!

६. "हितं मनोहारि च दुर्लभं वचः" असें भारवीनें किरातांत ह्मटलें आहे. 'तथ्यं पथ्यं सहेतुप्रियमीतमृदुलं सारवद्दैन्यहीनं' असें भाषण करावें.

> सत्यं ब्रूयात्प्रियं ब्रूयात् न ब्रूयात्सत्यमाप्रियं।
> प्रियं च नानृतं ब्रूयादेष धर्मः सनातनः ॥ १ ॥

सत्य व प्रिय बोलावें, पण सत्य असून अप्रिय व प्रिय असून असत्य बोलूं नये हा सनातनधर्म आहे.

७. बोलण्यांत अकरा दोष येऊं नयेत असें ज्ञानोबाराय सांगतात. १ विरोधवादबळ ह्म० दुसरा बोलेल त्याच्या विरुद्ध जोरानें बोलणें. २ प्राणितापढाळ ह्म० प्राण्यांचीं अंतःकरणें क्षुब्ध किंवा कासावीस करणें. ३ उपहास. ४ छळ ह्म० छलवादीपणा. ५ वर्मस्पर्श. ६ आटु ह्म० अटीचें बोलणें. ७ वेग ह्म० शिरा ताणून, हातपाय आपटून, डोळे फिरवून तावातावानें बोलणें, ८ विदाण ह्म० कपटाचें, ढोंगाचें भाषण. ९ आशा ह्म० आशा ठेवून किंवा दुसऱ्याला आशेला लावून

ोलणें. १० शंका ह्म० दुसऱ्याच्या मनांत तिसऱ्याविषयीं शंका उत्पन्न ोईल असें बोलणें. व ११ प्रतारण ह्म० फसवेगिरीचें बोलणें. हे ्करा दोष सज्जनाच्या वाचेनें टाकून दिलेले असतात. " विरोधवाद-बळु । प्राणिताप ढाळु । उपहास छळु । वर्मस्पर्श ॥ २७१ ॥ आटुवेग विंदाण । आशा शंका प्रतारण । हे संन्यासिले अवगुण । जिया वाचा ॥ २७२ ॥"

८. भगवंतांनीं गीतेच्या १७ व्या अध्यायांत त्रिविध तपाचे वर्णन करितांना वाङ्मयतपाबद्दल म्हटलें आहे:—

**अनुद्वेगकरं वाक्यं सत्यं प्रियहितं च यत् ।**
**स्वाध्यायाभ्यसनं चैव वाङ्मयं तप उच्यते ॥**

ज्ञानेश्वर महाराजांनीं ' आतां आईक निष्पाप । वाङ्मय तें ' म्हणजे निष्पाप करणारें तें वाङ्मयतप आतां ऐक, असा उपोद्धात करून वरील श्लोकाचें सुरस विवरण केलें आहे. दुसऱ्याच्या चित्ताला उद्वेग न देणारें, सत्य, प्रिय, हित, वेदाध्ययन किंवा नामस्मरण यांतच रंगलेलें जें वाचिक कर्म तें वाचेचें तप होय.

९. परीस जसा लोखंडाचा आकार व वजन यांत न्यूनपणा येऊं न देतां त्याचें सोनें करितो त्याप्रमाणें दुसऱ्याची मान्यता व महत्व यांची हानि होऊं न देतां जें सत्यप्रियहित बोलणें तें वाचेचें तप होय; अर्थात् दुसऱ्याचा पाणउतारा करून समाजांत त्याची अप्रतिष्ठा वाढविणारी जी वाचा ती वाचिक हिंसाच करिते असें म्हणण्यास हरकत नाहीं. आमचीं वर्तमानपत्रें, मासिकें, सभा, क्लब्स वगैरे मंडळी लोकांना उपयुक्त माहिती देऊन लोकहिताचीं कामें निःसंशय करणारी आहेत, पण त्यांच्या हातून गेल्या ४०।५० वर्षांत वाचिक हिंसा किती झाली आहे, एकमेकांचे ' आंग व तुक ' म्हणजे महत्व कमी करण्यांत कशी चढाओढ लागली आहे यांचा विचार देशहितेच्छूंनीं अवश्य करून अनुद्वेगकर व सत्य-प्रियहित लेख व भाषणें यांच्या योगानें देशहित अधिक साधेल किंवा कसें हा प्रयोग यापुढें तरी करून पाहिल्यास बरें होईल !

१०. भाषण सत्यप्रियहित असावें. कसें? " जोडे अमृताची सुरसरी। तैं प्राणांतें अमर करी। स्नानें पापताप वारी। गोडीही दे- ॥ २१९ ॥ तैसा अविवेकही फिटे। आपुलें अनादित्व भेटे। आइकतां रुचि न विटे। पियूषीं जैशी ॥ २२० ॥" अमृताची गंगा जोडली म्हणजे ती अमरत्व देते, व पापताप वारते, त्याप्रमाणें सज्जनमुखींचीं अवीट व गोड अक्षरें ऐकून अविवेक जाऊन आपलें स्वस्वरूप आपणास भेटतें.

११. कोणी आर्तानें विचारलेंच तर असें बोलावें, नाहीं तर वेदाध्ययन किंवा नामस्मरण यांत दंग होऊन असावें. " जरी कोणी करी पुसणें। तरी होआवें ऐसें बोलणें। नातरी आवर्तणें। निगम कां नाम ॥" कोणीं पुसल्यावांचून आपणच दाटून दुसऱ्याला उपदेश करायला प्रवृत्त होणें हें सज्जन कधीं करीत नाहींत. ' नापृष्टः कस्यचिद् ब्रूयात् ' म्ह० पुसल्यावांचून बोलों नये असा त्यांचा कायदा आहे. मूक असेल त्यालाच अन्न देण्यांत पुण्य आहे. " उभ्या बाजारीं हरिकथा। हे तों नावडे पंढरिनाथा " बाजारांत उभें राहून लोकांना आपणच अगत्य दाखवून बोलावून आणून दाटून उपदेश करणें हें देवाला रुचत नाहीं.

१२. तात्पर्य काय कीं, मौन किंवा हरिनामस्मरण हेंच वाचिक तप होय. वेदाध्ययन किंवा नामस्मरण हाच स्वाध्याय होय." नातरी एकाधें नांव। तेंचि शैव कां वैष्णव। वाचे वसे तें वाग्भव। तप जाणावें ॥"

१३. व्यर्थ भाटासारखी बडबड किंवा तेल्याच्या घाण्यासारखी करकर करून वाग्देवीला शीण देणें हें पातक आहे. ' घेईं घेईं माझे वाचे। गोड नाम विठोबाचें ॥

१४नामचिंतनानें नामी प्रगट होत असतो;वृत्तींच्या अन्य वाटा मोडून वृत्ति एकाकार होतात हा तर अनुभवच आहे.नामस्मरणाच्या प्रसंगीं नर प्रपंचभान विसरतो व त्याला हरीचाच छंद लागून जातो. हें काम नामस्मरणाइतकें जलद व खात्रीनें दुसऱ्या कोणत्याही साधनानें होत नाहीं.

१५ रामकृष्णहरीचीं अनंत नांवें आहेत. कोणत्याही एका नांवाचा जिव्हेला टकळा लावून द्यावा. जिव्हा हें एक इंद्रिय हरीच्या ठिकाणीं रोवलें कीं बाकीचींही हळू हळू तेथेंच रंगू लागतात. नारायणानें जिव्हा दिली आहे ती त्याच्याच नामांत योजून आपण सुटून जावें. "हरीनाम सार । जिव्हा या नामाची । उपमा त्या देवाची । कोण वाणी ? ॥" असें ज्ञानोबाराय प्रेमानें विचारतात.

१६. नामस्मरणानें जीवपणा विरघळत जातो. 'विवरत विरत माघारी' म्ह० मूळपदावर वृत्ति नेतां नेतां निवृत्त होऊन जावें. वेदांतांत जीवाला मिठाच्या खड्याची उपमा देतात ती फार बहारीची आहे. मिठाचा खडा स्वरूपतः सागराहून भिन्न नाहीं, तसा जीव स्वरूपतः परमात्म्याहून वेगळा नाहीं. जीवो ब्रम्हैव नापरः' हेंच खरें आहे. तथापि खडा काठिन्यामुळें वेगळा दिसतो तसा जीव अहंकारकाठिन्यामुळें वेगळा भासतो. हें काठिन्य काढून टाकण्याचा सुलभ उपाय हा आहे कीं त्याला मूळाचा नित्यसंगति लावून द्यावी. देवाच्या नामाचा टकळा वाचेला व रूपाचें चिंतन चित्ताला लावावें. नामाची संततधार हरिस्वरूपावर सोडावी म्हणजे मिठाचा खडा वारंवार समुद्रांत बुडविण्याच्या क्रियेंतच तो जसा विरघळत विरघळत पार नाहींसा होतो त्याप्रमाणें जीवाला हरिचिंतनांत, हरिप्रेमांत, हरिनामरंगांत वारंवार वारंवार बुचकळून काढण्याचा क्रम ठेवला तर जीवाचेंही अंग न धरवल्यामुळें जीव आपला जीवपणा अर्थात् अहंकार टाकीत टाकीत आपला जीवभाव सोडतो व परमात्मभाव प्रगटतो ! ! हरिशरणागति किंवा सायुज्यता ती हीच होय. " एक मीवांचूनि कांहीं । भिन्नाभिन्न आन नाहीं । सोहंबोधें तयाच्या ठायीं । अनन्य होय ॥ १ ॥ पै आपलेनि भेदेंवीण । माझें जाणिजे जें एकपण । तयाचि नांव शरण । मज येणें गा ॥ ५ ॥ सुवर्णमणि सोनया । ये कल्लोळ जैसा पाणिया । तैसा मज धनंजया । शरण ये तूं ॥ ३ ॥" वाचिक तपाचें खरें व अखेरचें फळ हें होय. सारांश, निरंतर मौन किंवा ' निगम का नाम ' यांत जीवभावविसर्जन हें वाचिक तप होय.

१७. जो आपली वाचा आणि मन शुद्ध राखतो त्याला वेदांतानें

प्राप्त होणारीं सर्व फळें मिळतात; म्हणून मनुष्यानें, कोणत्याही आपत्तीनें तो कितीही ग्रस्त असला तरी, दुसऱ्याच्या मनाला लागेल असें बोलूं नये, परद्रोह करणारें कर्म मनांतही आणूं नये, व ज्यानें दुसऱ्याच्या चित्ताला उद्वेग होईल असा शब्दही उच्चारूं नये.

**यस्य वाङ्मनसी शुद्धे सम्यग्गुप्ते च सर्वदा ।**
**स वै सर्वमवाप्नोति वेदांतोपगतं फलम् ॥ १६० ॥**
**नारुंतुदस्यादार्तोऽपि न परद्रोहकर्मधीः ।**
**ययास्योद्विजते वाचा नालोक्यां तामुदीरयेत ॥ १६१ ॥**

—मनुस्मृति अ० २.

१८. वाचेनें पाखांडाच्या गोष्टी, वेदनिंदा, देवतांची निंदा, द्वेष, हट्टवादीपणा, गर्व, क्रोध, व कठोरपणा हे सर्व दोष टाकावेत. पाखांडीपणाच्या गोष्टी तर बोलूं नयेत व ऐकूंही नयेत. नारदांनीं भक्तिसूत्रांत ' स्त्रीधननास्तिकचरित्रं न श्रवणीयम् ' असें स्पष्ट म्हटलें आहे; स्त्रीचरित्र, धनाच्या गोष्टी व नास्तिकचरित्र श्रवण करूं नये. तसेंच वेद परमपूज्य आहेत, ज्ञानाचा उगम वेदच होत म्हणून वेदनिंदा करूं नये. " पैं अहितापासूनि काढिती । हित देऊनि वाढविती । नाहीं श्रुतिपरौती । माउली जगा ॥ १ ॥ " असें श्रीज्ञानेश्वरासारखे महात्मे सांगत आहेत:—

" जो जगीं समान सकृप । हिताहित दाविता दीप । तो अमान्य केला बाप । वेद जेणें ॥ न धरीचि विधीची भीड । न करीचि आपली चाड । वाढवीत गेला कोड । इंद्रियांचें ॥ " ( ज्ञानेश्वरी अ० १६ ) त्याला ऐहिक किंवा पारत्रिक कांहींच लाभ होत नाहीं. वेदनिंदकाबद्दल तुकोबाराय म्हणतात:—

अभंग.

**मातेचीं जो थानें फाडी । तया जोडी कोण ते ॥ १ ॥**
**वेदां निंदी तो चांडाळ । भ्रष्ट सुतकिया खळ ॥ २ ॥**
**आगी लावी घरा । मग वसती कोठें थारा ॥ ३ ॥**
**तुका म्हणे वर्म । येरा नाचवितो भ्रम ॥ ४ ॥**

पाखांडाच्या गोष्टी व वेदनिंदा यांचा वाचेला जसा विटाळ न-

-सावा तसा देवतानिंदेचाहि वाचेला स्पर्श होऊं देऊं नये. द्वेष, गर्व, क्रोध, पारुष्य ह्या आसुरी गुणांचा म्हणजे महद्दोषांचा विटाळही वाचेला आणि अर्थात् मनालाही होऊं देऊं नये. स्मृतिशास्त्र हेंच सांगतें:—

नास्तिक्यं वेदनिंदां च देवतानां च कुत्सनम् ।
द्वेषं स्तम्भं च मानं च क्रोधं तैक्ष्ण्यंच वर्जयेत् ॥
—मनुस्मृति अ० २–१६३.

१९. कविवर्य मोरोपंत यांनीं वसंततिलकावृत्तांत 'वाङ्मनःप्रार्थना' म्हणून ५१ श्लोकांचें एक प्रकरण केलें आहे तें वाचकांनीं सावकाश पहावें. "ऐके मना ! परिस तूंही जिभे ! कशाला । व्यर्थोदितें करिसि हें मुख भेकशाला" व्यर्थ भाषण करणें म्हणजे आपली जीभ भेकशाला ( बेडकांची शाला ) करण्याप्रमाणेंच आहे. वायफळ बोलणीं वारावीं व वाचा हरिभजनांत रंगवावी. जीभ अष्टौप्रहर कुत्रीप्रमाणें भुंकत ठेवूं नये, तर तिला हरिनामरस पाजावा. पंत म्हणतात:—

हो स्तोत्रपात्र रसने ! प्रभुनाम गा गे !
मान्या शुनी न, जरि आठहि याम गागे ।
दे मान, पुण्य, पुरुषार्थ, सुखादि सोपी
मुक्तीहि, नामरस दुर्बळसा दिसो, पी ॥१॥
यामाष्टकांतहि पळार्धहि आळसानें
माता जसें न विसरे निजबाळ सानें ।
तैसीच नामजननी बहुवत्सला हे
आनंद या सुरभिचा बहु वत्स लाहे ॥ २ ॥

२० पंतांनीं रसनेला म्ह० वाचेला उद्देशून एक फार बहारीचें पद केलें आहे तें पुढें देण्याचा मोह होत आहे.

### पद.

रसने ! न राघवाच्या थोडी यशांत गोडी ॥ ध्रु० ॥
निंदास्तुती जनाच्या । वार्ता वधूधनाच्या ।
मिथ्या व्यथा मनाच्या । कांहीं न यांत जोडी ॥ १ ॥
साधूंचिया सदार्ते । सुख देतसे सदा तें ।

**श्रवणीं सुधा मदातें । सोडूनि हात जोडी ॥ २ ॥**
**विनवी मयूर भावें । साखि हेचि नित्य गावें ।**
**मजला द्रवोनि पावें । दुसरें न बंध तोंडीं ॥ ३ ॥**

**भावार्थ**—हे रसने, रामाच्या यशांत रंगून रहा. त्यांत गोडी थोडी नाहीं, फार आहे. चारचौघांत बसून लोकांच्या स्तुतिनिंदा करण्यांत किंवा द्रव्यदारांच्या गोष्टी सांगण्यांत तूं मारे रंगून जातेस, आणि कोणीं बोलायला नसेल तेव्हां चिंतेचीं जाळीं विणण्यांत तूं व्यर्थ झिजून जातेस, पण यांत काय लाभ आहे, याचा कधीं विचार केला आहेस काय ? तूं रामनामांत रमायला शीक. रामनाम साधूंच्या समुदायाला सदा सुख देणारें आहे. रामनामश्रवणाबरोबर गर्व सोडून अमृतही हात जोडून पुढें उभें राहतें. रामनाम अमृताहूनही गोड आहे. रामनामामृतांत वाचा बुचकळणें हें वाचिक तप होय. चित्त चिंतनांत व वाचा नामामृतांत रंगवून ' प्रारब्धाय समर्पितं स्ववपु ' अशा निश्चयानें वागणें हें वाचिक तप होय.

२१. महाभारतांत आदिपर्वांत म्हटलें आहे:—

**अरुंतुदं परुषं तीक्ष्णवाचं वाक्कंटकैर्वितुदन्तं मनुष्यान् ।**
**विद्यादलक्ष्मीकतमं जनानां मुखे निबद्धां निऋतिं वहंतम् ॥**

**अर्थ**:—परवर्माला भेदणारी, कठोर, तिखट व वाक्कंटकांनीं दुसऱ्याच्या मर्माला बोचणारी वाचा बोलणारा जो मनुष्य तो अलक्ष्मीकतम म्हणजे लक्ष्मीच्या वडील बहिणीचा प्रियकर आहे, अर्थात् अवदशेची त्यावर पूर्ण कृपा आहे म्हणून समजावें. त्याच्या तोंडांत कायमची सैतानाची वस्ती असते.

**न हीदृशं संवननं त्रिषु लोकेषु विद्यते ।**
**दया मैत्रीच भूतेषु दानं च मधुरा च वाक् ॥**
**तस्मात्सांत्वं सदा वाचं न वाच्यं परुषं क्वचित् ।**
**पूज्यान्संपूजयेद्दद्यान्न याचेत कदाचन ॥**

**अर्थ**:— दया, सर्व भूतांविषयीं मैत्री, दान व मधुरा वाणी— ह्यासारखी संपत्ति त्रैलोक्यांत दुसरी नाहीं; मनुष्यानें नेहमीं मधुर बोलावें. कठोर बोलूं नये. कोप जिंकावा.

२२. व्यास वनपर्वांत म्हणतात:—

यस्तु क्रोधं समुत्पन्नं प्रज्ञया प्रतिबाधते ।
तेजस्विनं तं विद्वांसो मन्यंते तत्वदर्शिनः ॥ २ ॥

**अर्थः**--जो मनुष्य प्रज्ञाबळानें उत्पन्न झालेला क्रोध आवरूं शकतो, त्याला तत्वज्ञ विद्वान् तेजस्वी म्हणतात. ' तुका म्हणे थोडे आहे । आली उर्मी साहुनि राहे. ' उर्मी साहून राहणें हें शौर्याचें काम आहे. " शक्नोतीहैव यः सोढुं प्राक् शरीरविमोक्षणात् । काम क्रोधोद्भवं वेगं स युक्तः स सुखी नरः " अशी गीतावाणी प्रसिद्धच आहे. कामक्रोधाचा वेग जो आवरूं शकतो, विकारांच्या उर्मी साहून राहतो तोच सुख पावतो. खरा शूर तोच.

२३. आमच्या मुक्तेश्वरांनीं आपल्या भारतांत दोन ठिकाणीं ह्याविषयाबद्दल फारच सरस ओंव्या लिहिल्या आहेत. मनुस्मृति व महाभारत यांतून वर जीं अवतरणें दिलीं आहेत, त्या सर्वांचा निष्कर्ष त्यांनीं फार उत्कृष्ट काढला आहे. त्यांच्या प्रतिभासंपन्न वाणींतून निघालेल्या रसभरित ओंव्या आपल्या चिंतनसुखासाठीं उत्तम अक्षरांनीं लिहून भिंतीवर समोर टांगून ठेवाव्यात:--

(१) बहुकाळींचा मित्रसंबंधू । तोडी एक वोखटा शब्दू ॥
जैसा कांजीचा स्वल्पबिंदू । घटाचि नाशी दुग्धाचा ॥ ४८ ॥
नाना तपाचिया जोडी । स्वल्प कामना नासती कोडी ॥
परगृहीं षड्रसांची गोडी । दवडी एक हेळणा ॥ ४९ ॥
ज्वर, वह्नी ग्रीष्मातप । यांचा उष्मा अत्यंत स्वल्प ॥
त्याहूनि बोलाचा संताप । आगळा ऐसा मज वाटे ॥ ५० ॥
हृदयीं तप्त लोहाचें सळ । साहों येईल चिरकाळ ॥
परी दुष्ट शब्दाची जळजळ । मरणांतींही शमेना ॥ ५१ ॥
सोनें अथवा हस्तचरण । मोडिल्या सांधिती विचक्षण ।
फुटलें मोतीं तुटलें मन । सांधूं न शके विधाता ॥ ५२ ॥
—आदिपर्व अ॰ १८.

(२) कठोर वाग्बाण वर्माठायीं । मरणांत शल्य पराचे हृदयीं ।
राहे ऐसें दुरुक्तिघाई । मरण न कीजे कवणातें ॥ १६६ ॥
परवर्मभेदनीं दुरुक्ती । ते अवलक्ष्मी अकीर्ती अवगती ।

ते प्रत्यक्ष राक्षसी व्यक्ती । हिंसा करी अशस्त्रें ॥ १६७ ॥
म्हणोनि दुर्वाक्य न बोलावें । पराचें आपण साहीत जावें ॥
याहूनि श्रेष्ठ साधन बरवें । भुवनत्रयीं असेना ॥ १६८ ॥
साधु सद्भावें पूजावें । सज्जन संकटीं रक्षावें ॥
खळापवाद साहोनि जावें । तेंचि वर्तन श्रेष्ठांचें ॥ १६९ ॥
सत्य विनीत मधुरभाषी । सकळ प्राणी वश्य त्यासी ॥
कोणापासून तयासी । अपाय कांहीं असेना ॥ १७० ॥
मुखें सत्य अंगें विनीत । तेणें जिंकिले जन समस्त ॥
इहीं सद्गुणीं अलंकृत । चतुरें झालें पाहिजे ॥ १७१ ॥

—आदिपर्व अ० १९.

२४. वाङ्मय तपाचें एक प्रधान लक्षण म्हणजे सत्यता; वाणीला खोटें शिवूं नये. सत्यता हें मोठें तप आहे. ज्याच्या वाणींतून जन्मांत मिथ्या भाषण निघालें नाहीं तो अमोघवाक् होईल यांत शंका नाहीं. वाङ्मयतपाबद्दल नाथमहाराजांनीं भागवतांत(अ० ११) म्हटलें आहे:—

युक्ति वाढवून उदंड । नानामतें अकांडतांड ॥
बाह्य संचरूनि पाखांड । गर्जत तोंड महावादें ॥ २१९ ॥
साधका बाधका युक्ति-। मार्जी संचरूनि छळणोक्ती ॥
आपुली मिरवावी युक्ती । हें नाहीं चित्तीं शिष्याचे ॥ २२० ॥
बोलों नेणें छळ छद्म । स्पर्शों नेणें परवर्म ॥
बोलीं नुपजवी अधर्म । मनोधर्मक्षोभक ॥ २२४ ॥
व्यर्थ न करी आशंका । निंदेलागीं जो मुका ।
झकवूं नेणें लोकां । बाळा मूर्खा पंडिता ॥ २२५ ॥
बोलों नेणें अतिकर्कश । करूं नेणें उपहास ।
बोलामाजी न धरी आस । बोले नैराश्य वैराग्य ॥ २२६ ॥
वादविवाद अतिवाद । नावडे कोणाचा संवाद ॥
न करी बोलाचा विनोद । लौकिक शब्द न बोले ॥ २२९ ॥
पोटीं कार्य नाहीं करणें । हो हो म्हणऊनि झकविणें ॥
हेंही नाहीं तया बोलणें । सदा पठणें हरिनाम ॥ २३० ॥
न मिरवी शब्दज्ञान । न दाखवी आत्ममौन ॥
न धरी वचनाभिमान । सदा स्मरण गुरूचें ॥ २३२ ॥
सत्य आणि अति मधुर । आइकतां आल्हादकर ।
सर्वांसी हितत्वें साचार । बोले सनागर हरिकथा ॥ २३१ ॥

# २४ अश्वत्थ उर्फ संसारवृक्ष.



उपनिषदें व भगवद्गीता यांत संसाराला वृक्षाची उपमा दिलेली आहे. अश्वत्थ हा बोधिवृक्ष असें बौद्धांनीं मानलेलें आहे; हाच ख्रिस्ती लोकांचा ज्ञानवृक्ष होय. यालाच कोणी जीववृक्ष म्हणतात. आदम व ईव्ह यांनीं ज्या वृक्षाचीं परिपक्व फळें चाखलीं तो हाच बोधिवृक्ष होय. गौतमबुद्धाला याच बोधिवृक्षाखालीं ज्ञान उत्पन्न झालें. यालाच कित्येक पाश्चात्य ग्रंथकार Tree of Life असें म्हणतात. यालाच संसारवृक्ष म्हणतात. स्वतः हा वृक्ष विषाचा बनला आहे; तथापि यास दोन फळें मात्र मोठीं गोड येतात. एका मार्मिक कवीनें म्हटलें आहे कीं:—

> संसारविषवृक्षस्य द्वे फले अमृतोपमे ।
> काव्यामृतरसास्वादः सज्जनैः सह संगतिः

काव्यामृतांतील रसाचा स्वाद घेतां येणें हें एक फळ, व सज्जनांची संगति होऊन मोक्षाची वाट सांपडणें हें दुसरें फळ. याच वृक्षाखालीं अगर याच्याच आश्रयानें सर्व जीव तरून गेले. गौतमबुद्ध होवो, जीजस होवो, अगर आदम होवो—कोणालाही या वृक्षाच्या आश्रयाशिवाय गति नाहीं; पण या वृक्षाचें जें शेवटचें फळ ज्ञान तें चाखल्यानंतर जीवाच्या संसाराच्या दृष्टीनें त्याची अवनतीच होत असून परमार्थाच्या दृष्टीनें तो निवृत्त होऊन उच्चतर भूमिकेवर जातो. या संसाराला उपनिषदें व भगवद्गीता यांनीं अश्वत्थाची उपमा दिलेली आहे. अश्वत्थ याचा मूळ अर्थ ' न श्वःतिष्ठति इति अश्वत्थः ' उद्यांला जो टिकत नाहीं तो. अश्वत्थवृक्ष अतिशय चंचळ असतो. त्याचीं पानें थोड्या वातानेंही सळसळूं लागतात. इतका चंचळ वृक्ष दुसरा कोणताही नसेल. म्हणून संसाराला अश्वत्थवृक्षाची उपमा दिलेली आहे. वृक्षाला जशीं मुळें व शाखा असतात, तशींच संसारालाही असतात. यास्तव त्यास वृक्ष म्हटलेलें आहे. संसाराला वृक्षाचें रूपक मोठें उत्तम

श्रोमतें. गीतेच्या पंधराव्या अध्यायांत संपूर्णपणें याच अश्वत्थ उर्फ संसारवृक्षाचें वर्णन आहे. याला मार्कंडेयपुराणांत श्रीदत्तात्रेयानें अलर्कराजास उपदेश करितेवेळीं 'ममतातरु' असें म्हटलेलें आहे. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीं या वृक्षाचें जें वर्णन केलेलें आहे तें पाहूं:—

वर मुळें शेंडा खालीं दिसे बानो । प्रपंचीं रानोरान वृक्ष बारे ॥ १ ॥
त्रिगुणाच्या शाखा उपशाखा बहुत । नानायाति येत पत्रें ज्यास ॥ २ ॥
पक्व फळ अहं सोहं गोडी त्याची । सेवितां जीवाची आस पुरे ॥ ३ ॥
ज्ञानदेव म्हणे वृक्ष परिपूर्ण झाला । बीज रूढला जाणिवेचा ॥ ४ ॥

संसार उर्फ प्रपंच हा एक क्षणभंगुर पण अव्यय असा वृक्ष आहे, ही कल्पना पक्त पौर्वात्यांचीच आहे असें नव्हे, तर पाश्चात्यांनीं देखील याचें मोठें मनोरम वर्णन केलेलें आहे. कार्लाइल या वृक्षाविषयीं लिहितो कीं:—

" All Life is figured by them as a Tree. Igdrasil, the Ash-tree of Existence, has its roots deep-down in the kingdom of Hela or Death; its trunk reaches up heaven-high, spreads its boughs over the whole Universe; it is a tree of Existence. At the foot of it, in the Death-kingdom, sit three fates the Past, the Present and the Future watering its roots from the Sacred Well. Its 'boughs' with their buddings and disleafings-events, things suffered, things done, catastrophes—stretch through all lands and times. Is not every leaf of it a biography ? Every fibre there act or word ? Its boughs are Histories of Nations. The rustle of it is the noise of the Human Passion rustling through it; or storm tost, the storm-wind howling through it like the voice of all the Gods. It is Igdrasil, the Tree of Existence. "

*Hero- Worship*, p. 19.

या वर्णनांत या संसारवृक्षाचें अधिक उदात्त व व्यापक स्वरूप वर्णिलेलें आहे.

याच संसारवृक्षाचें सामुद्रिकशास्त्रांत मोठें चमत्कारिक वर्णन आहे. तेंही पाहून मनन करण्यासारखें आहे. तेथें या वृक्षास नरकल्पतरु म्हटलेलें आहे.

ऊर्ध्वमूलो ह्यधःशाखो नरकल्पतरुर्भवेत् ।
वक्ष्ये पादतलादद्य शारीरं लक्षणं ततः ॥ ५ ॥

—बृहत्सामुद्रिकशास्त्र.

तसेंच, वाग्भटानेंही उत्तरस्थानांत शिरोरोगांच्या प्रारंभीं म्हटलेलें आहे कीं,

ऊर्ध्वमुलमधःशाखं ऋषयः पुरुषं विदु । ( २४-५८ ).

नर हाच एक यांतील कल्पतरु होय. मग हा ऊर्ध्वमूल कसा ? व अधःशाख कसा ?

पूर्वज–हें त्याचें ऊर्ध्वमूळ.
संतति–ह्या त्याच्या अधःशाखा.
पुरुष—हा कल्पतरु.
अश्वत्थ--हें त्याचें स्वरूप.
संसार--हा त्या वृक्षाचा पसारा.

असा असून हा अव्यय आहे. ‘ अधश्चोर्ध्वं प्रसृतास्तस्य शाखाः । गुणप्रवृद्धा विषयप्रवालाः ’ याच्या शाखा गुणांनीं वाढतात; विषयरूप अंकुर त्यांस येतात. हा ‘ अश्वत्थवृक्ष ’ ‘ सुविरूढमूल ’ आहे. म्हणजे संसारवृक्षाचें मूळ माणसाच्या अंतःकरणांत पूर्णपणें खिळून गेलेलें आहे; मग या संसारवृक्षापासून सुटावयाचें कसें ? ‘असंगशस्त्रेण दृढेन छित्वा.’ असंगशस्त्रानें त्यास छाटून टाकिलें पाहिजे; म्हणजे पुनर्जन्म जेथें नाहीं तें अढळपद मिळतें. निर्मानमोहाः’ इ० लक्षणलक्षित पुरुषांनाच तें पद मिळतें, व तेच ‘ममतातरूचा छेद करूं शकतात.

---

# २५ संतमहात्मे.



१. आपल्या ह्या आर्यराष्ट्राच्या हितोदयाची चिंता वहाणाऱ्या महात्म्यांना वंदन असो. ते महात्मे हिमालयविंध्यसह्याद्रि पर्वतांच्या गव्हरांत परमात्मस्वरूपचिंतनांत रंगून गेलेले असले तरी आपल्या कृपापांगानें भरतभूमीस सनाथ करण्यास समर्थ आहेत.

२. संतमहात्म्यांच्या कृपेची राष्ट्राला भूक लागेल, लोक त्यांची अत्युत्कटतेनें वाट पहातील, त्यांचें स्मरण करतील, त्यांच्या चरित्रांचें अवलोकन व मनन करितील, त्यांनीं घालून दिलेल्या मार्गानें जाण्याची मनःपूर्वक धडपड करितील तर आपला उद्धार होण्यास फार विलंब लागणार नाहीं.

३. संतांना आम्ही विसरतों तेव्हां अवनतीचें दुःख भोगतों व संतांना स्मरतों तेव्हां उन्नतिपदावर आरूढ होतों. संतांचें स्मरण सत्यदारूढ करणारें आहे.

४. आम्हीं त्यांना सर्वथैव विसरलों काय ? असें आमच्यानें ह्मणवत नाहीं. रामायण, महाभारत व त्यांतील महात्मे आमच्या स्मरणांतून पार गेले आहेत काय ? नाहीं. कारण तसें असतें तर आम्हीं हिंदुत्वानें जिवंत राहिलों नसतों. तो द्वारकेचा राणा, ते पांडव, ते द्रोण, ते भीष्माचार्य, ते विदुर, ते व्यास आमच्या समाजाच्या प्रेमादरांतून व स्मरणांतून गेले नाहींत. रामसीताभरतलक्ष्मणांला आर्यराष्ट्र विसरलें नाहीं. ज्ञानेश्वरमाउली–तुकोबांच्या नांवाचा घोष अजून महाराष्ट्रांत होत आहे. समर्थशिवाजींचें आह्मांला स्मरण आहे. इहपरगतिदायक संतमहात्म्यांना आम्हीं विसरलों नाहीं, पण त्यांचें पूर्ण स्मरण आम्हीं केलें तर ते आमच्या अंतरांत घुसून आम्हांला जिवंतपणा आणतील. त्यांनीं उपदेशिलेला मार्ग सर्व जगाच्या उद्धाराचा आहे. त्यांची वाणी अमोघ आहे. त्यांचीं चरित्रें अमर आहेत. त्यांना आपण शरण जाऊं या.

५. त्यांनीं धर्मरहस्य आह्मांला दिलें. कृतज्ञतेच्या प्रेमानें आपण त्यांना न्हाणूं या. त्यांनीं जगाला सत्यधर्म दिला व भरतखंडाला चैतन्य आणिलें. राजापासून रंकापर्यंत व ब्राह्मणापासून चांडालापर्यंत सर्वांना त्यांनीं जवळ केले, सर्वांना उद्धरिलें, सर्वांत ऐक्यभाव वाढविला.

६. थोर थोर ऋषि, मुनि, द्रष्टे, शास्त्रकार, संत व विभूति भरतखंडांत उत्पन्न झाल्या याबद्दल आपणांला सात्विक अभिमान वाटत असतो तोही यथार्थ आहे. सर्व जगाला भरतखंडानें धर्मज्ञान दिलें व अनंत कालपर्यंत जगाचें धर्मगुरुत्व भरतखंडाकडेच राहील. वनांत व गिरिगव्हरांत वसति, गंगाजललवकणपान हेंच ज्यांचें लौकिकचरित्र त्यांच्या मुखांतून वेदोपनिषदें, शास्त्रें, पुराणें, दोहरे, ओंव्या व अभंग निघालें व जगाला धर्मज्ञान मिळालें. ह्या भूलोकावरील हे देवच होत.

७. लढाया, तह, तोफा, बंदुका, आगगाड्या व तारायंत्रें इत्यादिकांच्या साह्यानें जो विषयी जीव पोसला जातो—व ज्याला अज्ञजगांत भाग्यवंत म्हणतात—त्या जीवाची परब्रह्ममूर्ति घडविणारे संत लोकोत्तर कारागीर आहेत असें कां म्हणूं नये ? संतांचें सामर्थ्य लोकोत्तर आहे. जीवाचें ब्रह्म करणें ही अद्भुत शक्ति अंगीं सहज वाहणारे संत हे परिस आहेत. ज्या मृत्यूला—कळिकाळाला—सुधारलेले लोकही भितात त्याला आपल्या पायाशीं खेळविणारे संत हेच खरोखरीनें वीर ह्या पदवीस योग्य आहेत.

८. प्राचीन ऋषींना हिताची निरपेक्ष कळकळ, मनुष्यस्वभावाचें पूर्ण ज्ञान व दूरदर्शित्व असल्यामुळें त्यांनीं शास्त्रें निर्माण करून समाजाची व्यवस्थित घटना केली व सर्व समाजसंस्था धर्माच्या दोरींत ओंवून आमचें जीवित धर्ममूल केलें. त्यांचे उपकार काय मानावे ? ते समाजाग्रणी खरे होत.

९. धर्मरक्षणासाठीं संतांनीं आपल्या शरीराचीं लांकडें केलीं, इहलोकच्या सुखसाधनांचा त्यांनीं धर्मदेवतेपुढें धूप जाळला. " धर्माचें रक्षण । करणें पांखांडखंडण ॥ १ ॥ हेंचि आह्मां करणें काम । बीज

वाढवावें नाम ॥ २ ॥ " ह्याप्रमाणें हरिनामाचा त्यांनीं झेंडा फिर-विला. आपण त्या धर्मरहस्यलाभासाठीं दिवसांतून तास अर्धातास सुद्धां खर्चण्यास तयार नसावें काय ? का प्रपंचाला द्यायला आपल्या-जवळ २४ तास आहेत व धर्मसाधनाला द्यायला अर्धा तास सुद्धां नाहीं ? ' No time ' हें जेव्हांतेव्हां धर्मसाधनाकडे लावायचें वेडेपण आह्मी केव्हां सोडणार ?

१०. स्नानसंध्याजपतपादि साधनें ही बाहेरची कवाईत म्हणून नको, ज्ञानविचार करायला बुद्धिबळ नाहीं, भक्तिप्रेमाचें सुख भोगा-यला सत्सहवासाची जोड नाहीं, अशी बहुतेकांची स्थिति ! ज्या महा-त्म्यांचे वर गोडवे गाइले त्यांच्याच वंशजांची ही स्थिति ! ही परि-स्थिति आपण सुधारली नाहीं तर बाहेरचे कोण येऊन सुधारणार ? उपनिषदें, गीता, भागवत, योगवासिष्ठ, ज्ञानेश्वरी, दासबोध, नाथ-भागवत, रामयण व भारत आणि तुकोबांचे अभंग—ह्यांपैकीं कोणत्याही ग्रंथांतून नित्यनेमाच्या अभ्यासानें धर्मरहस्य .जाणून घ्यावें, त्याचें मनन करावें व आचरणांत आणावें हें आपलें मानव ह्मणून मुख्य कर्तव्य नाहीं काय ? ' जो अन्न देतो उदरासी । शरीर विकावें लागे त्यासी । जेणें घातलें जन्मासी । त्यासी कैसें विसरावें ? ' असें समर्थ आपणास विचारतात. तेच उपाय सांगतातः ' आयुष्य हेंचि रत्न-पेटी । माजी भजनरत्नें गोमटीं । ईश्वरीं अर्पूनियां लुटी । आंनदाची करावी ॥ '

११. राष्ट्रोद्धाराच्या अनेक चळवळी निघाल्या आहेत. त्यांत पाश्चात्यांच्या सहवासानें आह्मी बाहेर पाहत आहोंत, आंत मुरडून पाहत नाहीं. ' डिप्रेस्ड मिशन ' च घ्या. माहारमांगादि जातीच तेवढ्या डिप्रेस्ड आहेत, तेवढ्याच हीनावस्थेस पोंचल्या आहेत व बाकीच्या जातींचा उद्धार झाला आहे काय ? सर्वच हिंद-वासी ' डिप्रेस्ड ' नाहींत का ? पोटापाण्याच्या विवंचनेनें सर्वच त्रस्त नाहीं का झाले ? प्रपंचाच्या लाथा सर्वांनाच नाहीं का बसत ? भक्ति-ज्ञानवैराग्याला सर्वच जाती पारख्या झाल्या असून मायेच्या तडा-

ल्यांत सर्वच नाहीं का सांपडले ? महारमांगच तेवढे ‘ डिप्रेस्ड ’ कां ? सर्वच वर्ण व जाती ‘ डिप्रेस्ड ’ कां नाहींत ? आमच्या संतांचें ‘ डिप्रेस्ड क्लासेस मिशन ’ ह्याहून फार वरच्या ध्येयाचें आहे. हरीला पराङ्मुख झालेले, केवळ विषयी बनलेले, प्रपंचाच्या लाथा खाऊन कोडगे बनलेले, धर्मज्ञानविहीन जे लोक ते सर्व—मग ते कोणत्याही वर्णाचे व जातीचे असोत—ते सर्व ‘ डिप्रेस्ड ’ आहेत व त्या सर्वांचा सरसकट उद्धार करणें हें संतांच्या अवतारांचें मुख्य कार्य आहे. “ धर्म रक्षावयासाठीं । करणें आटी आह्मांसी ॥ १ ॥ वाचा बोलूं वेदनीति । करूं संतीं केलें तें ॥ २ ॥ ” ह्या तुकोबारायांच्या वचनाप्रमाणें धर्म रक्षावयासाठीं ह० वेदनीति आचरून शिकवण्यासाठीं सर्व भागवतांचे अवतार होत असतात.

---

३५

विड्या ओढणाराची तलफ धूर पाहूनहि भागते. मात्र तो धूर त्याच्या विडींतून बाहेर पडला पाहिजे ! ममत्व ह्मणजेच माया. अर्थात् विडीच्या अध्यक्षतेखालीं हा महत्वाचे झुरके ओढतो. भोगासाठीं त्याग कसा होतो हें पाहणें मौजेचें आहे कीं नाहीं ?

३६

अर्धातास दाखविण्यासाठीं ठोका एक पडतो. याच प्रमाणें अर्धवट काम करण्याठीं जीवाला एक सबंध जन्म खर्चीं टाकावा लागतो. एकत्वाची मर्यादा अनुल्लंघनीय आहे. याला कालाचाही उपाय नाहीं.

३७

खडूची कांडी सरळ असली तरी तिच्या करवीं हवी तशी वक्र रेषा काढितां येते. साधनांत सारल्य नाहीं, तें उपयोजकांत आहे.

# २६ सत्संग आणि व्यवहार.



( एका गुजराथी ग्रंथावरून )

उद्धरेदात्मनात्मानं मग्नं संसारवारिधौ ।
योगारूढत्वमासाद्य सम्यक्-दर्शननिष्ठया ॥

**अर्थः**—संसारसागरांत मग्न म्हणजे बुडून गेलेला जो आत्मा त्यास यथार्थ ज्ञाननिष्ठेनें योगारूढ करून त्याचा उद्धार करावा.

एक दिवस सद्गुरु प्रसन्नमुख आहेत असें पाहून शिष्यानें त्यांस विनंति केली कीं, ' महाराज, या संसारांत सत्संग व आत्मसुख या दोहोंविषयीं मनांत विशेष आवड असूनही, कांहीं लोकांची चित्तवृत्ती व्यवहारांतच गढून गेलेली असते, अर्थात् सत्संग व आत्मानुभव यांपासून सुख मिळण्याविषयीं उत्कंठित असूनही त्यांची ओढ संसाराकडे असते, याचें कारण काय तें कृपा करून सांगा.

गुरु०—अरे, प्रश्न विचारण्यास मुळींच लाजूं नये. श्रद्धावंतानें आस्तिक बुद्धीनें वाटेल तितका वेडगळ व सोपा प्रश्न विचारिला तरी तो ज्ञात्या पुरुषानें ऐकलाच पाहिजे. तुझा प्रस्तुतचा प्रश्न तर सूक्ष्म व विचाराचा आहे. या प्रसंगीं मी एका माशीचा दृष्टांत घेतों.

अहर्निश मलमूत्राचा रसास्वाद घेणारी एक माशी सहज फिरतां फिरतां मधानें परिपूर्ण भरलेल्या एका घटाजवळ येऊन पोंचली. फार स्वादिष्ट व दुर्लभ वस्तु आपणास प्राप्त झाली आहे असें पाहून आनंदानें तिनें आपणास धन्य मानिलें व ती हळूच घटावर बसली. नंतर हळूहळू तिनें आपला एक पाय मधावर ठेविला. मध चाखून पाहतां त्याची तिला उत्तरोत्तर अधिक गोडी लागली. म्हणून पुढें सरकून काळजीपूर्वक दुसरा पायही पहिल्याप्रमाणेंच तिनें मधावर ठेविला. याप्रमाणें कांहीं कालपर्यंत निश्चिंतपणें तृप्ती होईपर्यंत मधाचा स्वाद घेतल्यानंतर संतुष्ट होऊन तेथून उडून ती पूर्ववत् संचार करूं लागली.

इतक्यांत विष्टापूर्ण अशा पूर्वपरिचित स्थानावर तिची दृष्टी गेली. मग काय विचारावयाचें आहे ? पूर्व अभ्यास व आसक्ती असल्यामुळें तो दुर्गंधरस घेण्यासाठीं त्या विष्टेवरहि ती जाऊन बसली !! याप्रमाणें वारंवार त्या मधाचा उत्तम स्वाद घेतल्यानंतरही ती माशी परावृत झाली नाहीं व विष्टेवर गेल्याशिवाय तिच्यानें राहवलें नाहीं. परंतु ज्या समयीं ती माशी मधावर बसली त्या वेळींच जर एकदम वाऱ्याच्या जोरानें तिचे दोन्ही पाय मधांत रुतले असते व पंख चिकटले असते, तर तिच्या मनांतून विष्टेविषयीं आसक्ति समूळ नाहींशी झाली असती, व मधाचा मधुर स्वाद घेण्यांतच ती गुंग होऊन गेली असती. याचप्रमाणें विषयादिक विष्टेचा स्वाद घेण्यास संवकलेली मनोवृत्ति आत्मसुखरूपी मध चाखण्यासाठीं आत्मसुखरूपी मधानें भरलेल्या सत्सगंरूप घटाच्या कांठावर जाऊन बसते; परंतु पूर्वाभ्यासानें पुनः वृत्ति विषयांकडे धांव घेते. मधाची रुची आठवतांच मनोवृत्ति मधाकडे जाते व पुनः पूर्वासक्तीमुळें विषयांकडे जाते. याप्रमाणें मधावरून विषयांवर व विषयांवरून मधावर मनोवृत्तीची येरझार चाललेली असते. पण या येरझारीच्या अवकाशांत जर कां वाऱ्याचा सपाटा लागून पंख मधावर चिकटले, अर्थात् ईश्वरानुग्रह, सद्गुरुकृपा अथवा आपल्या शुभकर्माचें फळ या तिहींपैकीं कोणत्याही एका वस्तुरूप वाऱ्याचा झपाट्यानें विषयरूप विष्टेविषयीं दृढ वैराग्य बाणलें व मनोवृत्ति ब्रह्मानंदरूप मधांत मग्न झाल्या कीं, व्यवहाराकडे ओढ घेणाऱ्या वृत्ति आपोआप लटक्या पडतात, व जलांत बुडविलेल्या मिठाच्या बाहुलीप्रमाणें विरघळून ब्रह्मरूप होतात. परंतु उलटपक्षी विपरीत साधनानें त्या बिघडतात. यासही एक उदाहरण सांगतों, तें श्रवण कर:—

एका गांवांत एक पाटील राहत असे. त्याची तेथील श्रीमंतांत गणना होत असे. एकदां गांवच्या राजाकडून त्यास भेटीसाठीं बोलावणें आले. सन्मानपूर्वक बोलावणें आणि तें राजाकडून म्हणून त्यानें विशेष काळजीपूर्वक उच्च वस्त्रें परिधान केलीं. वस्त्रें मळूं नयेत म्हणून खबरदारी घेतली असतांही रस्त्यानें जातांना त्याच्या उपरण्यास कोठें कोळशाचा डाग लागला. दरबारांतून स्वारी काम फत्ते करून परत आली, पण

कोळशाचा सूड उगविण्याचा त्यानें मनांत पक्का निश्चय केला होता ! गांवांतील सर्व कोळसे मजुरांकरवीं जमा करून त्यानें तळयावर स्वच्छ करण्यासाठीं त्यांची रास केली, व खंडोगणती साबू पाठवून कोळसे धुण्यास आरंभ करविला. त्याच गांवच्या दुसऱ्या एका समंजस पाटलास हें पाहून फार आश्चर्य वाटलें, व त्याची कींवही आली. त्यानें विचार केला कीं, "पाटीलबुवा तर अकलेचे कंद आहेत. कोळसे धुण्यांत एक तप जरी घालविलें तरी कोळशाचा रंग पांढरा कसा होईल ? तर आपण ह्याचे हे मिथ्या श्रम वांचवावेत हें बरें." असा विचार करून तो त्या पहिल्या पाटिलदादाजवळ जाऊन म्हणाला, "दादा, अशा रीतीनें हे कोळसे शुभ्र कसे बरें होतील ? मला आज्ञा द्याल तर अगदीं थोड्या खर्चांत व थोड्या वेळांत ह्यांस उजळ करून मी कापसापेक्षांही पांढरे करून देईन." पाटिलबुवांनीं विचार केला कीं इतक्या मेहनतीनें व इतक्या साबणानें जर हे कोळसे अजूनही स्वच्छ होत नाहींत, तर पाहावी याची काय करामत आहे ती, असें म्हणून ते सर्व कोळसे त्याच्या हवालीं केले व आपण निघून गेले. त्या शहाण्या पाटलानें ते सर्व कोळसे चांगले पसरून सुकविले व ते अगदीं साफ कोरडे झाले असें पाहून रात्र होतांच त्यांस अग्नि लाविला. उजाडतें आहे इतक्यांत त्यांची स्फटिकासारखी शुभ्र राख झाली ! तें पाहून त्या मिथ्याश्रम करणाऱ्या पाटलास फार संतोष वाटला व मनोवृत्तींचा सदुपयोग करणाऱ्या त्या शहाण्या पाटलापुढें त्यानें लोटांगण घातलें. म्हणून हे शिष्या, सत्पुरुषांच्या समागमानें आपल्या मनोवृत्तींस सुसंस्कृत करून त्या शहाण्या पाटलाप्रमाणें साधकानें उत्तम साधनांचा उपयोग करावा. कृष्णवर्णाचे तेच कोळसे अग्नीच्या संस्कारानें शुभ्र स्फटिकासारखे झाले, त्याचप्रमाणें मनुष्यानें जर ज्ञानाचा उपयोग करून घेतला तर त्याच्या मनोवृत्तीही कामक्रोधादिक कृष्णवर्ण टाकून शुद्ध झाल्यानें परब्रह्मरूप होतील यांत तिळमात्र संशय नाहीं. ज्ञानाग्नि केवळ कामादिक मळ जाळून टाकतो एवढेंच नव्हे तर त्याच्या योगानें कर्माचाही समूळ नाश होतो, व स्वानुभवी तत्वदर्शी असे जे महात्मे लोक आहेत त्यांचा आश्रय केल्यानें हें आत्मज्ञान प्राप्त होतें.

## २७ निंदकांचे उपकार.



१ श्री एकनाथ महाराजांनीं निंदकांना काशी, गंगा, सखा व गुरु इतकीं विशेषणें देऊन त्यांचें गौरव केलें आहे. काशी व गंगा हीं पापनाशक तीर्थें आहेत. काशीवास व गंगास्नान हीं पापहारक आहेत. त्याप्रमाणें निंदकांचा सहवास व निंदकांची वाणी हींही पापहारक व दुरितनिवारक आहेत. आपल्या चित्तावरचे अहंभावादि विकार धुवून टाकण्याचें पुण्यकर्म निंदक फुकट करीत असतात. आपण ज्यांना मित्र समजतों ते आपले परमार्थदृष्ट्या वैरी आहेत, व ज्यांना शत्रु समजतों ते आपले खरे हितकर्ते आहेत, ही 'नाथांच्या घरची उलटी खूण' समजून घेतली पाहिजे. मित्र ते शत्रु व शत्रु ते मित्र ! याचा खरा अर्थ एवढाच आहे कीं, मित्र प्रेमांध होऊन आपल्या गुणांची अवास्तव स्तुति करून अजाणत आपला अहंभाव पोशीत असतात व शत्रु गुणांचा लोप करून व दोषांचेंच जास्त ठळक रीतानें आविष्करण करून आपल्या अहंभावाचा उच्छेद करीत असतात ! मित्रांची दृष्टि गुण पहाणारी व शत्रूंची दृष्टि दोष पहाणारी. ज्याला परमार्थमार्गाचें आक्रमण करायचें आहे त्याला आपल्या गुणांपेक्षां दोषांचें दर्शन अधिक फायद्याचें आहे. मित्र हे अंधळ्या प्रेमामुळें प्रियच वाटायचें, पण शत्रूही दोषदर्शनद्वारां आपल्या सुधारणुकीचे आधार म्हणून प्रिय वाटले पाहिजेत. हें काम सोपें नाहीं, कठिण आहे. आपले दोषद्रष्टे आपले मित्र व हितकर्ते आहेत, अशा निर्मळ भावनेनें त्यांना आवडून घेण्याला प्रथम बरेंच आत्मसंयमन करावें लागेल, पण शत्रुमित्र समान लेखण्याइतकी दृष्टि निवळली व शत्रुमित्र प्रेमानें, खऱ्या अंतर्यामीच्या निष्कपट प्रेमानें, सारखे लेखण्याइतकी दृष्टि चोखळली व तसें वागण्याची हातोटी साधली कीं, हा संसार सुखमय होऊन जाईल !

२ स्तुतिनिंदा व्यवहारांत रोज चालल्याच आहेत. गुणदोषदर्शना-

मुळेंच व्यवहार इतका विचित्र व दुःखरूप झाला आहे. श्रीमद्भागवतांत सांगितल्याप्रमाणें '**गुणदोषदर्शिर्दोषो गुणस्तूभयवर्जितः**' म्ह० गुणदोषदर्शन हा दोष व गुणदोषदर्शनराहित्य, हा गुण ही अवस्था ज्यांच्या अंगीं बाणली आहे त्या महात्म्यांचा आनंद अखंड व पूर्ण असतो. त्यांची गोष्ट जरा दूर ठेवली कीं, अज्ञांपासून सुज्ञांपर्यंत म्हणजे खेडवळांपासून तों सुशिक्षित व सुसंस्कृत विद्वानांपर्यंत सर्वांनाच गुणदोषदर्शन अर्थात् शत्रुमित्रभाव यांची बाधा सारखीच होत असते. उलट असें दिसतें कीं, अहंभाव, शत्रुमित्रभाव, कामक्रोधादि विकार यांचा पगडा अज्ञांपेक्षां सुज्ञांवर म्ह० अड्याण्यांपेक्षां विद्वानांवर ज्यास्त बसलेला आढळून येतो. ज्ञानेश्वरमहाराजांचीः—

**नवल अहंकाराची गोठी। विशेषें नलगे अज्ञानापाठीं।**
**सज्ञानाचे झोंबे कंठीं। नानासंकटीं नाचवी! ॥ १ ॥**

ही उक्ति अगदीं यथार्थ आहे असें प्रपंचांत नित्य आढळून येतें. विद्वान् माणसांत मतभेद, भांडणें, द्वेष, मत्सर, इत्यादि विकार ज्या प्रमाणांत सांपडतात त्यापेक्षां अडाणी माणसांत फारच कमी प्रमाणांत ते आढळतात. खेडवळ लोक गांवकीचीं कामें जितक्या एकोप्यानें करितात तितक्या एकोप्यानें विद्वानांना आपल्या सभा कांहीं आवरतां येत नाहींत! दुर्विकारांना वावरायला विद्वानांचें हृदय जितकें आवडतें तितकें अज्ञ जनांचें हृदय आवडत नाहींसें दिसतें! अज्ञ माणसें पंढरिनाथाला कायमचा अध्यक्ष नेमून आपलें कथाकीर्तनांचें मुख्य कर्म सातशें वर्षें बिनबोभाट पार पाडीत आलीं आहेत; व कांग्रेसच्या बैठकींत अध्यक्षाच्या निवडणूकीपासून सबजेक्ट कमीटींतल्या विषयांपर्यंत सर्वत्र मतभेद, तंटेबखेडे, दुःशब्दांचीं उत्तरें-प्रत्युत्तरें इत्यादिकांची गर्दी उसळलेली दिसते! 'बरा कुणबी झालों, नाहीं तरी दंभेंचि असतों मेलों' हा तुकोबांचा उद्गार जातिविषयक घ्यावयाचा नसून विद्वत्तेसंबंधानें घ्यावयाचा आहे. विद्वत्तेची किंवा विद्येची ही हेटाळणी नव्हे, तर भगवद्भावविरहित विद्या कशी अनिष्टकार्योत्पादक आहे हेंच प्रतिपादन कर-

ण्याचा येथें मुख्य हेतु आहे. इंग्रजीमध्यें पोपकवीचें ' डन्सीड ' म्हणून एक काव्य आहे तें पाहिलें म्हणजे विद्वानांची निंदाप्रीति कशी असते तें समजून येतें !

३ भगवद्भक्तीनें मनुष्याच्या ठिकाणीं जें समदर्शन, जी सहिष्णुता, जें प्रेम, जी करुणा व जी परगुणगौरवाची आवड उत्पन्न होते ती नुसत्या विद्वानांच्या कठोर टीकेहून किती तरी चित्तोन्नतिकारक व विश्वात्मकपणाची असते ! विद्वान्, चिकित्सक, व्युत्पन्न, पंडित, बोलके, लेखक अशा मनुष्यांपेक्षां सर्वांभूतीं भगवद्भाव पाहणाऱ्या भक्तांचें गौरव समाजांत जें ज्यास्त होतें तें अगदीं यथार्थ आहे. संत व भक्त भूतमात्रीं हरि पाहतात व हरीला पाहायला प्राण्यांला शिकवितात, व यामुळें चोहोंकडे प्रेमामृताची वृष्टि करितात. विश्वांत ज्ञान, सुख, आनंद यांची वृष्टि करणारे कोणी असतील तर ते सर्व भेदभावांच्या पलीकडे एकपणाच्या दृष्टीनें सर्वांच्या सर्व कृत्यांकडे नित्य पहाणारे समदृष्टि संतच होत. संत स्तुति व निंदा दोन्ही गिळून बसतात एवढेंच नव्हे तर आपल्या स्तुतिकर्त्यांना व निंदकांना हरिरूपानें पाहून त्यांना हरीचेच गुण गाण्यास लावतात ! खरोखरच विश्व एकात्मक पहाण्याचा ज्या दृष्टीला अभ्यास झाला तिच्यापुढें गुणदोषदर्शनाचें सोंग उभें राहतें तरी कशाला ?

४ श्रीएकनाथमहाराजांनीं भावार्थरामायणांत म्हटलें आहे:—

ग्रंथ निंदिती अथवा वंदिती । ते दोघे आम्हां ब्रह्ममूर्ती ।
हे श्रीजनार्दनाची युक्ति । उपदेश एकांतीं निजगुह्यार्थ ॥ १ ॥
असो अबद्ध रामकथा । पवित्र करी गातां ऐकतां ।
हें न मानी ज्यासी विकल्पता । त्यासी तत्वता लोटांगण ! ॥ २ ॥
कथा निंदिती वंदिती जनीं । ते माउली माझे दोन्ही ।
तो निंदक सखा जननी । मज लागूनी कृपाळू ॥ ३ ॥
या लागीं निंदकचि तत्वता । साह्य सखा परमार्था ।
त्या निंदकातें निंदितां । दोषी सर्वथा स्वयें होय ! ॥ ४ ॥
निंदा म्हणजे परमामृत । निंदा निर्द्वंद्व सुखस्वार्थ ।
निंदक न पाहे निजस्वार्थ । अतिसमर्थ परोपकारी ॥ ५ ॥

**जेथें निंदा सुखरूप समाये । त्याचे मस्तकीं वंदूं पाये ।**
**धन्य धन्य त्याची माये । जो निंदा साहे निर्द्वंद्व ॥ ६ ॥**

ह्या सहा ओंव्या म्हणजे अमृताचे सहा सागर आहेत ! निंदकांचें असें गोडवाणीनें यथार्थपणें गौरव केलेलें अन्यत्र कोठेंही पहाण्यांत येणार नाहीं ! ‘ निंदा म्हणजे परमामृत ’ ही भावना केवढी उदात्त आहे ! शंभर वेळां अंगावर थुंकणाऱ्या यवनाला आपल्या अनुपम शांतीनें अखेरीस पायावर गडबडां लोळायला लावणाऱ्या नाथमहर्षींच्याच मुखांतून अशी दिव्य वाणी निघत असते ! कोणाचीही निंदा करायची बुद्धि मला देऊं नकोस, दुसऱ्यानें केलेली निंदा शांतपणानें सोसण्याचें धैर्य दे, स्तावक व निंदक यांजकडे किंबहुना सर्व विश्वाकडे समदृष्टीनें पाहण्याची व सर्वांना प्रेमानें आळवण्याची शक्ति दे व तुझ्या सच्चिदानंदघन शुद्धस्वरूपांत चित्ताचा लय होऊं दे अशी श्रीरामचरणारविंदीं ‘ मुमुक्षू ’ ची नित्य प्रार्थना आहे.



३८

उंटाची मान वांकडी तर डुकराची मान सरळ. परंतु सरळमान्याला वांकड्या शत्रूशीं झुंज करतां न आल्यामुळें पुष्कळदां प्राणास मुकावें लागतें. व्यावहारिक आर्जव देखील दुःखदायकच असतें.

३९

कातरीच्या दोन पात्यांमिळून कापण्याचें काम होतें. तेंच काम एकपाती चाकू करूं शकतो. मात्र कापणारा अधिक कुशल लागतो. द्वैतानें मायेचे तुकडे करतां येतात. अद्वैतानेंही तेंच कार्य साधतें. अद्वैतपराला कौशल थोडें अधिक लागतें एवढेंच.

## २८ ईशप्रार्थनेची सिद्धता.

—:०:—

१. सर्व धर्मांत स्तोत्रांची महती गायिली आहे, व सर्व. धर्मांत ईश्वराचीं स्तोत्रें आहेत. सर्व काळीं, सर्व स्थळीं ईश्वरस्तुतीची जीवाला आवश्यकता भासली आहे, किंबहुना जीवानें अनिवार व सहज प्रेमानें जगन्नियंत्याला परोपरीनें आळविलें आहे. वेदांतील ऋचा, इंद्र, वरुण, अश्विनीकुमार इत्यादि देवतांच्या स्तुतिपर असून त्यांतून "आम्हांला विपुल धन द्या, शत्रूंपासून आमचें सरक्षण करा, आम्हांला वीर्यवंत पुत्र द्या, गुरेंढोरें द्या, आमच्या शरिराचें व कुटुंबाचें रक्षण व वृद्धि करा," अशा प्रकारच्या प्रार्थना केल्या आहेत ! कर्मकांडांत देवतास्तुतिपर मंत्र आहेतच. ख्रिस्ती मंदिरांत सुद्धां Prayers म्हणतात, मृतासाठीं प्रार्थना करितात, व युद्धादि राष्ट्रीय संकटाच्या वेळींही सार्वजनिक प्रार्थना केल्या जातात हें आपण पाहतोंच आहोंत. श्राद्धसमारंभाच्या वेळीं मृताला स्वर्गाचा मार्ग सुखकर व्हावा म्हणून प्रार्थनेचे मंत्र सर्वच म्हणतात. पारशी लोकांत सुद्धां कोणी मनुष्य मेला म्हणजे तीन दिवस मृतासाठीं प्रार्थना करण्याची चाल आहे. ख्रिस्ती प्रॉटेस्टंट म्हणजे सुधारक मृतांसाठीं प्रार्थना करीत नसले तरी येशू ख्रिस्ताची प्रार्थना करितात. मुसलमानांत, व सुधारलेल्या ब्राह्मो व प्रार्थनासमाजिस्टांतही प्रार्थना आहेतच. तात्पर्य काय कीं, सर्व धर्मांत व धर्मपंथांत ईशप्रार्थनेची चाल आहे, हा धर्माचा एक प्रधानभाग आहे, हें मनुष्य स्वभावाचें सहज अंग आहे, हा जीवाचा धर्म आहे. ईश्वराच्या कल्पनेंत भेद असेल, पण ' जगाचा जो ऐसा धनि कवण तो पाव मज मा ' अशी प्रार्थना करण्याचा मनुष्यस्वभाव आहे हें निर्विवाद सिद्ध आहे.

२. ईश्वराचे रामकृष्णादि अवतार होण्यापूर्वी ज्ञात्या व तपस्वी लोकांनीं देवानें सगुण अवतार घेऊन सुष्टसंरक्षण, दुष्टदमन व धर्मसंवर्धन करावें, म्हणून त्याच्या प्रार्थना केल्या आहेत ' भूमिभारेण मग्ना , झाली कीं गोरूप धरून देवाकडे जाते व देव सगुणरूप घेऊन धर्म-

पालन करितात, अशा कथा पुराणांत आहेत. देवाला निर्मळपणानें हाक मारली कीं, देव हाकेसरशीं उडी घालून धांवत येतो हें नाभाजी व महिपती यांच्या संतचरित्रांवरून प्रसिद्ध आहे. सर्व भक्तांचा तसा अनुभवच आहे. अजामेळ, गजेंद्र, द्रौपदी, दामाजीपंत इत्यादि भक्तचरित्रें प्रार्थनेची सफलता कशी होते हें आपल्या मनावर बिंबवणारीं आहेत. चित्त जितकें शुद्ध, भावना जितकी अधिक उत्कट, भक्ति जितकी तीव्र व निस्सीम, तितकें प्रार्थनेचें प्रत्युत्तरही अधिक निश्चयपूर्वक मिळतें. देव भक्ताच्या हाकेला ' ओ ' देतो खास, मात्र हाक मारणारा पाहिजे !

**घेवोनियां चक्रगदा । हाच धंदा करितो ॥ १ ॥**
**भक्त राखे पायापाशीं । दुर्जनासी संहारी ॥ २ ॥**

३. प्रार्थना म्हणजे कांहीं तरी याचना करणें, मागणें, कृपा भाकणें वांछापूर्तीसाठीं देवाला आळवणें, त्याचे गुण गाणें. कांहीं लाभ व्हावा, हानि टळावी, यासाठींच याचक याचना करीत असतो, पण सर्व अपेक्षा, सर्व कामना हरीचे गुण गातां गातां नष्ट व्हाव्यात व हरिप्रेमांत विसरून विरघळून जावें हा प्रार्थनेचा मुख्य हेतु. कांहीं मागण्याचा प्रसंग राहूं नये हें देवाला मागणें—हाच प्रार्थनेचा हेतु. प्रल्हादाला 'वर माग' म्हणून नृसिंह म्हणाले तेव्हां तो तन्मय होऊन मौन धारण करून उगा राहिला व देव ' माग माग ' म्हणून पाठीस लागले तेव्हां ' देवा ! काय मागावें तें समजत नाहीं. चित्तांत शोध घेतों पण कसलाच काम राहिला नाहीं ' असें तो सगद्गद होऊन म्हणाला. प्रार्थनेचें अंतिम साध्यच हें कीं सर्व अर्थ चित्तांतून नाहींसे व्हावेत व हरीवांचून कोणताच काम शिल्लक राहूं नये ! निष्काम होण्यासाठीं पूर्णभक्तही हरिस्तुतींत रंगून जातात. नामस्मरण ही प्रार्थनाच आहे व प्रार्थनेचें परम शुद्ध स्वरूप आहे. सर्व यज्ञांत ' नामजप ' मुख्य आहे.

४. प्रार्थनेंत आपण देवापुढें अंतःकरण खुलें करितों.

**पतित मी पापी शरण आलों तुज । राखीं माझी लाज पांडुरंगा ॥ १ ॥**

.... .... .... ....

**माझे मज कळों येती अवगुण । काय करूं मन अनावर ॥ १ ॥**
**आतां आड उभा राहे नारायणा । दयासिंधुपणा साच करीं ॥ २ ॥**

आईपुढें लेंकरूं जसें मन मोकळें करितें तसें आपण देवापुढें मन मोकळें करितों, निष्कपट होतों; हा प्रार्थनेंत मोठा लाभ असतो. प्रार्थनाप्रसंगीं आत्मपरीक्षण होतें, चित्ताच्या कोनाकोपऱ्यांत जो मलिनपणा—जी घाण असते ती आपली आपल्याला प्रतीत होते व ती ' काढून टाक ' अशी आपण सहजच देवाची प्रार्थना करितों, आपल्या मलिन वासनांचें गुंडाळें आपण देवापुढें सोडतों. कामक्रोधांच्या, मत्सराच्या, गर्वाच्या, गुप्त वासना मोठ्यामोठ्यांच्याही चित्तांत दडून बसल्या असतात त्या प्रार्थनाप्रसंगीं त्यांच्या त्यांना प्रतीत होऊन देवापुढें प्रांजळबुद्धीनें मांडल्या जातात. जगापासून आपण आपलें पाप, आपले दोष, आपल्या मलिन वासना चोरून ठेवतों; पण देवापुढें त्या निर्लज्जपणानें निर्भयपणानें सांगाव्याशा वाटतात व प्रार्थनाप्रसंगीं आपण त्या सांगत असतों. आपण सामान्यतः आपल्या चित्तांत अंतर्मुखवृत्तीनें क्वचितच पाहातों, पण ईश्वरसाक्षिक जर पाहूं लागलों तर आंतली सारी घाण मनश्चक्षूला दिसते, आणि ती घाण लक्षांत येतांच तिचा वीट येतो, व वीट येणें हाच ती नाहींशी करण्याचा राजमार्ग आहे. ' पापोऽहं पापकर्मात्मा ' हा मंत्र कवायतीसारखा न म्हणतां—म्हणतां म्हणतांच दोषदर्शन सुरू झालें तर अंतर्बाह्य स्नान होऊन खरें शुचित्व प्राप्त होतें. मात्र ' पापोऽहं पापकर्मात्मा ' म्हणतांना आपलें मूळचें सच्चिदानंदस्वरूप आहे हें विस्मरण केव्हांही नसावें ! नाहीं तर ' पापोऽहं ' म्हणतां म्हणतां पापरूपाचेंच जास्त चिंतन होऊन तीच कल्पना दृढतर व्हायची ! मी मूळचा हिरा आहें पण उकिरड्यांत पडलों आहें तो तेथून सुटून सोन्याच्या डबींत बसावा, अशी भावना ठेवावी. आत्माम्नीवर मलिन वासनांचें भस्म सांचलें आहे तें ईश्वरसाक्षिक आत्मपरीक्षणाच्या वायूनें उडवून लावायचें आहे. इंद्रियांचें मालिन्य दूर करा कीं मी पहिलाच हरिरूप आहें, इंद्रियांच्या पकडींतून मला सोडवा कीं माझी तद्रूपता होईल, अशी भावना ठेवून प्रार्थना करावी. मी किडा आहें, तुच्छ आहें, पापमय आहें ही घाणेरी भावना नित्य पोटांत ठेवणें अत्यंत अपायकारक आहे.

५. ईश्वराची प्रार्थना करतांना हात जोडणें, गुडघे टेकणें, लोटांगण घालणें, लोळणें हें स्वाभाविक आहे. मनांत पूज्यता उत्पन्न झाली, प्रेम चढलें कीं नामोच्चार मुखानें प्रगट होणें व लीनता वाटणें साहजिक आहे, व त्याचें दर्शकच वरील शरीरक्रिया आहेत. तसेंच प्रेमाची तार चढविण्यास वीणा, सतार, मृदंग, टाळ, चिपळ्या, निदान नुसत्या हातांच्या टाळ्या या प्रकारच्या नादाचें उत्तम साह्य होतें यांत संशय नाहीं. नुसत्या टाळमृदंगांत दंग होऊन हरि विसरणें हें गैर आहे; पण तसेंच हीं सर्व साधनें ढोंगाचीं आहेत असें प्रतिपादणें हेंही गैर आहे. भावना मुख्य आहे; पण त्या भावनेच्या विकासास अवश्य, निदान पोषक, असें जें साहित्य त्या साहित्याला तुच्छ लेखणें शहाणपणाचें नाहीं. युद्धप्रसंगीं शिपायाच्या अंगीं वीरश्री चढावी म्हणून नाना प्रकारचीं वीरश्रीचीं रणवाद्यें वाजवितात, तसा कीर्तनादिप्रसंगीं मृदंगटाळवीणांचा, टाळ्यांचा, नामघोषगजरांचा श्रोत्यांच्या मनांत भक्तिप्रेमविकास होण्याच्या कामीं फार उपयोग होतो ही अनुभवसिद्ध गोष्ट आहे. सहजसिद्ध वीराला व पूर्णभक्ताला बाह्योपकरणांची गरज नाहीं हें खरें, पण लढाईवर जाणारे सगळे शिपाई शिवाजी नसतात; तसे मंदिरांत जमणारे सगळे भाविक तुकोबा नसतात यांत कांहीं नवल नाहीं. रणांगणावर काय किंवा मंदिरांत काय जन्मसिद्ध वीर एखादाच असतो. अलीकडे टाळवीणामृदंगादि घेऊन भजन करणाऱ्यांची ' टाळकुटे ' म्हणून कुचेष्टा करण्याचा कित्येकांचा संप्रदाय पडला आहे, पण त्यावरून दोघांनींही बोध घेण्यासारखा आहे. टाळ घेऊन भजन करणाऱ्यांत दोष असतील तर ते त्यांनीं टाकावेच; पण त्यांपैकीं कित्येकांच्या दोषांमुळें किंवा दुबळेपणामुळें मृदंगटाळवीण्यांची कुचेष्टा करणें हें गैरशिस्त आहे हेंही टीकाकारांनीं विसरूं नये. आज पन्नास वर्षें सभा व वर्तमानपत्रें हीं देशजागृतीचीं व देशोद्धारांचीं मुख्य साधनें म्हणून ठरलेलीं असून यांच्या योगानें खरा व पुरा देशोद्धार होत नाहीं म्हणून कोणी त्यांची ' तोंडपाटील ' ' लेखणीबहाद्दर ' अशी कुचाळी केली तर ती जितकी गैरशिस्तपणाची होईल तितकीच वारकऱ्यांचीही ' टाळकुटे ' म्हणून

कुचाळी करणें चुकीचें आहे. सभावर्तमानपत्रवाल्यांत खऱ्या दिलाचा एखादाच टिळक सांपडतो, तसा टाळवीणामृदंगवाल्यांत एखादाच ' भाऊ काटकर ' सांपडणार ! बाकी मनुष्यसमाज सर्वत्र सारखाच आहे. सामान्य लोकांचाच जमाव कांग्रेसच्या मंडपांत किंवा कीर्तन-मंदिरांत सांपडायचा. कोणी कोणाची कुचेष्टा न करितां त्यांत शिरून गुण तेवढा पहावा व सामर्थ्य असल्यास गुणसमुच्चय वाढवावा. असो. कित्येक नवशिक्षितांत वारकऱ्यांबद्दल जो उपहास केला जातो त्यासंबंधानें हें थोडेंसें विषयांतर झालें. तात्पर्य, सामान्य जनतेला तरी बाह्यउपांगाचा उपयोग आहे, एवढाच मुख्य मुद्दा आहे.

६. प्रार्थनेचें अत्यंत उन्नत स्वरूप म्हणजे गुणनामसंकीर्तन होय. यांत देवाचे दिव्य गुण, त्याच्या मनोहर अवतारलीलांचें वर्णन, व त्याच्या साभिप्राय अनंतनामांचा घोष याचा मुख्यत्वेंकरून समावेश होतो. या प्रकाराचे आद्यप्रवर्तक नारदमुनि हेच असावेत. महाराष्ट्रांत नामदेवराय, एकनाथस्वामी, तुकोबाराय, समर्थ रामदासस्वामी, अमृतरायजी इत्यादि सत्पुरुषांनीं या नामसंकीर्तनरूप ईशप्रार्थनेचा सार्वत्रिक व सार्वजनिक प्रघात पाडला व लोकप्रिय केला. देवाचे गुण गातां गातां आपले दुर्गुण विसरणें, त्याच्या लीला वर्णितांना लौकिक क्षुद्र चेष्टा विसरणें, त्याच्या चिंतनांत, भजनांत, नामग्रहणांत देहभाव विसरणें, अमृतस्वरूपाच्या तन्मयतेनें जन्ममृत्यूंच्या गोष्टी विसरणें, देवाच्या प्रेमलहरींनीं आकृष्टचित्त होऊन सर्व कामना विसरणें हा लाभ श्रोत्यावक्त्यांच्या मगदुराप्रमाणें गुणनामसंकीर्तनांत होत असतो. ' गुण गाईन आवडी । हेचि माझी सर्व जोडी । ' हेंच देवापाशीं दान मागावयाचा तेवढा काम अवशिष्ट राहून बाकीच्या सर्व वासना जागच्या जागीं जिरून नामशेष होऊन जातात.

**अविट हे क्षीर हरिकथामाउली । सेवितां सेविली वैष्णवजनीं ॥ १ ॥**

या कीर्तनोपासनेंत भक्तजन देवापाशीं कसें निष्कामाचें दान मागतात, तें पाहिलें म्हणजे कीर्तनपद्धति ही प्रार्थनापद्धतीचें किती निर्मळ, पूर्ण व दिव्यरूप आहे हें समजतें—

**तुका ह्मणे तुझी नळगे दसोडी । परी आहे आवडी दर्शनाची ॥ १ ॥**

———

## २९ गीतारहस्य.



१ लो. बळवंतराव टिळक यांचा 'गीतारहस्य' ग्रंथ प्रसिद्ध झाल्यापासून त्यावर अनुकूल–प्रतिकूल टीकांचा भडिमार वर्तमानपत्रें व मासिकें यांतून पुष्कळच झालेला आहे व तद्विषयक नवे नवे ग्रंथही प्रसिद्ध होत आहेत. लो० टिळकांचा ग्रंथ प्रसिद्ध होतांच त्याची एक प्रत त्यांनीं आम्हांकडे पाठविली होती व त्यानंतर गीता व गीतारहस्य यासंबंधानें चार ग्रंथ अभिप्रायार्थ आमचेकडे आले आहेत. एक रामदुर्गसंस्थानचे कारभारी रा० कोल्हटकर यांचा, दुसरा गोविंदसुत म्ह० परशुराम गोविंद चिंचाळकर यांचा, तिसरा कल्याणचे रा. ब. हरि नारायण नेने यांचा व चवथा गीतेवर स्वतंत्रपणें लिहिलेला रा. शंकरराव राजवाडे यांच्या ग्रंथाचा पहिला खंड. पहिले तीन ग्रंथ गीतारहस्याच्या खंडनात्मक असून ते गीतारहस्यासगट आम्हीं काळजीपूर्वक वाचून पाहिले आहेत.

२ गीतारहस्य हा ग्रंथ लो. टिळकांसारख्या स्वदेशभक्ति, विद्वत्ता, व्यासंग, बुद्धिमत्ता इत्यादि गुणांनीं जगविख्यात झालेल्या थोर पुरुषानें ४२वर्षांच्या अध्ययन-मननानंतर बंदिवासासारख्या आपत्तींत लिहिलेला असल्यानें त्याची योग्यता असामान्य आहे, व त्यावर अभिप्राय देण्याचें कामही बिकट आहे. गीतारहस्य प्रगट झाल्याबरोबर आचार्यांचें भाष्य, ज्ञानेश्वरी इ. सांप्रदायिक ग्रंथ आतां खास मागें पडणार व रहस्याचाच सर्वत्र विजय होणार असें प्रथम कित्येकांस वाटत होतें; पण महाराष्ट्राचा जिवटपणा याही बाबींत प्रगट झाला. राजकारणांत प्रति अर्जुन असे आमचे शूरवीर लोकमान्य सर्वप्रिय असतांही महाराष्ट्रानें गीतेच्या बाबतींत त्यांचें मत 'बाबावाक्य' म्हणून मुकाट्यानें पत्करलें नाहीं, ही महाराष्ट्राच्या धार्मिक जिवंतपणाची मोठीच साक्ष होय. गीतारहस्य क्रांतिकारक आहे यांत शंका नाहीं. पूर्वींच्या सर्व टीका सांप्रदायिक अभिमानाच्या म्हणून बाजूस सारून लो. मा. नीं आपल्या सांप्रदायासाठीं स्वतंत्रबुद्धीच्या जोरावर हा ग्रंथ उभारला आहे. ग्रंथ अलौकिक आहे, अभ्यसनीय आहे, कांहीं प्रकरणें फारच बहारीचीं

आहेत, पाश्चात्य व पौर्वात्य तत्त्वज्ञानाचें आयतें ताट वाढून लोकांपुढें ठेवलें आहे, हा लो. टिळकांचा लोकांवर मोठा अनुग्रह आहे. तथापि शंकराचार्यांच्या संन्यासमार्गावर तीव्र कटाक्ष, भक्तिपंथासंबंधानें गुळमुळितपणा, भागवताला गीतेपासून तोडून गीताभागवतरूपी भक्तिपंथी लोकांच्या बुरुजावर गुप्त हल्ला, कर्मयोगाचा वाजवीहून अधिक डिंडिम पिटण्याची खटपट इ. प्रकारांमुळें जुन्या परंपरेनें गीताभ्यास करणाऱ्या लोकांत खळबळ उत्पन्न होणें साहजिक होतें व तसें झालेंही आहे. तथापि गीतेकडे अधिक बारकाईनें पाहण्यास गीतारहस्यानें लोकांस शिकविलें व हाच या ग्रंथाचा विशेष उपयोग व उपकार होय. रहस्यांत अनेक विषयांचा शिस्तवार व ग्रंथाधारें पण स्वतंत्रपणें उत्तम विचार केला असल्यामुळें लोकमान्यांचें मत कोणास मान्य झालें नाहीं, तरी वाचकांच्या विवेकशक्तीस चेतना देऊन विचार करण्यास लावण्याची विलक्षण शक्ति त्यांत आहे हें निर्विवाद आहे.

२ गीतारहस्यांत जीं वादग्रस्त स्थळें आहेत त्यांचें खंडन, निरीक्षण व विवेचन रा. कोल्हटकर, गोविंदसुत व रा. ब. नेने यांनींही तितक्याच मार्मिकपणानें केलें आहे. पहिल्या दोघांस गुरुपरंपरेचा टेका आहे, पण रा. ब. नेने यांनीं लो. टिळकांप्रमाणेंच ' सांप्रदायिक भाष्यें व आग्रह एका बाजूस ठेवून स्वतंत्र व निःपक्षपातरीतीनें ' रहस्याचें निरीक्षण केलें आहे व तें करतांना त्यांच्याच विवेचनपद्धतीचा अवलंब करून त्यांचे मुख्य सिद्धांत शांतपणें व एकही वावगा शब्द न योजतां खोडून काढले आहेत. रा. कोल्हटकरांचें खंडण अमळ तिखट व ' ज. शास तसें ' या थाटांत पण मुद्देसूद आहे. लो. टिळकांच्या सिद्धांतांचें खंडन अध्यात्मदृष्टीनें गोविंदसुतांनीं केलें आहे व ऐतिहासिकदृष्टीनें रा. ब. नेने यांनीं केलें आहे. गोविंदसुत हे गुरुपुत्र असून संतांच्या मार्गानें त्यांनीं विचार केला आहे. ' शांत चित्ताच्या शीतल छायेंत ग्रंथकाराच्याही सर्वांगाला गुदगुल्या होतील अशा हस्तकौशल्यानें व डोळा न फोडतां केर तर निघावा अशा खुबीनें ' प्रसंगीं सविनोद व प्रसंगीं गंभीर अशा पद्धतीनें गोविंदसुत यांनीं आपला ग्रंथ लिहिलेला आहे.

जशा रहस्यांत तशा या तीनही टीकात्मक ग्रंथांत शिकण्यासारख्या गोष्टी पुष्कळच आहेत.

४ खराखरा गीतार्थ भाष्यकारांना वाट पुसत जाणाऱ्या श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या मुखांतून प्रगट झालेला असून इतकें सर्वांगसुंदर व प्रासादिक गीताभाष्य अन्यत्र आढळणें दुर्घटच असा आमचा मूळचा विश्वास गीतारहस्य व त्यावरील टीकाग्रंथ वाचूनही दृढतर झाला. ज्या भगवंताच्या मुखांतून गीता प्रगट झाली त्यांच्याच मुखांतून ज्ञानेश्वरीही प्रगट झालेली असल्यामुळें ज्ञानेश्वरीची सर दुसऱ्या कोणत्याही गीतेवरील टीकेस येणार नाहीं. सर्व वाद व मतमतांतरें जेथें सगट होतात अशा ब्रह्मात्मैक्यतेच्या भूमिकेवरून ज्ञानोबामाउलीचे उद्गार निघालेले असल्यामुळें ते निर्विवाद, सत्य, शुद्ध असून मुमुक्षुजनांना मार्गदर्शक व तारक आहेत. ते स्वानुभवाचे, अत्यंत सरस, मनमोहक म्ह० मनाचा मनपणा मोडून त्याचा ब्रम्हीं लय करण्यास समर्थ असे आहेत. कर्मज्ञानउपासनेचे सर्व दिव्य रंग ज्ञानेश्वरीपटावर यथार्थतेनें उमटले आहेत. ‘ कांडत्रयरूपिणी । श्रुतीच हे कोंडिसवाणी ’ अशी गीतामाउली ज्ञानोबारायांच्या ग्रंथमंदिरांत मुमुक्षूंस अधिकारपरत्वें कर्मज्ञानभक्तीचें अमृतपान करवीत आहे. ज्ञानेश्वरींत कर्म, ज्ञान व भक्ति यांच्यांत युद्ध चाललेलें नाहीं, संन्यास व कर्मयोग यांचा लढा तेथें नाहीं. सर्व आपआपल्या अंगानें परिपूर्ण आहेत. ज्ञान व भक्ति यांचें तेथें मधुर मीलन झालें आहे. ‘ तेंचि भक्ति तेंचि ज्ञान । एक विठ्ठलचि जाण ’ असा तेथला रंग आहे. गुरुपरंपरामार्गानें ज्ञानविज्ञान प्राप्त झालेल्या महात्म्याचे ते सहजोद्गार आहेत. जीवांच्या करुणेनें ज्ञानेश्वरीमाउली पान्हावली आहे. त्यांचा विद्याविनय, त्यांची गुरुभक्ति, त्यांची श्रीकृष्णप्रीति, त्यांचा सगुणनिर्गुणभाव सर्व अलोट आहे. गीतेचें खरें रहस्य ज्ञानेश्वरींतच संपूर्ण सांपडतें. असो. टिळकांचा रहस्यग्रंथ व उपरिनिर्दिष्ट तीन टीकाग्रंथ प्रत्येकानें अवश्य वाचून आपल्या ग्रंथालयांत ठेवावे व गीतेचें रहस्य ( भगवंताचें हृद्गत ) देवमंदिरांत ज्ञानोबामाउलीसच विचारावें, असा आमचा अभिप्राय आहे.

# ३० काळाचा काळ.



स्मशानेष्वाक्रीडाः स्मरहर ! पिशाचाः सहचराः ।
चिताभस्मालेपः स्रगपि नृकरोटीपरिकरः ॥
अमंगल्यं शीलं तव भवतु नामैवमखिलं ।
तथापि स्मर्तृणां वरद परमं मंगलमसि ॥ १ ॥

( महिम्न )

१. हा अनुपम श्लोक एका उत्कृष्ट स्तोत्राची बरोबरी करील. असा सहृदयपणाचा एक उद्गार एका मोठ्या ग्रंथाहून भारी किंमतीचा आहे. ही जिवंतपणाची एक कल्पना विद्वत्तापूर्ण पण नुसत्या रूढ होऊन निर्जीव झालेल्या सहस्र कल्पनांहून जास्त आनंददायक आहे.

२. हा महिम्नस्तोत्रांतला श्लोक आहे. काल संध्याकाळीं आम्ही तिघे स्नेही गच्चीवर हास्यविनोद करीत बसलों असतांना संस्कृत व मराठी भाषेंत जीं बहारीचीं स्तोत्रें आहेत त्यांचा विचार चालला होता. मराठींतलीं व्यंकटेशस्तोत्र, केकावली, तुकोबांचे अभंग, पदें यांच्याबद्दल चर्चा होऊन त्यांतील उत्तमोत्तम विचारसुमनांचा आम्हीं परिमळ घेतला व रामरक्षा, महिम्न, गंगालहरी ह्या संस्कृत स्तोत्रांतलि अनेक सुंदर श्लोक म्हणत म्हणत चित्तप्रसन्नतेचा पूर्णानुभव घेतला. चार विद्वान्, प्रेमळ, श्रद्धावंत, रसिक व मर्मज्ञ स्नेही एकत्र बसून सहजासहजीं त्यांच्या भाषणांत जो रंग उडतो व ब्रह्मानंदाच्या जवळजवळ जाणाऱ्या विद्यानंदाचा जो अनुभव येतो त्याचें सुख कांहीं अनिवार आहे. ' मिळतां प्रचीतीचे संत । एकांतापरिस एकांत । ' असें एकांताचें गोड लक्षण समर्थांनीं केलें आहे.

३. आमच्या सुखसंवादांत वरील श्लोक निघाला व त्याच्या अर्थाचें उद्घाटन होऊन आम्हीं आनंदरूप झालों. देवाचीं स्तुतिस्तोत्रें गाऊन व समवृत्तीच्या सन्मित्रांशीं त्याच्याबद्दल चर्चा करून सर्व मनस्ताप दूर होतात व शांतिसुख भोगावयास मिळतें. पंत म्हणतातः—

स्तुति करुनि तुझी तुजला, आम्ही अज्ञान काय बा रिझवूं ? ।
गाउनि अमृत गुणांतें हृदयींचे ताप आपुले विझवूं ! ॥ १ ॥

वरील श्लोकाचा अर्थ सर्वांस माहीतच आहे. त्यांत परमात्म्याचें स्तवन केलें आहे. ती परमपुरुषाची स्तुति आहे. महिम्नस्तोत्राइतकें उदात्त स्तोत्र दुसरें सांपडणें कठिण आहे व त्यांतीलही वरील श्लोकाची खुमारी कांहीं विशेष आहे.

४. From the Everlasting 'No' to the Everlasting 'yes' ह्या कार्लाईलनामक प्रख्यात इंग्रजी तत्त्ववेत्त्याचें वाक्य वरील श्लोक वाचून आम्हांस सुचलें व त्यांतील कल्पना ' अमंगल्यं शीलं.... परममंगलमासि ' ह्यांत कशी उतरली आहे हें पाहून मौज वाटली.

५. सांप्रत प्लेग, दुष्काळ, रोग व इतर सर्व आपत्ति भरतखंडावर सारख्या कोसळत आहेत. लोक त्रिविधतापांनीं जर्जर झाले आहेत. ' कालोस्मि लोकक्षयकृत् प्रवृत्तः ' ही उक्ति देशस्थिति पाहून खरी वाटते. जन्म आणि मृत्यु, बारावीं आणि बारशीं असा हा प्रपंच आहे. लाखों प्राणी जन्मतात, दुःख भोगतात, आणि मरतात, असा अनुभव आहे. प्रश्न असा उद्भवतो कीं, ह्या दुःखरूप जगांत सुख आहे का ? अमंगलांनीं भरलेल्या ह्या जगांत मंगलाचा वास आहे का ? नश्वरांच्या वाहुटळींत अविनाशी वस्तु आहे का ? ह्या प्रश्नांना ' आहे ' असें उत्तर वरील श्लोकानें दिलें आहे.

६ जगांतील दुःखदुरितदैन्यांची परंपरा पाहिली म्हणजे जर्मन तत्ववेत्ता शोपेनहॉर ह्यानें जें ह्मटलें आहे कीं, ' The world is a mistake and universal suicide is the remedy ' ह्म० जगाची उत्पत्ति ही मोठी चूक झालेली असून विश्वसंहार हाच ती दुरुस्त करण्याचा उपाय आहे, तें क्षणभर खरें वाटतें ! पण हें बुद्धिदौर्बल्य, हा कार्पण्यदोष वरील श्लोकांतील तत्व मनांत आलें कीं नाहींसा होणारा आहे.

७. श्लोकाचा भावार्थः " देवा ! तुमची क्रीडा स्मशानांत चालली आहे. तुह्मी स्मरहर ह्म० कामांतक आहांत, जीवाचे मनोरथ, वासना, अभिलाष जात्याच्या तळीखालीं भरडून टाकीत आहांत.

आह्मी पदोपदीं भग्नमनोरथ होत आहोंत. चितेचें भस्म तुह्मी आपल्या अंगाला लावलें आहे, ह्मणजे जीवमात्रांना जाळून तुह्मी निःसंगपणानें वेगळे राहिले आहांत. मनुष्यांच्या कवट्यांच्या माळा तुमच्या गळ्यांत आहेत, ह्म० जीवांना जन्ममृत्यूच्या फेऱ्यांत पाडून तुह्मी नुस्ती मौज पहात आहांत. प्लेग, दुष्काळ, रोग, दारिद्र्य इत्यादि पिशाचें हे तुमचे सहचर आहेत ह्म० तुमच्या विश्वभक्षकत्वाला साह्य करणारे आहेत. अहो देवा ! तुमचें शील असें अमंगल आहे, तथापि तुमचें अखंड स्मरण करणाऱ्यांना तुह्मी मंगलच आहांत, त्याला तेवढे वरद आहांत. वरवर पहाणाऱ्यांना देव क्रूर आहे, अमंगल आहे, अन्यायी आहे असें वाटण्याचा संभव आहे; पण त्याच्या सर्व कार्यांच्या पोटांत स्थिरबुद्धीनें त्याचें रूप स्मरणपूर्वक पाहिलें ह्मणजे तो परममंगलच आहे असें दिसतें. देव दयाळु आहे, देव उदार आहे, देव न्यायी आहे, देव सुखाचा सागर आहे, देव आनंदाचा कंद आहे, देव मायिक कल्पनांच्या पर आहे, देव निर्मल आहे, देव निष्कल आहे, देव मंगल आहे; इत्यादि प्रकारानें संत देवाला गात असतात. हरीचें नित्यस्मरण पाहिजे ह्मणजे हरि मंगलायतन आहे असाच अनुभव येईल.

---

४०

प्रत्येकांत कांहींना कांहीं तरी सद्गुण असतात. सद्गुणाकडे दृष्टि ठेवल्यानें दुसऱ्याचे दोष दिसत नाहींत व सद्गुणावर दृष्टि असल्यानें आपल्या सद्गुणाचें पोषण होऊन दुसऱ्याच्या गुणाचें वर्णन झालें म्हणजे त्यालाही उमेद येऊन असलेले सद्गुण वाढविण्याकडे त्याची प्रवृत्ति होते. बोलूंच नये, पण बोलणेंच असल्यास गोड बोलावें. स्तुति निंदा करूं नये, पण करणेंच असल्यास दुसऱ्यांच्या गुणांची स्तुति व आपल्या दुर्गुणांची निंदा करावी.

* * *

# ३१ हरिशरणागति.



## अभंग.

**माया तेचि ब्रह्म ब्रह्म तेचि माया । अंग आणि छाया जयापरी ॥ १ ॥**
**तोडितां न तुटे सारितां निराळी । लोटांगणातळीं हारपते ॥ २ ॥**
**दुजें नाहीं तेथें बळ कोणासाठीं । आणिक ते आटी विचाराची ॥ ३ ॥**
**तुका म्हणे उंच वाढे उंचपणें । ठेंगणीं लवणें जैशीं तैशीं ॥ ४ ॥**

काया आणि छाया जरी दोन दिसतात तरी वस्तुतः एकच आहेत, त्याप्रमाणें ब्रह्म आणि माया यांचा ( पुरुष आणि प्रकृति, शिव आणि शक्ति, चित् व जड किंवा ब्रह्म आणि जग ) हीं जरी भिन्न वाटलीं तरी तीं तत्वतः एकच आहेत. सोनें आणि अलंकार जसें एकच त्याप्रमाणें वस्तु आणि जग एकच आहेत. ' चिद्विलास जग नग हेमीं, वस्तुत्वें भेदातित रे ' हा रंगनाथांचा त्याप्रमाणेंच ' जग आघवी वस्तुप्रभा ' हा ज्ञाननाथांचा अनुभव आहे. छाया शस्त्रानें तुटत नाहीं किंवा हातानें दूर ढकलली तरी दूर होत नाहीं, पण जमिनीवर लोटांगण घातल्याबरोबर वेगळी न राहतां आपल्या अंगाखालीं नाहींशी होते; त्याप्रमाणे शास्त्रादिकांच्या अभ्यासानें व जपतपानुष्ठानादिकांच्या साह्यानेंही ज्या मायेचा निरास होत नाहीं अशी ती ' दुरत्यय माया ' ' मामेव ये प्रपद्यंते ' म्हणजे जे भगवंताला सर्वभावानें शरण जाऊन त्याच्यापुढें लोटांगण घालतात व निरहंकार होऊन त्याच्याच चरणाचा आश्रय करतात, त्यांच्यासमोर उभी न राहतां जागच्या जागीं नाहींशी होते. " येथ एकचि लीला तरले । जे सर्वभावें मज भजले । तया ऐलीच थडी तरले । मायाजळ ॥ " (ज्ञानेश्वरी ७–९७) मायेचा निरास दुसरे कोणी करूं शकत नाहींत. आपल्या बुद्धीनें, शक्तीनें माया जिंकूं म्हणतील त्यांना कष्ट मात्र होतील. माया ईश्वराधीन असल्यामुळें ईश्वराला शरण गेल्यानें मात्र तिची बाधा होत नाहीं.

माया सामान्य नव्हे. तिची शक्ति ईश्वरसान्निध्यामुळें अपार आहे. अल्पज्ञ जीव तिला काय जिंकणार ? पण ईश्वरभक्ताला माया कांहीं करीत नाहीं, म्हणून श्रीहरीला सर्व भावानें शरण जाण्यावांचून जीवाला दुसरा तरणोपाय नाहीं. हरिशरणागति हा एकच मायातारणाचा उपाय आहे. आपण उंच झालों तर आपली छाया उंच होते, व आपण लवलों तर ती ठेंगणी होते, आपण लोटांगण घातलें तर ती अंगाखालीं नाहींशी होते; त्याप्रमाणें आपण विद्याधनशक्तितप इत्यादिकांच्या मदानें उंचावलों तर मायाही उंच म्हणजे अनिवार होते व आपण जसजसे लवायला शिकूं तसतशी ती लहान होते व आपण पूर्ण नम्र होऊन साष्टांग नमस्कार घालूं व ' भगवंता ! तुझ्या चरणावांचून मला दुसरा आधार नाहीं ' असें म्हणूं तेव्हां माया ' ठायींच नाहींशी होईल. '

वरील अभंगांत अंगछायेच्या दृष्टांतानें श्रीतुकाराममहाराजांनीं नमनभक्तीचें मर्म फार बहारीनें सांगितलें आहे. श्रीहरीला शरण जाऊन सर्वस्वीं त्याचा दास म्हणविणें, सर्व भार त्यावर टाकून ' करिष्ये वचनं तव ' एवढा त्याचा आज्ञाकर होणें जीवाला कां बरें जड वाटावें ? त्यांत किती आनंद आहे, किती मोकळेपणा आहे, केवढा आधार आहे हे थोडें थोडें अनुभवून तरी पाहावें ! जडभारी पडता मात्र श्रीहरि आठवावा आणि एरव्हीं कां आठवूं नये ? " पाय विठोबाचे चित्तीं । असों द्यावे दिवसरातीं ॥ १ ॥ अत्यंत निर्भयस्थान श्रीहरीचे पाय आहेत ते चित्तीं ठेवून तत्सहवासबळावर निर्भय होऊन प्रपंचपरमार्थ सुखरूप आपण कां न करावा ? शरणागति पाहिजे. लवणें, नमणें, लीन होणें, निरहंकारपणानें हरीचा चरणरेणु होणें, हरि व हरिभक्त यांच्या पायांचा पायपोस होऊन राहणें—ही गोष्ट इतकी कठिण आहे काय ? हरिभक्ति नसेल तर इतर साधनें काय किमतीचीं होत ! हरिभक्ति असेल तर ह्या इतर साधनांची काय किंमत आहे !

" न वेदयज्ञाध्ययनैर्नदानैर्नच क्रियाभिर्नतपोभिरुग्रैः । "

ह्या साधनांनींही वश न होणारा हरि ' शिष्यस्तेहं शाधि मां त्वां

प्रपन्नम् ' म्हणून घट्ट पाय धरणाऱ्या अर्जुनावर प्रसन्न होऊन त्याला विश्वरूप दाखवता झाला. हरिप्रसाद कधीं होईल, नारायण कधीं कृपा करतील, ' आपला ' मला हरि केव्हां म्हणेल अशी मनाला नित्य तळमळ ठेवावी. हरिप्रसाद होईल तर काय एक मिळविलें नाहीं व हरिप्रसाद न होईल तर मिळविलें तें काय ? म्हणून श्रीहरिप्रसाद-प्राप्तीसाठीं शरणागति पाहिजे व शरणगति पाहिजे तर ' लोटांगणा-तळीं हारपून ' गेलें पाहिजे. ह्या नमनभक्तीबद्दल समर्थ म्हणतातः— ( दासबोध द. ४ स. ६ ) ' सहावी भक्ति ते वंदन । करावें देवासी नमन । संत साधु आणि सज्जन । नमस्कारित जावें ॥ २ ॥ सिसापर-ता नाहीं दंड । ऐसें बोलती उदंड । याकारणें अखंड । देवभक्त वंदावे ॥ १६ ॥ '

' नमस्यंतश्च मां भक्त्या ' ह्या भगवदुक्तीचें रहस्य श्रीज्ञानेश्वरमहा-राज प्रेमभरानें सांगतातः—

मग वाड धाकुटें न म्हणती । सजीव निर्जीव नेणती । देखिलिये वस्तु उजू लुंठिती । मीच म्हणोनी ॥ १ ॥ आपलें उत्तमत्व नाठवे । पुढील योग्यायोग्य नेणवे । एकसरें व्यक्तिमात्राचेनि नांवें । नमूंचि आ-वडे ॥ २ ॥ जैसें उंचींहूनि उदक पडिलें । तळवटवरी येऊं लागलें । तैसें नमिजे भूतजात देखिलें । ऐसा स्वभावचि तयाचा ॥ २२४ ॥

४१

नीतीचा अधिक संबंध आचाराशीं आहे, व धर्माचा अधिक संबंध आत्म्याशीं आहे. धर्मांत नीतीचा व नीतींत धर्माचा समावेश होतो, पण हे दोनहि वेगवेगळे आहेत हें विसरूं नये. धर्म हा बाप व नीति ही आई आणि जनता तिचें अपत्य असा संबंध समाजाच्या अभ्युद-यकाळीं स्पष्ट होत असतो.

४२

लोक भले आहेत, देवांश आहेत, देवरूप आहेत अशी श्रद्धा ठेवून आपण देवाप्रमाणें लोकांशीं वागलों तर लोकांतला देवपणा प्रगट होण्यास वेळ लागणार नाहीं.

## ३२ नरसी मेहत्याचीं दोन पदें.

कृष्ण कीर्तनविना नर सदा सुतकी । विमळ कीधे वपू शुद्ध न थाये ॥
सफळ तीरथ श्रीकृष्णकीर्तनकथा । हरितणा दास ज्या हेत गाये ॥धृ०॥
पूर्ण पुरुषोत्तम नवलरंगी तजी । अन्य देवे जेनु मन मोहे ॥
कोटि चिंतामणी कामधेनु तजी । महिषिना पुत्रनु दूध दोहे ॥ १ ॥
गर्ग जोशी जश गाय जेनो सदा । नारद नाम मुखथी न मूके ॥
ते ब्रह्म द्वार आविने उभा रह्या । गोपिका मुख जोवाने ढुंके ॥ २ ॥
अज, भव, सुरपति स्वप्ने पेखे नही । नेति नेति कही निगम वामे ।
नरसैयो रंक जश गाइने रीझवे । सहस्र मुखें शेष पार न पावे ॥ ३ ॥

अर्थ:—कृष्णकीर्तनावांचून राहणारा मनुष्य सदा सुतकीच समजावा. शरीर पाण्यानें शुद्ध होत नाहीं. श्रीकृष्णकथा हेंच उत्तम तीर्थ होय, त्या ठिकाणीं हरीचा दास प्रेमानें कृष्णगीत गात असतो. जो पूर्णब्रह्म श्रीकृष्णाला सोडून इतर देवतांच्या ठिकाणीं रमतो तो कामधेनूला सोडून म्हशीचें दूध काढणारा अभागीच होय. गर्गमुनि ज्याचें नित्य यश गातात, नारद ज्याचें नांव नित्य मुखानें जपतात, तें ब्रह्म ( गोपीगोपांच्या प्रेमाला भुलून ) दारांत येऊन उभें राही व गोपींचें मुख पाहण्यासाठीं टुकून बसे ! ब्रह्मदेव, शंकर व इंद्र यांना स्वप्नांतही दिसायला जो दुर्घट, वेद ज्याचे गुण गातां हातटेकीला येऊन ‘ नेति नेति ’ म्हणतात, शेषाला सहस्र मुखानेंही जो वर्णवत नाहीं तो परमात्मा रंक नरसी त्याचें यश गाऊं लागला म्हणजे तल्लीन होऊन डोलत रहातो !

२

समरने श्रीहरी मेल्या ममता परी । जोने विचारिने मूळ तारूं ॥
तूं अल्या कोण ने कोने वळगी रह्यो । वगर समजे कहे मारू मारू ॥धृ०॥
देह तारी नथी जो तु जुगते करी । राखतां नव रहे निश्चे जाये ॥
देह संबंध तजे नवनवा बहु थशे । पुत्रकलत्र परिवार वाये ॥ १ ॥
धनतणूं ध्यान तूं अहोनिश आदरे । एज तारे अंतराय मोटी ॥
पासे छे पियु अल्या तेने नव परखिये । हाथथी बाजि गई थयोरे खोटी ॥२॥
भर निद्रा भर्यो रोंधि घेर्यो घणो । संतना शब्द सुणिका न जागे ॥
न जागतां नरसैया लाज छे अति घणी । जन्मोजन्म तारी खात भागे ३॥

**अर्थः**—श्रीहरीचें स्मरण कर, चिंता दूर ठेव. तूं आपलें मूळ शोधून पहा. अरे ! तूं कोण आणि कोणास बिलगून ( कवटाळून ) राहिला आहेस ? नीट विचार न करतां व न समजतां तूं हवें त्याला ' माझें माझें म्हणून राहिला आहेस. देह तुझा नव्हे, तूं नीट विचार करून पहा; राखून तो राखला जात नाहीं. तो जाणारा आहे. देहसंबंध सोड. नवे नवे देह पुष्कळ मिळतील. पुत्रकलत्र हा परिवार पुनःपुन्हां मिळेल. धनाचें ध्यान तूं अहोरात्र करितोस. पण हाच तुला मोठा अंतराय आहे. प्रिय आत्मा ( देव ) तुझ्या जवळ ( अंतरीं ) आहे त्याला तूं ओळखलें नाहींस, तूं आपल्या हातानें व्यर्थ घात करून घेतला आहेस, उगीच खोळंबून राहिला आहेस. गाढ झोंपेंत पडला आहेस. तुरुंगांत अडकला आहेस. संतांचा उपदेश ऐकून अजून कां जागा होत नाहींस ? हे नरसी ! नरदेहांत येऊन जागा होणार नाहींस तर तुला मोठी लाज होईल. जागलास तर जन्मोजन्मींची इच्छा सफळ होईल.

---

४३

शिष्यपणाचा अधिकार मोठा आहे. साऱ्या जगाला गुरुत्व देऊन सर्वांपासून आपणास शिकावयाचें आहे ही बुद्धि कायम ठेवणें याचें नांव शिष्यपण. श्रीदत्तात्रयांनीं २४ गुरु करून हेंच तत्त्व शिकवलें आहे. आपल्यापेक्षां सर्वच श्रेष्ठ आहेत व आपण सर्वांहून लघु आहोंत असें नित्य भावावें.

४४

जग गुरु व मी शिष्य, जग देव व मी भक्त, जग सोवळें व मी ओंवळा, जग मायबाप व मी लेकरूं असें मनःपूर्वक भावून तदनुसार जो वागतो तोच परमार्थांत दोन पावलें पुढें टाकील.

*　　*　　*

# ३३ देवाची सेवा.



## अभंग.

**मोल वेचूनीयां धुंडिती सेवका । आम्हीं तरी फुका मागों बळें ॥ १ ॥**
**नसतां जवळीं हित फार करूं । जीवभाव धरूं तुझ्या पायीं ॥ २ ॥**
**नेदूं भाग आम्ही आपुल्या शरीरा । तुम्हांसी दातारा व्हावें म्हणूं ॥ ३ ॥**
**कीर्ति तुझी करूं आमुचे सायास । तूं कां रे उदास पांडुरंगा ॥ ४ ॥**
तुका ह्मणे तुज काय मागों आह्मी । फुकाचें कां नामी म्हणसी ना ॥ ५ ॥

## भावार्थ.

( १ ) ह्या गोड अभंगांत तुकोबा देवापाशीं सेवा–धर्माच्या मोबदल्यांत अभय मागत आहेत. ते म्हणतात,—श्रीमंत लोक पैसे देऊन सेवक धुंडीत असतात. सध्यां सैंपाकी, पाणके, हमाल यांना कोण दर चढला आहे व यजमानांना आर्जव करून पायां पडून ते कसे मिळवावे लागतात हें बहुतेकांना माहीत आहेच. पैसे देऊन लोक सेवक धुंडीत असतात आणि देवा आम्ही तर ' आपण होऊन आमची सेवा फुकट घे ' म्हणून तुझ्या मागें लागलों आहोंत. मग तूं आम्हांला कां बरें पत्करूं नयेस ! आम्हांला सेवेचें मोल नको. घर, दार, संपत्ति सोहळा आम्ही तुझ्यापाशीं कांहीं एक मागत नाहीं.

**तुका म्हणे तुझी नलगे दसोडी । परी आहे आवडी दर्शनाची ॥१॥**

असे आपल्या घरचें खाऊन यजमानाची फुकट सेवा करणारे सेवक, देवा ! कोणालाहि मिळत नाहींत. आणि तुम्हांला तरी कोठें मिळतात ! ' विरळा ऐसा कोणी ' हाच तुमचा अनुभव नाहीं का ? बरें, तुम्हांला वाटेल कीं, " हा फुकट सेवा करायला येतोय् तर हा ती मनापासून करणार नाहीं. " अहो ' दे वाण घे वाण ' किंवा ' जन हे सुखाचे दिल्या घेतल्याचे ' असा व्यवहारांत न्यायच आहे. ' देणावळ तशी धुणावळ ' असा ह्या प्रपंचांतल्या शहाण्यांचा सिद्धांतच आहे. मिळकर्त्याची इच्छा असल्याशिवाय, लाभाचा मोबदला

मिळावयाचा संभव असल्याशिवाय उगाच कोण कोणाच्या उपयोगीं पडतो ? घरचें खाऊन बाजारच्या भाकरी भाजायची लोकांना गरज नसते. असा जर जगाचा अनुभव आहे, आणि तूं फुकट सेवा करायची इच्छा करतोस तर करणार असशील वरपंगीची दांभिक सेवा ! " पण देवा ! असें तुह्मी मनांतसुद्धां आणूं नका. त्या म्हणी लोभी जगांत असतील खऱ्या. मला त्यांशीं काय करावयाचें आहे ? मी त्यांतला नाहीं. माझें आपलें जगाहून सगळेंच वेगळें आहे. मी तुम्हांला प्रतिज्ञालेख लिहून देतों, तुमच्या पायाची शपथ वाहून सांगतों कीं, मी असा वरपंगीचा सेवक नाहीं. मला तुमचें कांहीं नको. आणि माझें सर्वस्व मी तुम्हांला अर्पण करून पुन्हां फुकटची सेवा मागत आहें, मग घ्याना मला पदरांत.

"बरें, पण तुझी फुकटची सेवा तरी कशी होणार तें तरी आह्मांला ऐकूं दे. तुझी निरपेक्षता कोणती तें तरी सांग."

ऐका तर मग. देवा ! मी तुमची फुकट सेवा कशी करणार तें सांगतों, ( चरण २, ३ व ४ यांत फुकट ह्मणजे निरपेक्ष सेवेचें लक्षण तुकोबा सांगत आहेत. )

( २ ) हें पहा पगारी सेवक जे आहेत ते यजमान सन्निध असतांना तोंडदेखलेपणानें यजमानाचें हित वरवर केल्यासारखें दाखवितात, पण पोटांत आपलें स्वतःचें हित वेगळें समजून तेवढेंच जीवीं धरतात. देवा ! मी असा तोंडदेखलेपणा करणारा कुचर सेवक नाहीं, असें तुम्हांला ताबडतोब आढळून येईल. तुह्मी 'जवळी नसतांही' तुमचें अत्यंत हित करीन आणि तेंही जीवभाव तुमच्या पायीं धरून—लवमात्र कुचरपणा न करितां—करीन. माझ्याहून अधिक गांजलेल्या किंवा जिव्हाळ्याच्या भक्तानें तुम्हांला परमातुरतेनें बोलावलें व तुम्हांला जवळून जायचा प्रसंग आला तरीहि तुमच्या पाठीमागें तुमचेंच हित करीत राहीन व तें अगदीं अंग मोडून करीन.

( ३ ) पगारी सेवकांचें स्वतःच्या भोगाकडे अधिक लक्ष असतें.

पण देवा ! जे जे सुखाचे पदार्थ मला मिळतील ते ते मी आपल्या शरीरभोगार्थ न वेंचतां तुलाच अर्पण करीन. सेवकानें भोग भोगले मग ते स्वामीला कसे देतां येतील ? उत्तम हपूसचा आंबा मिळाला तर भाडोत्री सेवक स्वतःच सेवील, पण एकनिष्ठ सेवक तो उष्टा न करितां स्वामीला तसाच अर्पण करील. तसेंच देवा ! घर, दार, अन्नवस्त्र, हें शरीर, वाचा, मन, प्राण, इंद्रियें जें जें माझ्यापाशीं उत्तमोत्तम आहे तें तें मी सर्व ( विषयांच्या दांतांनीं उष्टें न करितां ) तुलाच सर्वभावें वाहीन ! मी आपल्या शरीराचें चीज पुरविण्याकरितां भोग्यवस्तुजात खर्च न करितां सर्व भोग तुलाच वाहीन.

( ४ ) मनुष्यानें भोग सोडले—कनककांतादि विषयांचा त्याग केला--तरी त्याला प्रतिष्ठेची आवड असते; पण देवा ! सर्वस्व खर्चून परम सायास करून, शरीर, वाचा व मन हीं तीनही वेंचून तुझ्याच कीर्तीचा डांगोरा पिटीन. तुझेंच यश त्रिभुवनांत गाईन, तुझ्या नामाचा घोष करीन, तुझ्या सगुण निर्गुण स्वरूपाचें प्रेम, दुनियेंत वाढेल असेंच अहोरात्र करीन. ‘ मानदंभ चेष्टा। हे तों सूकराची विष्ठा ’ अशी माझी प्रतिज्ञा तर ठरूनच गेली आहे. मानदंभाच्या सर्व चेष्टा मी अत्यंत अपवित्र मानतों. मला स्वतःचा मान नको, प्रतिष्ठा नको, कीर्ति नको, कांहीं नको. फक्त तुझी कीर्ति त्रैलोक्यांत पसरावी व त्वत्कीर्तिश्रवणानें लक्षावधि जीव भवसागरांतून तरून जावें एवढीच इच्छा आहे.

( ५ ) देवा ! मी असा निर्लोभपणें तुझा सेवक होऊं इच्छित असतां तूं माझ्याविषयीं उदास रहावेंस हें बरें काय ? ही उदासी सोड, ही निर्गुणाची खोळ दूर फेंकून दे, सगुणरूपानें प्रकट हो, मला आपल्या सेवकांत मिळवून घे, मला आपला म्हण, ‘ नाभी’नाभी ब्र० भिऊं नकोस, या प्रपंचास भिऊं नको, असें आपल्या तोंडानें म्हण, एवढीच आस आहे. ‘ नाभी ’ एवढा शब्द तुझ्या तोंडून निघालेला मला कानांनीं ऐकूं दे.

# ३४ बालविवाह आणि प्रौढविवाह.

१ सध्यां पुण्यास व इतरत्र लग्नकार्यांची झोड उडालेली असून विवाहकालाची मर्यादा ओलांडून गेलेल्याही अनेक मुली आढळून येत आहेत. ' अष्टवर्षा भवेत्कन्या ' हें तर कोठें दिसत नाहींच. बारा, चवदा वर्षांपर्यंत सामान्यतः मुली अविवाहित स्थितींत ठेवण्याची मुलींच्या पालकांना दिक्कत वाटेनाशी झाली आहे, पण ही कालमर्यादा याच्याही पुढें जाऊं दिल्यास आपल्या समाजावर अनेक अरिष्टें ओढवण्याचा संभव आहे म्हणून लोकांनीं वेळींच सावध राहणें अवश्य आहे. मुलींचे विवाह रजोदर्शनापूर्वीं तरी अवश्य झालेच पाहिजेत. रजोदर्शनाची मर्यादा उल्लंघून जाणें हिंदुधर्मशास्त्राप्रमाणें चालणाऱ्या माणसांस अत्यंत अनुचित आहे. रजोदर्शनानंतर मुलीचा विवाह झाल्यास तिचे आईबाप किंवा पालक नरकांत पडतात असें आपल्या सर्व धर्मग्रंथांचें एकमत आहे. हिंदूंनीं आपलें धर्मशास्त्र मानणें किती योग्य आहे हें सांगावयास पाहिजे असें नाहीं. पाश्चात्य समाजाचें अनुकरण आमच्या समाजास हितावह होत नाहीं व होणार नाहीं. प्रत्येक देशाचें हवापाणी, अन्नोदकसंबंध, प्रकृतिधर्म, धर्मनीतिकल्पना, समाजघटनेचीं मूलतत्वें वेगळीं वेगळीं असतात. ज्यानें त्यानें आपल्या समाजबंधनांप्रमाणें वागल्यास सुखशांतीचा भंग होणार नाहीं, नाहीं-तर कीलोत्पाटी वानराप्रमाणें त्याची स्थिति करुणास्पद होईल. हिंदु-स्थानच्या हवेंत मुलींचीं लग्नें १२ वर्षांपर्यंत व मुलांचीं लग्नें २० वर्षां-पर्यंत करणेंच अनेक दृष्टींनीं हितावह आहे. वधूचा पतीशीं संयोग १६ वर्षांपूर्वीं होऊं देणें न देणें हा प्रश्न वधूवरांच्या आरोग्यमानावर अवलंबून राहणार आहे. शिवाय १२ व्या वर्षीं मुलीचें लग्न झालें कीं, लगेच संयोग झालाच पाहिजे असें नाहीं. चार दोन वर्षें पतीच्या घरची रीतभात समजून घेण्यांत व इतरांचे स्वभाव वगैरे कळून सर्वांशीं मोकळेपणानें वागणें कळूं लागण्यांत गेलीं पाहिजेत. प्रौढविवाह व

प्रीतिविवाह हे आमच्या समाजांत जारीनें सुरू झाले पाहिजेत असें मोठ्या अट्टहासानें सुधारक प्रतिपादीत असतात. विवाहकाल हा समाजशास्त्रांतला अत्यंत महत्वाचा प्रश्न असून तो ' मनोरंजना ' चा किंवा ' करमणुकी ' चा विषय नाहीं. आमच्या देशांतील विवाह-संस्थेनें आमचें गृहसौख्य उत्तम प्रकारें राखलें असून ती संस्था नवीन अविचारी अल्लड लोकांना मोडूं देण्यांत समाजाची मोठी हानि होणार आहे. हिंदुलोकांचें गृहसौख्य अत्युच्च दर्जाचें असतें व पाश्चात्य लोक शिक्षणाच्या व सुधारणेच्या फाजील कल्पनांच्या आधीन झाल्यामुळें त्यास पारखे होत चालले आहेत. प्रौढविवाहानेंच प्रीति उत्पन्न होते, वधुवरांनीं परस्परांस स्वयंवरपद्धतीनें निवडले तरच त्यांच्यांत प्रेम उत्पन्न होतें, हें म्हणणें खोटें आहे. प्रौढपणांत प्रीति-विवाहाची चाल असूनही तिकडे पतिपत्नींचे हजारों खटके उडत असून काडीमोडचे हजारों प्रकार प्रत्यहीं होत आहेत ! बरें आमच्या देशांत आईबाप कुलशील, गणगोत्र इत्यादि पाहून मुलांचीं लग्नें करि-तात पण त्यामुळें पतिपत्नींचें प्रेम जमत नाहीं असेंहि नाहीं. उलट बालविवाहांचीं दांपत्यें अपूर्व प्रेमसुख भोगत असलेलीं आपणांस हवीं तितकीं पाहण्यास सांपडतात. सुधारक लोक आपल्या आवडत्या सुधा-रणा अंमलांत आणण्यासाठीं धर्मशास्त्रांचे हवे तसे अर्थ करून भोळ्या-बावळ्या अर्धवट लोकांचा बुद्धिभ्रंश करीत आहेत. कलकत्त्याच्या प्रेसि-डेन्सी कॉलेजचे संस्कृतचे प्रोफेसर बाबू सत्येंद्रनाथ सेन एम्. ए. यांनीं अमृतबझार पत्रिकेंत सुधारकांच्या कित्येक आक्षेपांचें खंडन उत्तम प्रकारें केलें आहे. बाबूजी म्हणतात:—

( १ ) हिंदु लोकांच्या स्मृति ग्रंथांत कोठही सांगितलेलें नाहीं कीं वधू ही कन्यका नसून प्रौढ स्त्री असावी ! ( २ ) त्याचप्रमाणें मुलीनें सोळाव्या वर्षापूर्वीं लग्न करूं नये असं वेदानें कोठेंही एका वचनानें सुद्धां सांगितलेलें नाहीं. ( ३ ) शिवाय वर पंचवीस वर्षांचा असून वधू लग्नसमयीं बारा वर्षांची असावी असें सुश्रुतांत वाग्भटानें वैद्यशास्त्रदृष्ट्या विचार करून

स्पष्ट म्हटलें आहे व सोळाव्या वर्षापूर्वी गर्भाधान होऊं नये एवढेंच त्याचें म्हणणें आहे. धर्मशास्त्र व वैद्यशास्त्र आपल्या बाजूला आहे असें सुधारकांचें जें म्हणणें आहे तें खरें नाहीं असें प्रो. सेन यांनीं सप्रमाण दाखविलें आहे.

२ सांप्रत प्रौढवयांत होणाऱ्या प्रीतिविवाहाचें स्तोम सुधारकीपत्रांतून, मासिकांतून व मंडळांतून माजविण्यांत येत आहे. आपल्या शास्त्रकारांनीं व शहाण्या पूर्वजांनीं जी वयोमर्यादा घालून ठेविली आहे तिचें उल्लंघन कोणत्याही प्रकारें समाजास हितावह होणार नाहीं. सांप्रत रजोदर्शनकालाचेंही उल्लंघन कित्येक ठिकाणीं होत आहे, पण हा प्रकार इष्ट नाहीं. बारा वर्षांच्या वयांत मुलीचें व वीस वर्षांचे वयांत मुलाचें लग्न झाल्यास त्यापासून संसारशकट सुरळीत चालण्यास फार साह्य होतें. मुलामुलींचा प्रत्यक्ष संयोग होण्यापूर्वीं चार दोन वर्षें घरांत ते एकत्र नांदले तर वृत्ति फांकून पापमय न होतां त्यांचा सहज एकजीव होतो. संस्कारशुद्धि संभाळणें हें आमच्या धर्मशास्त्राचें मुख्य तत्व आहे. त्यासंबंधानें एका आंग्लविदुषीचें मत आम्ही पुढें देत आहोंत.

३ मिस एलन की ( Ellen Key ) ह्या बाई 'प्रेम आणि विवाह' नामक आपल्या पुस्तकांत म्हणतात:—

It is evident to every thoughtful person that a real sexual morality is almost impossible without early marriage......The young know, if any one can know, that no form of love is more beautiful than that in which two young people find each other so early that they do not even know when their feeling was born, and accompany each other through all their fortunes—sometimes even to death. Neither do the possibilities exist for the happiness both of the individuals and of the race than in a love which begins so early that the two can grow together in a common development, when they possess all the memories of youth as well as the aims of the

future in common, when the shadow of the third has never fallen across the path of either, when their children in turn dream of the great love they have seen radiating from their parents."

ह्या बाईनीं वरील उताऱ्यांत स्पष्ट म्हटलें आहे कीं, "स्त्रीपुरुषांत खरें अव्यभिचारी प्रेम बालविवाहाशिवाय उत्पन्न होणेंच अशक्य आहे. प्रेमाचा उद्गम होण्याच्या पूर्वीच पतिपत्नी या नात्यानें त्यांचा संबंध जडला व बऱ्यावाईट सर्व प्रसंगांतून ते—मरेतोंपर्यंत—नित्य एकमेकांच्या सहवासांत राहिले तर त्यांच्या ठिकाणीं जें शुद्ध प्रेम उत्पन्न होईल त्या प्रकारचें प्रेम दुसऱ्या कोणत्याही वैवाहिक संबंधांत आढळणें शक्य नाहीं ही गोष्ट कोणास कळणें शक्य असल्यास तरुणांस आधीं कळून येते. बालपणींच लग्न झाल्यानें दोघें एका परिस्थितींत, एका वातावरणांत वाढतात, दोघें जसेजशीं मोठीं होत जातात तसतसे त्यांचें ध्येय, स्वभाव, हितसंबंध, प्रेम अगदीं एकजीव होऊन जातात, दोघांच्या प्रेमामध्यें तिसऱ्या व्यक्तीची छायासुद्धां पडत नाहीं. आपल्या आईबापांच्या शुद्धप्रेमसंस्कारांत वाढलेल्या मुलांना तेंच प्रेमाचें वळण लागून असेंच प्रेमसुख भोगण्याची अस्पष्ट कल्पना त्यांच्याही मनांत प्रादुर्भूत होते—हे सर्व लाभ बालविवाहापासून होतात व व्यक्तीच्या किंवा समाजाच्या कल्याणाच्या दृष्टीनें बालविवाहापेक्षां अधिक सुखदायक विवाहपद्धत दुसरी कोणतीच नाहीं असें म्हणावें लागतें."प्रौढविवाह, प्रीतिविवाह, पुनर्विवाह, पुनर्विवाहानंतरचे पुनर्विवाह,काडीमोड इत्यादि प्रकारच्या वातावरणांत जन्मलेल्या आंग्लविदुषीचे हे पोक्त विचार पाहून तरी सुधारकांनीं शुद्धीवर यावें आणि नसते चाळे आपल्या शुद्ध व प्रेमबद्ध समाजांत रूढ करून समाजाचे अहितकर्ते होऊं नये अशी आमची विनंति आहे. सीतारामांचा विवाह बालपणींच झाला होता. रामचंद्राच्या तोंडीं भवभूतीनें उद्गार घातला आहे:—

**आविवाहसमयात गृहे वने शैशवे तदनु यौवने पुनः।**
**स्वापहेतुरनुपाश्रितोऽन्यया रामबाहुरुपधानमेष ते ॥ १ ॥**

१. पूर्णपणें एकजीव होऊन शुद्ध प्रेमांत विलीन होऊन जाण्याचें

अनुपम सुख बालविवाहाशिवाय अन्यत्र कोठेंही आढळणार नाहीं. प्रौढविवाहांत कामशांतीचा प्रधान हेतु प्रथमपासूनच प्रकट दिसतो, व विवाह होण्यापूर्वी प्रौढ वधूवरांचीं मनें चंचल होऊन इतस्ततः भटकून आल्यानें तितकीं निर्विकार व शुद्ध राहूं शकत नाहींत. आमच्या विवाहविधीचा हेतु पतिपत्नींनीं एकजीव होऊन धर्मकार्य करावें व मोक्षरूप परम अर्थ संपादन करून उभयतांनीं एकमेकांच्या संगतीनें व साह्यानें उद्धरून जावें असाच आहे. पत्नीला 'धर्मपत्नी' अशी गौरवाची संज्ञा आहे. मोक्षाचें उच्चतम ध्येय डोळ्यांपुढें ठेवूनच आपलें धर्मशास्त्र निर्माण झालें आहे. आपल्या सर्व समाजसंस्थांच्या मुळाशीं मोक्ष हा अत्युदात्त हेतु आहे. आपलें हिंदुराष्ट्र फार प्राचीन, मोठ्या अनुभवानें शहाणें झालेलें असल्यामुळें दूरवर पोंच विचार करूनच विवाहादि संस्था त्यांनीं पायाशुद्ध निर्माण केल्या आहेत. प्रौढवयांत कामांधतेनें वडिलांचा शहाणपणाचा सल्ला न घेतां मनास येईल त्या जातीच्या हव्या त्या स्त्रीशीं विवाह करावा, चार दोन वर्षांनीं पटत नाहीं म्हणून काडी मोडून दोघांनीं दोन दिशांनीं जावें व पुनः दुसरे विवाह करावे, असला हुच्चेपणा आपल्या धर्माला खपला नाहीं. म्हणून स्वतःचें, कुटुंबाचें, समाजाचें व राष्ट्राचें हित लक्षांत आणून पुढारी लोकांनीं शास्त्र प्रमाण करून वागावें, शास्त्रविधि सोडून वागल्यास 'न स सिद्धिमवाप्नोति न सुखं न परां गतिम्.' अशी स्थिति होते. ज्ञानोबाराय म्हणतात "म्हणोनि कामाचेनि बळें । जो विषय सेवूं पाहे सळे । तया विषय ना स्वर्ग मिळे । ना उद्धरे तो" ॥ ४·१४ ॥

४ 'मॉडर्न रिव्ह्यू' नामक कलकत्ता येथें प्रसिद्ध होणाऱ्या सुप्रसिद्ध मासिकाच्या जानेवारीच्या अंकांत ( १९१२ ) पंडित हरदयाळ यांनीं 'पाश्चात्य देशांतील स्त्रियांची स्थिति' या विषयावर एक वाचनीय लेख लिहिला आहे. आमच्या स्त्रियांची स्थिति शोकजनक आहे, त्यांना गुलामांसारखें वागविण्यांत येतें, त्यांची उन्नति होऊन पाश्चात्य स्त्रियांप्रमाणें त्यांना 'उच्च प्रतीचें' शिक्षण देण्यांत यावें म्हणून निरंतर आक्रोश करणाऱ्या अविचारी लेखकांस सदर लेख

आम्ही नजर करितों! युरोप व अमेरिका खंडांतून प्रवास करून, तेथील निरनिराळ्या स्थितींतील स्त्रियांची स्थिति समक्ष डोळ्यांनीं पाहून व अनेक स्त्रीपुरुषांशीं भाषणें करून व पक्का छडा लावून हा लेख हरदयाळ यांनीं लिहिला आहे. ते म्हणतातः " मिशनरी लोक व फाजिल अभिमानी इंग्रज व अमेरिकन आम्हांस सांगत असतात कीं, पाश्चात्य राष्ट्रांत स्त्रियांस मोठा मान देण्यांत येतो, त्यांना पुरुषांच्या बरोबरीनें वागविण्यांत येतें, त्या पुरुषवर्गांत मिसळून वागत असल्या-मुळें समाज उदार व शुद्ध बनला आहे, त्यांना तिकडे स्वातंत्र्य असून त्यांच्या शिक्षणाच्या सोयी आहेत, व त्या पौर्वात्य राष्ट्रांतील स्त्रियां-पेक्षां जास्त सुखी, जास्त हुषार, व जास्त उदार आहेत. हें म्हणणें ऐकायला गोड लागतें व उत्तेजक वाटतें, पण त्यांत एक कशामला दोष आहे तो हा कीं तें साफ खोटें आहे!! पाश्चात्य राष्ट्रांत स्त्रियांना मान व प्रेम पुरुषाकडून मिळतें ही नुसती बडबड असून हें साफ खोटें आहे. " असें म्हणून पंडितजींनीं तिकडील कनिष्ठ, मध्यम व उच्च वर्गांतील स्त्रियांची स्थिति किती भयंकर झाली आहे हें अनेक फ्रेंच, अमेरिकन व इंग्रज विद्वानांच्या अभिप्रायांसह व स्वतः च्या अनुभवाच्या गोष्टी सांगून सप्रमाण व जोरदार भाषेनें सिद्ध केलें आहे. अपवाद असतील पण ते विरळ आहेत असें सांगून सामान्य स्त्रीवर्गाची स्थिति किती दुःखाकष्टाची, अपमानाची, हालाची, व अत्यंत अनिष्ट आहे हें त्यांनीं चांगल्या रीतीनें दाखविलें आहे. हरद-याळ म्हणतातः " आमचे कांहीं भोळवट सुशिक्षित लोक पाश्चात्य स्त्रिया शाळांत व कॉलेजांत जातात, पियानो वाजवितात, नवीन नवीन बुकें वाचतात—एवढेंच पाहून हुरळून जातात व पाश्चात्य स्त्रियांची स्थिति उन्नत झाली आहे—व तशीच आमच्या स्त्रियांची झाली पाहिजे—असें समजून नाचूं लागतात! पण ही भूल आहे. त्यांच्या समाजस्थितीचा पूर्ण विचार केल्यास भय वाटेल. स्त्रियांच्या पोटापाण्याची तरतूद झाली पाहिजे, ती त्यांना चांगला वर मिळाल्या-नेंच होत असते. हिंदुस्थानांत ह्या प्रश्नाचा मुलींचे आईबापच विचार

करितात; पण पाश्चात्य राष्ट्रांत जिचा तिलाच विचार करावा लागत असल्यामुळें तिकडील तरुणींची स्थिति फार वाईट झाली आहे. आमच्या इकडे मुलींचे आईबाप मुलींसाठीं नवरे शोधतात व मुलींना सुस्थित झालेलें पाहण्याचें आपलें कर्तव्य करितात. तसा प्रकार तिकडे नाहीं. तरुण मुलींना स्वतःच नवरे धुंडावे लागतात! त्यासाठीं त्यांना गाणें, नाचणें, पियानो वाजविणें, वाचणें, लिहिणें, अधिक मोहक व चित्ताकर्षक दिसण्याची कला इत्यादि गुण संपादावे लागतात!! तरुण वयांत अविचाराचें प्राबल्य स्वाभाविकपणें फार असतें. आपल्या मुलीच्या कल्याणाकडे लक्ष देऊन आमच्याकडे अनुभवी व पोक्त आईबाप योग्य वराची योजना करितात. पण आमच्या सुधारकांना ही पद्धत पसंत नसून पाश्चात्यांची प्रेमविवाहाची रीत इकडे सुरू व्हावी म्हणून मनस्वी घाई झाली आहे!! तारुण्यांत मुलीनें स्वतः वर पसंत केला म्हणजे त्यांत प्रेम उत्पन्न होतें, एरवीं होत नाहीं, असा या परप्रत्ययनेयबुद्धि सुधारकांचा कोटिक्रम आहे. पण तुह्मांआह्मां सर्वांचे विवाह वडील मनुष्यांनीं शोधून काढलेल्या वधूंशीं होत असून आपलें संसारसुख त्यांच्यापेक्षां किती तरी श्रेष्ठप्रतीचें आहे. नवरा धुंडण्याचे आयास तिकडे तरुणींना किती पडतात, कित्येकींना नवरे मिळत नाहींत, कांहींना मिळाले तरी त्यांचें पटत नाहीं म्हणून मग काडीमोडीचे प्रसंग येतात, तरुणींची वर्कहाऊसमध्यें कोण त्रेधा उडते, कांहींना पैशाची लालूच दाखवून नवरे हुडकावे लागतात इ० प्रकारांनीं स्त्रियांना कोण त्रास सोसावा लागतो याचें सुंदर व सप्रमाण वर्णन हरदयाळ यांनीं केलें आहे. त्यांच्या लेखाचें तात्पर्य त्यांनीं पुढील वाक्यांत दिलें आहे. "Every girl to find out her own husband: an overstocked market; wearisome search: debasing self-humiliation: worry and anxiety; delay in motherhood: and finally failure for many women even after these trials and ordeals!" आपलें तारुण्य व सौंदर्य कायम रहावें यासाठीं तिकडे स्त्रियांची फार धडपड असते व फार मुलें होऊं नयेत व कुटुंबविस्तार होऊं नये अशीही अस्वाभाविक इच्छा त्या करितात! त्याचा परिणाम

या वर्गांत 'nervous disorders' ची भयंकर वाढ झाली आहे. मुलींचीं लग्नें उशिरां झालीं तर ऐन तारुण्याच्या भरांत त्यांच्या प्रकृतीवर भलतेच परिणाम होतात. त्यांची पतिविषयक उत्कंठा वाढते, मानसिक व्यथा सुरू होते, चिंता वाढते, व स्थिरबुद्धि चल पावते. फॅक्टरींत व वर्कहॉउसमध्यें काम करणाऱ्या कामकरी स्त्रियांची दशा तर पुसूंच नका. ती वाणीनें न उच्चारावी हेंच बरें. अतिशय काम करण्याच्या दगदगीनें बायांना पोरें पाजायलाही फुरसत मिळत नाहीं, याचा परिणाम भयप्रद झाला आहे. मरेपर्यंत काम करून रोजीं दोन आणेही न मिळणाऱ्या अशा ६० लक्ष स्त्रिया एकट्या अमेरिकेंत आहेत ! हजारों स्त्रियांना नवरे न मिळाल्यामुळें पोटाची खांच भरण्यासाठीं 'कारकून, मास्तरीण, ड्रेसमेकर, टायपिस्ट, गायनशिक्षक इत्यादि नोकऱ्या पतकराव्या लागतात !' पोस्ट ऑफिसांत तर हजारों बाया क्लार्कचें काम करीत आहेत त्या पाहून तर पोस्टखातें म्हणजे 'a particularly feminine Institution' आहे असें वाटण्याची पाळी आली आहे ! ! ज्या स्त्रियांनीं नवऱ्याच्या व मुलाबाळांच्या संगतींत प्रेमानें संसारसुख भोगावें त्यांच्यावर केवळ पोटासाठीं अशीं कामें करायची वेळ आली आहे ! नवराबायकोंचीं जोडपीं मुलाबाळांना घेऊन जातांना पाहून कित्येक स्त्रियांचीं तोंडें दुःखानें गोरींमोरीं होऊन जातात, व 'देवा ! हें सुख आमच्या कपाळीं नाहींना' असें म्हणून दुःखाश्रु गाळतांना त्या दिसतात ! ! इंग्लंडमध्यें नुकत्याच भरलेल्या 'रॉयल कमिशन ऑफ डायव्होर्स'नें स्पष्ट म्हटलें आहे कीं पुष्कळ स्त्रियांना मुलेंच होऊं नयेत असें वाटतें ! "This is civilised Europe which kills out the maternal instinct by luxury among the rich and want among the poor !"

५. वरील लेखाचा पाश्चात्यांच्या संस्था व रीति यांची अहोरात्र स्तुति करून त्यांची नक्कल आमच्या समाजांत करूं पाहणाऱ्या उतावळ्या सुधारकांनीं अवश्य विचार करावा. सामाजिक परिषदेच्या अध्यक्षापासून तों एखाद्या फाटक्या सुधारकापर्यंत सर्वांना 'हिंदु स्त्रियांच्या अवनती'

चें महद्दुःख होतें व त्याला उपाय म्हणजे पाश्चात्यांचें हरएक बाबतींत अनुकरण करणें हाच होय असें वाटतें. त्यांनीं पाश्चात्यांची समाजरचना तरी सर्वांशीं निर्दोष व अनुकरणीय आहे कीं काय याचा संथपणानें आधीं विचार करावा. पाश्चात्य समाजांत गुण नाहींत व आमच्यांत दोष नाहींत असें आमचें म्हणणें नाहीं, पण ' कीलोत्पाटीव वानरः' या न्यायानें आपल्या समाजरचनेला पायासगट उखळून काढण्याचा आत्मघातकी प्रयत्न करूं नका एवढेंच आमचें म्हणणें आहे. प्रौढविवाहाचे व लव्हमॅरेजचे दोष लक्षांत आणून बालविवाहाच्या पद्धतींत सुधारणा करा. बालविवाहांतही अनेक गुण आहेत. रजोदर्शनापूर्वीं मुलीचें लग्न व्हावें, मुलीच्या आईबापांनीं वरयोजना करावी, व वीस वर्षांच्या सुमारास मुलाचें लग्न व्हावें, त्याला प्रत्यक्ष स्त्रीसंगाची गरज २४ व्या वर्षीं लागत असली तरी तत्पूर्वीं ४ वर्षें विवाहित स्त्रीची मूर्ति स्वगृहीं डोळ्यांपुढून खेळत असली कीं, " मनो निष्ठाशून्यं भ्रमति च किमप्यालिखति च" अशी त्याची स्थिति होत नाहीं. इकडे शाळाकॉलेजांतून मुलांना व मुलींना नाटकेंकादंबऱ्या शिकवावयाच्या आणि तिकडे विवाहकालमर्यादा वाढवावयाची ही गोष्ट परिणामीं अपायकारक होईल. प्रौढविवाहाच्या आणि प्रीतिविवाहाच्या गोष्टी ज कादंबरीकार नित्यशः तरुणांच्या पुढें मांडीत आहेत ते समाजाची हानी करीत आहेत असें आम्हांस वाटतें. बालविवाहाचीं हजारों कुटुंबें उत्तम प्रकारचें संसारसुख भोगीत आहेत ही गोष्ट विसरून जाणें चांगलें नाही.

६. मुलींचें रजोदर्शनापूर्वीं लग्न न झाल्यास त्यांचे पितर नरकांत जातात, याबद्दल सर्व धर्मशास्त्रकारांची एकवाक्यता आहे असें वर म्हटलें आहे. हिंदुधर्मशास्त्राप्रमाणें आपल्या मुलींचीं लग्नें व्हावींत, असें ज्या आईबापांस वाटत असेल, त्यांनीं रजोदर्शनाची मर्यादा संभाळून तत्पूर्वीं त्यांचीं लग्नें केलीं पाहिजेत हें ओघानेंच येतें. ज्यांस स्वेच्छेनें वागावयाचें आहे, म्हणजे ज्यांना धर्मशास्त्राची चाड नाहीं, त्यांचा हात सांप्रतच्या परिस्थितींत कोणी धरूं शकत नाहीं, हें उघड आहे. वरील

वाक्यावर एका टीकाकारानें शंका काढली आहे कीं, तर मग ‘ जनाबाई व मुक्ताबाई यांचे पितरांना कोणती गति मिळाली ? ’ ह्यावर समाधान आहे, तें असें:—धर्मशास्त्राचे नियम समाजाच्या कल्याणासाठीं व सुव्यवस्थेसाठीं शास्त्रकारांनीं घालून दिले आहेत. त्यांनीं व्यवहार व धर्म यांची बरोबर सांगड घातली आहे. ते नियम सर्वांनींच पाळावयाला हवेत, पण कांहीं असामान्य व अपवादभूत विभूति निर्माण झाल्या, तर त्यांच्या बाबतींत मात्र समाज जरा ढिलाई पत्करतो. समाजांत तारतम्यभाव असतो. क्वचित् अशा विभूतींची किंमत लवकर न कळल्यामुळें त्या विभूतीला थोडाफार छळही सोसावा लागतो; पण त्याबद्दल ती समाजाला नांवेंही ठेवीत नाहीं. मिराबाई, जनाबाई, मुक्ताबाई ह्या अपवादभूत विभूति होत, त्यांच्या बाबतींत समाज सढळपणा करितो. नियम सर्वसामान्य लोकांसाठीं असतात व सर्वसामान्य लोकांनीं ते पाळलेच पाहिजेत. मिराबाईसारख्यांचे अपवाद सामान्य नियमांचीच सिद्धि करतात. मिराबाईचा लोकांनीं व तिच्या बापानें पुष्कळ छळ केला. ही मुलगी कुलाला डाग लावणारी आहे असें वाटून बापानें तिला विषही पाजलें, पण तिची श्रीकृष्णभक्ति लोकोत्तर असल्यामुळें तिला विष बाधलें नाहीं. मिराबाईनें विषाचा प्याला हांसत घेतला व ‘ विषमप्यमृतं क्वचिद्भवेदमृतं वा विषमीश्वरेच्छया ’ या कालिदासोक्तीप्रमाणें ‘ विष तें अमृत आघात ते हित ’ शुद्धचित्त स्त्रीपुरुषांच्या पुण्यचरित्रानें होत असल्यामुळें त्या विषाचा मिराबाईवर दुष्ट परिणाम झाला नाहीं. मिराबाईसारखेच श्रीज्ञानेश्वरमहाराजांची बहीण मुक्ताबाई व श्रीनामदेवरायांची दासी जनाबाई यांची योग्यता आहे. ह्या स्त्रिया पूर्ण ब्रह्मनिष्ठ व भगवद्भक्त होत्या. श्रीज्ञानेश्वर महाराजांनीं पैठणकर विद्वान् ब्राह्मणांसमोर रेड्याकडून वेद बोलविले, जड भिंत चालविली व अगदीं अल्पवयांत ज्ञानेश्वरीसारखा अनुपम ग्रंथ निर्माण केला, तेव्हांच हे विष्णूचे अवतार असून मुक्ताई ब्रह्मचित्कला आहे असें सर्वांच्या प्रत्ययास आल्यामुळें मुक्ताबाईचा छळ कोणी केला नाहीं. जनाबाईनींही अल्पवयांत पांडुरंगाला प्रत्यक्ष पुढें

उभा केला व तो भक्तवत्सल देव तिच्या प्रेमळ स्तुतीला भुलून तिला दळावयाला लागला. महाराष्ट्रांत तो संतांचा काळ असल्यामुळें व सर्व जातींत संत निर्माण होऊन ते पंढरीच्या ' युनिव्हर्सिटी ' हॉलांत जमत असल्यामुळें तेथें मुक्ताजनाबाईंची योग्यता सर्वांस आढळून चुकल्यामुळें त्यांचा कोणीं छळ केला नाहीं. असो. मुक्ताबाई व जनाबाई ह्या निस्सीम कृष्णभक्त होत्या; देहाची शुद्धि त्यांना कोठें होती ? अखंड विठ्ठलभजनांत त्या रंगलेल्या होत्या. भगवत्प्रेमाचा रंग स्वतः लुटून जगाला तो लुटावयाला लावणाऱ्या ह्या भगवद्विभूतींना—गुणत्रयाच्या, अवस्थात्रयाच्या पार गेलेल्या ह्या महंतांना—जन्म देणारे आईबाप वैकुंठांत भगवत्सन्निधान पावले होते, हें काय सांगावयाला पाहिजे ? विधिनिषेधाच्या पलीकडे गेलेल्यांना आपण सामान्य लोकांसाठीं केलेले धर्मशास्त्रांचे नियम बांधू शकत नाहींत हें सकलसुजन संमत आहे.

७ बालविवाहांत दोष नाहींत असें नाहीं व प्रौढ प्रीतिविवाहांत गुण नाहींत असेंही नाहीं. कोणतीही समाजसंस्था असली, तरी तिच्यांत कांहीं दोष व कांहीं गुण असतातच. ' सर्वारंभा हि दोषेण धूमेनाग्निरिवावृताः ' असा सिद्धांतच आहे. तारतम्य पहावयाचें आहे. बालविवाह म्हणजे पाळण्यांतले विवाह असे आम्ही म्हणत नाहीं. मुलीला मुलाची व मुलाला मुलीची शारीरदृष्ट्या कामभोगार्थ सृष्टिक्रमानुसार जी सहज वासना उत्पन्न होते तत्पूर्वीं चारदोन वर्षें मुलें व मुली विवाहानें बद्ध झालेलीं असलीं, म्हणजे मन सतरा पुरुषांवरून किंवा स्त्रियांवरून फिरून येऊन अशुद्ध होण्याचा जो संभव असतो, तो यांत राहत नाहीं. संस्कारशुद्धि उत्तम प्रजानिर्माणास अत्यंत अवश्य आहे. बालविवाहानें प्रजा अशक्त होते, हें म्हणणें सर्वस्वीं खरें मानतां येत नाहीं. शिवाजी-बाजीसारखे शेंकडों वीर पुरुष बालविवाहाचीच प्रजा आहे. मीं वऱ्हाडप्रांतीं एक शतायु पुरुष पाहिला. मीं पाहिला तेव्हां तो शंभरांला सहा महिने कमी इतका होता. त्याचें लग्न त्याच्या वयाच्या दहाव्या वर्षीं झालें होतें, व तेव्हां त्याची बायको सहा वर्षांची होती. त्याच्या बापाचें

लग्न तर सातव्या वर्षीं झालें होतें ! पण मीं पाहिलेला शतायु पुरुष चांगला कणखर होता. सांप्रतची शिक्षणपद्धति, नाटककादंबऱ्यांचा सुकाळ, वाढत असलेल्या चैनी, खाण्यापिण्याचे व कपड्यालत्त्यांचे फाजील चोंचले, धर्मवृत्तींचा ऱ्हास, मुख्यतः अनिवार वाढत चाललेलें दारिद्र्य, दुधातुपाचा तुटवडा हीं आपल्या लोकांच्या ऱ्हासाचीं खरोखरचीं कारणें असून त्याला आळा न घालतां आमच्या समाजसंस्थांच्या नांवानें खडे फोडीत राहणें ही सुधारक म्हणविणारांच्या हातून मोठी चूक होत आहे. देशकालवर्तमानाप्रमाणें पूर्वपरंपरा व धर्मविधि न सोडतां थोडथोडी सुधारणा करणें अवश्य ती करावी. चहा, नाटकें, विड्या, दारू, धर्मलंडपणा व आहारविहारांत प्रत्यहीं वाढत जाणारे शेंकडों प्रकारचे चोंचले व मुख्यतः दारिद्र्य यांनीं आमच्या समाजाची जी भयप्रद हानि केली आहे, तिच्या सहस्रांशानेंही आमच्या चालीरीतींनीं केलेली नाहीं. तारतम्यानें पाहतां-आपल्या समाजाच्या दृष्टीनें तरी-प्रौढप्रणयविवाहपद्धतीपेक्षां बालविवाहच अधिक इष्ट आहे. हिंदु मुलींचा विवाह बाराव्या वर्षी व मुलांचा विवाह विसाव्या वर्षी होऊन तीं उभयतां चार दोन वर्षें वडिलांच्या देखरेखीखालीं नांदून संसाराशिक्षण संपादतात व त्यांत नित्य संगतीनें एक प्रकारचें प्रेम हळू हळू उत्पन्न होत जाऊन तिच्या वयाच्या सोळाव्या वर्षीं व त्याच्या २४ व्या वर्षीं संभोगक्षम होतात. वडिलांचे मुलांविषयींचें प्रेम, त्यांचीं कर्तव्य निष्ठा, कुलसमुन्नतीची त्यांची स्वभाविक आवड, त्यांचा अनुभव व पोक्तपणा यांचा आयताच फायदा आपल्या पद्धतीप्रमाणें मुलांमुलींस मिळत असतो. क्वचित् आईबाप आपल्या अधिकाराचा दुरुपयोग करितात हें खरें, पण ' गांव तेथें महारवाडा ' या न्यायानें या तत्वास कांहीं बाध येतो असें आम्हांस वाटत नाहीं.

प्रौढविवाहाची पद्धत आमच्या समाजांत रूढ झाल्यास तिच्यापासून अनिष्ट परिणाम होण्याची भीति—नव्हे खात्री आहे. दयाराम गिडुमल व उर्मिला यांच्या विवाहाची हकीगत वर्तमानपत्रांतून मागेंच प्रसिद्ध झाली असून सदर विवाहाचा सर्वांनींच निषेध केला

आहे. दयाराम व उर्मिला हे सेवासदनांत 'स्त्रियांच्या उन्नत्यर्थ' एकत्र काम करीत असत ! प्रौढविवाह, स्त्रीपुरुषांचें एकत्र अनियंत्रित वागणें, फाजील स्वातंत्र्य, शिक्षणाचा प्रसार ह्या भ्रामक नांवाखालीं नाटकें, कादंबऱ्या वाचण्याची सवकत इत्यादि अनेक गोष्टी पाश्चात्य समाजांत रूढ असल्या व त्यांना मानवत असल्या तरी सुद्धां त्या हिंदु-समाजांत रूढ झाल्यास आमच्या समाजाची सर्वस्वीं हानि झाल्याशि-वाय राहणार नाहीं. मुलांमुलांना एकत्र शिकविणें व तीं प्रौढवयांत आलीं असलीं तरी एकत्र वावरूं देणें हें अनिष्ट आहे स्त्रीशिक्षण नको असें नाहीं. मुलींना घरीं आईबापांनीं व भावांनीं शिकवावें. योग्य वयांत ह्म० रजोदर्शनापूर्वी लग्न करून त्यांना पतिगृहीं पाठवावें, तेथें पतीनें स्वतः शिकवावें. शाळेंतून पाठविणें झाल्यास स्त्रीशिक्षकांशिवाय त्यांना सहसा पुरुषशिक्षकांच्या ताब्यांत देऊं नये. घरीं पांडवप्रताप, रामविजय, नाथभागवत, दासबोध, रामायण, भारत इत्यादि ग्रंथ वाचूं द्यावें, या गोष्टींना कोणी नाहीं म्हणणार नाहीं. पण स्त्रीशिक्षणाच्या निमित्तानें मुलांची वयें बेसुमार वाढविणें व पुरुषसमाजांत त्यांना स्वेच्छ संसार करूं देणें ह्या गोष्टीपासून समाजांत अनीति पसरण्याचा फार संभव आहे. स्त्रीपुरुषभेद ज्यांच्या चित्तांतून कायमचा नाहींसा झाला आहे अशाच पुरुषांस स्त्रियांना शिक्षण किंवा उपदेश देण्याचा अधिकार आहे, इतरांना नाहीं असें स्पष्ट अनुशासन हिंदुशास्त्रकारांनीं घालून दिलें आहे. सुधारणेच्या निमित्तानें समाजांत स्वेच्छाचार बोकळूं नये, व शास्त्रपद्धतीनें चाललेल्या आपल्या समाजांत गोंधळ माजूं नये व समाजाची शुद्ध घडी विसकटूं नये या हेतूनेंच आम्हीं हा लेख लिहिला आहे. जनाबाईमुक्ताबाईंचें पवित्र उदाहरण देऊन सध्याच्या शाळेंत जाणाऱ्या मुलींचें विवाहाचें वयोमान वाढविणें व त्यांस पुरु-षांत यथेच्छ वावरूं देणें अप्रयोजकपणाचें आहे.

---

# ३५ बोध आणि विनोद.

## १ श्रीरामप्रार्थना.

१ श्रीरामा ! तुमच्या कृपेची पाखर आम्हां अनाथांवर घाला. तुम्हीं साक्षात् दर्शन देऊन आपल्या दयेचा शेला आमच्या अंगावर घाला. तुमची कृपा हीच आमची खरी जननी आहे. तुमची कृपा संपादन न करितां आम्हीं पुष्कळ धनदौलत मिळविली, प्रतिष्ठा मिळविली, मुलाबाळांचा संसार केला, विषयसुख भोगिलें तरी तें सर्व व्यर्थ आहे. कारण हें सर्व येथल्यायेथेंच राहणार आहे. मायिक सुखाच्या नादीं लागून आम्हीं आजवर फसलों, बुडालों तेवढे पुरे झालें. संसाराच्या लाथा व कामक्रोधलोभांचे रट्टे खातां खातां बेजार झालों. आतां आपली माया आवरा. डोळ्यांवरची झांपड काढा. रजोगुणाचे रजःकण डोळ्यांत घुसून आम्हीं आंधळे झालों आहोंत तो रजोगुण उडवा—नेत्र निर्मळ करा, राजस—तामस विचारांची डोळ्यांवरची झांपड दूर करा व तुमचें रूप दाखवा.

२. कळणें पुरे झालें, आतां वळणें शिकवा. हा मायिक पसारा दूर करून अमायिक, शुद्ध, निरंजन असें श्रीहरिस्वरूपाचें चिंतन करणें हा आमचा मुख्य धर्म आहे हें कळलें, पण वळत नाहीं. ‘ मुख्य धर्म देव चित्तीं । आदि अवसानीं अंतीं ॥ ’ हा साधुबोध नित्य कानांत घुमतो, पण विषयेंद्रियांची बसलेली मिठी सुटत नाहीं. ‘ वाचा वदे परी करणें कठीण । इंद्रियाआधीन जालों देवा ॥ ’ वाचेनें, लेखणीनें नित्य परमार्थाचीच चर्चा करितों, पण अणुभर ठरत नाहीं. बोलणें पाटीभर व करणें चिमुटभर, असें आमचें खरें स्वरूप आहे. खरें ब्रह्मज्ञान रजभर, वालभर, तरी द्या. कळतें पण वळत नाहीं, वळवा. अहो गोपाळा, आमच्या इंद्रियांचें विधिमर्यादेत तरी पाळण करा. अहो गोविंदा, आमच्या इंद्रियांचें आकलन करा. हीं गुरें अनावर आहेत,

आपण गोरक्षक आहांत, आपल्या राखोटींत ठेवा ! निषिद्ध इंद्रियांसमोर ठरूं नये अशी इंद्रियशुद्धि करा. मन, बुद्धि, हात, पाय, तोंड, कान हीं सर्व तुमच्या निर्मल यशानें रंगवा. तुमच्या गुणगानांत हीं तन्मय करा. तुमचीं वेडीं झालेली तुमचींच रूपहीं जे संत त्यांचा तरी संग द्या, त्यांच्या तरी स्वाधीन करा, त्यांच्या सेवेंत राबवा. अहो कृष्णा ! आमच्या मनोवृत्तींचे सर्व ओघ आपण आपल्याकडे आकर्षून आपलें कृष्ण हें नांव सार्थ करा. दयाप्रेम द्या.

---

## २ राष्ट्राचें मंगल.

**सर्वेऽत्र सुखिनः सन्तु सर्वे सन्तु निरामयाः ।**
**सर्वे भद्राणि पश्यन्तु मा कश्चिद्दुःखमाप्नुयात् ॥ १ ॥**

( १ ) श्रीपांडुरंगांच्या कृपेनें ' मुमुक्षू ' स आज आठवें वर्ष पुरें होऊन नववें वर्ष लागत आहे. ह्या मंगलसमयीं लेखक–वाचकांच्या तर्फेनें ' सर्व सुखी असोत, सर्व निरामय असोत, सर्वांचें कल्याण असो, कोणासही दुःख प्राप्त न होवो ' अशी त्या सुखमय, निरामय, मंगलरूप व आनंदरूप श्रीविठ्ठलाची आम्ही प्रार्थना करतों.

( २ ) ह्या आमच्या परमप्रिय भरतभूमीच्या सत्पुत्रांचा सर्वत्र जयजयकार असो. दैवी संपत्तीच्या गुणांचा भरतखंडांत व सर्व पृथ्वीवर विकास होवो. दंभदर्पादि आसुरी भाव लुप्त होऊन जावोत. वेदधर्माचा जयजयकार असो. वर्णाश्रमधर्माचें मालिन्य जाऊन त्यांत दैवी संपत्तीचें तेज विलसो. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र, ह्या सर्वांना आपापल्या धर्माप्रमाणें वागण्याची बुद्धि होवो. वेदशास्त्रपुराणसंतोक्त हिंदुधर्माचा त्रिभुवनांत जयजयकार असो.

( ३ ) परमात्म्याचें मनोगत जाणणारे व त्याचे संकल्पानुरूप जनतेच्या उद्धारार्थ झटणारे साधुसंत आम्हांकडे कृपादृष्टीनें अवलोकन करोत. संत हे सकल समाजाचे आधारस्तंभ आहेत, धर्माचे व नीतिचे गोप्ते आहेत, मनुष्यस्वभावांतील पशुधर्म व मानवधर्म यांना कह्यांत

ठेवून देवधर्माचा विकास करणारे ते सूर्य आहेत. त्यांचा आमच्या सर्व शुभकृत्यांवर आशीर्वाद असो.

( ४ ) ते आम्हांला आमच्या इहपर हिताचा मार्ग दाखवोत. आमचे लोक ज्या धार्मिक, राजकीय, सामाजिक, वाङ्मयात्मक, औद्योगिक वगैरे चळवळी करितात त्यांत ते सदयतेनें आपलें दिव्यतेज ओतून त्यांना सात्विकपणाचें वळण लावोत. आपसांतील वैरभाव, वक्रता, हेवादेवा इत्यादि कुभावांचा नायनाट करून ते सर्वांत ऐक्यभावाचें प्रेम उत्पन्न करोत. संत आणि भगवंत एकरूप असल्यामुळें संतांचें भगवत्कार्य करणारे अवतार ह्या भुलोकावर होवोत.

( ५ ) आमच्यापैकीं जे धर्मकार्यांत गुंतले असतील त्यांचीं धर्मकृत्यें सफल होण्यासारखी निष्ठा त्यांना मिळो. राजकारणी पुरुषांना, समाजसुधारकांना, सरस्वतीभक्तांना, सर्वांना धर्माचें महत्व समजो व सर्वजण धर्मप्रीतीच्या एकमय तंतूंत आपापले उद्योग करोत. स्वधर्मसूर्याचा उदय होवो. निष्कामकार्यकर्त्यांचा विजय होवो. धर्मसंपदायांना संजीवन मिळो. अहिंसेचा विजय होवो. प्राण्यांचें परस्परांवर प्रेम वाढो. ' शांतिःपुष्टिस्तुष्टिश्चास्तु शुभं भवतु.'

---

## ३ आहे आहे नाहीं नाहीं !

अमृतराय उर्फ रायजी महाराजांचें पुढील पद मननसुखार्थ खालीं दिलें आहेः—

होतां सद्गुरुवरदान प्राप्त झालें ब्रह्मज्ञान ।
तेथें संसाराचें भान आहे आहे नाहीं नाहीं ॥ १ ॥
सेवितां श्रीगुरुकूळ ब्रह्म त्रैलोक्य गोकूळ ।
दारा पुत्र अनुकूळ आहे आहे नाहीं नाहीं ॥ २ ॥
पोट मात्र भरायास न करी कोठेंही सायास ।
तुटकें खेटर पायास आहे आहे नाहीं नाहीं ॥ ३ ॥
होतां अंतरीं निष्काम मुखीं आलें रामनाम ।
तेथें मृदंगाचें काम आहे आहे नाहीं नाहीं ॥ ४ ॥
साचा अमृत परमार्थ न करी कोणासी वादार्थ ।
घरीं लागला पदार्थ आहे आहे नाहीं नाहीं ॥ ५ ॥

---

## ४ श्रीसरस्वतिप्रार्थना.

विद्या, कला, ज्ञान, स्फूर्ति, काव्य यांची अधिष्ठात्री देवता सरस्वति ही होय. अध्यात्मशास्त्रांत हिलाच ब्रह्मविद्या म्हणतात. वेदांती हिला माया म्हणतात. वैष्णव प्रकृति म्हणतात, व तंत्रांत हिला विद्या म्हटलें आहे. पुराणांत हिला अनेक नांवें आहेत, त्यांपैकींच सरस्वति हें एक आहे. विद्या, महाविद्या, लक्ष्मी, भद्रकाली, शारदा, वाग्देवी, वाणी हीं सर्व हिचींच नांवें आहेत. ख्रिस्ती लोकांच्या बायबलांत हिला Word असें म्हटलें आहे. आपण **वाणी** म्हणतों. ग्रीक तत्ववेत्यांनीं तिलाच Logos म्हटलें आहे. विश्वरूपा हें हिचेंच नांव आहे.

+ + +

तिच्या स्वरूपाचें ध्यान असें आहे:—

**तरुणशकलमिंदोर्बिभ्रती शुभ्रकांतिः**
**कुचभरनमितांगी सन्निषण्णा सिताब्जे ।**
**निजकरकमलोद्यल्लेखनी पुस्तकश्रीः**
**सकलविभवदात्री पातु वाग्देवता नः ॥**

**अर्थः**—जिच्या कपालावर बालेंदु विराजतो, जिचा वर्ण गौर आहे, जी कुचभरानें नमलेली आहे, जिनें आपल्या हातांत लिहिण्यास लेखणी व पुस्तकें धारण केलीं आहेत, सकल वैभव देण्यास जी समर्थ आहे, ती वाग्देवता आमचें रक्षण करो ! इंदु, कमल, गौरता वगैरे सर्व ज्ञानप्रकाशाचींच वाचक आहेत.

+ + +

**सरस्वत्यै नमोनित्यं भद्रकाल्यै नमो नमः ।**
**वेदवेदांगवेदांतस्थानेभ्य एवच स्वाहा ॥ २ ॥**

हीच उमा हैमवति होय. शिवपरमेश्वराची उमापार्वती हीच आहे. ही ब्रह्मविद्या ब्रह्माहून वेगळी नाहीं. 'वागर्थाविव संपृक्तौ' म्ह० वाचा व अर्थ ह्यांप्रमाणें ते अभिन्न आहेत.

**यथा न देवो भगवान् ब्रह्मा लोकपितामहः ।**
**त्वां परित्यज्य संतिष्ठेत् तथा भव वरप्रदा ॥ ३ ॥**

वेदाःशास्त्राणि सर्वाणि नृत्यगीतादिकं च यत्।
न विहीनं त्वया देवि ! तथा मे सन्तु सिद्धयः ॥ ४ ॥
सरस्वति महाभागे विद्ये कमललोचने ।
विश्वरूपे विशालाक्षि विद्यां देहि सरस्वति ॥ ५ ॥

समर्थांनीं महापुरुषांची माया, योग्यांची समाधि, परब्रह्मसूर्याची प्रभा, सत्रावी जीवनकळा, माया शारदा, अनंतमाया, वैष्णवी, ज्ञप्ति, सायुज्यता इत्यादि प्रकारें वर्णिलें आहे. " जें जें दृष्टीनें देखिलें । जें जें शब्दें ओळखिलें । जें जें मनास भासलें । तितकें रूप जयेचें ॥" तिला तदंशेच नमन असो.

———

## ५ जयन्त्या.

| | |
|---|---|
| १ मत्स्यजयन्ती—चैत्र शुद्ध ३. | २ कूर्मजयन्ती—वैशाख शुद्ध १५. |
| ३ वराहजयन्ती—भाद्रपद शुद्ध ३. | ४ नृसिंहजयन्ती—वैशाख शुद्ध १४. |
| ५ वामनजयन्ती—भाद्रपद शु. १२. | ६ परशुरामजयन्ती—वैशाख शु. ३. |
| ७ रामजयन्ती—चैत्र शु. ९. | ८ कृष्णजयन्ती—श्रावण कृष्ण ८. |
| ९ बुद्धजयन्ती—अश्विन शुद्ध १०. | १०—कल्किजयन्ती श्रावण शुद्ध ५. |

चैत्रांत मत्स्य व राम, वैशाखांत परशुराम, नृसिंह व कूर्म, श्रावणांत कल्कि व कृष्ण, भाद्रपदांत वराह व वामन आणि अश्विनांत बुद्ध याप्रमाणें दशावतारांच्या दहा जयन्त्या आहेत. हिंदुमात्राला राम व कृष्ण यांच्या जयन्त्या माहीत आहेतच; पण इतर जयन्त्याही निदान माहीत असणें तरी अवश्य आहे !

—:०:—

## ६ विचाररत्नें.

### १

सब जग छांडे हाथसे तो तुमकु न छांडे राम ।
न हि कछु कारन जगतमो तुमही सेती राम ॥ १ ॥

**अर्थ**—साऱ्या जगानें तुला हातचें सोडलें तरी तुला प्रभुराम सोडणार नाहीं ! तुला जगाशीं काय करावयाचें आहे ? तुझें आपलें ' राम राम ' हें नामस्मरण अखंड चालूं दे.

२

**जे तूं राखे साइया तो मारे न सके कोय ।**

**बाल न बंका कर सके जो जग वैरी होय ॥ २ ॥**

**अर्थ**—तूं जर स्वामी [ राम ] भक्तिबलानें स्वाधीन ठेवशील तर तुला कोणींही मारूं शकणार नाहीं. सारें जग वैरी झालें तरी तुझा केंस तें वांकडा करूं शकणार नाहीं. ( ध्रुवप्रऱ्हादादिकांचीं उदाहरणें पहा ) 'शरणागता राखे देव । येरां वाखे विघ्नांचे ' असें तुकाराम-महाराज सांगतात. " माझ्या दासा शीण व्हावा । मग त्याचा माझा दावा " हा समर्थांचा अभंग पहा.

३

**मुये मढेसे हेत क्यां जो जीवकू जाने नोहे ।**

**हेत हरीसे कीजिये रहे जो अंतरमाहे ॥ ३ ॥**

**अर्थ**–देह म्हणजे मेलेलें मढें. तो जीवालासुद्धां जाणत नाहीं त्याला घेऊन काय करावयाचें आहे ! अंतरांत राहणाऱ्या हरीला जाणून भजायचा हेतु चित्तांत धर. देहाचा विचार करूं नकोस, तो प्रारब्धाच्या स्वाधीन करून हरीचें चिंतन कर.

४

**रामनाम मणिदीप धरु जीह देहली दार ।**

**तुलसी भीतरबाहिरौ जो जाहसि उजियार ॥ ४ ॥**

**अर्थ**—तुळशीदास ( आपल्या रामायणांत) सांगतात कीं, बाबारे ! अंतर्बाह्य ज्ञानप्रकाश फांकावा अशी तुझी इच्छा असेल तर जीभ-रूपी उंबरठ्यावर रामनामाचा मणिदीप लावून ठेव. नामघोषांत जिव्हा रंगूं दे कीं आंत स्वरूपबोध होऊन हें विश्व तुला हरिरूप दिसेल.

---

## ७ तुकोबांचा धर्मनीतिबोध.

तुकोबांचा धर्मनीतीवर एक सुंदर अभंग आहे त्याची थोडीशी ओळख करून घेऊं.

१. ' तयासी धर्म घडेरे '. ज्याचे स्वाधीन भाजेबायका ज्याच्या

अधीन आहे पण जो बायकोच्या छंदानें-तंत्रानें नाचत नाहीं अर्थात् जो बाइल्या नाहीं त्याच्याच हातून धर्म घडतो.

२. ज्याला भीति व लज्जा नाहीं त्याच्या हातून **कर्म** नीट घडत.

३. परोपकारानें **पुण्य** जोडतें व परपीडा,परनिंदा यानें **पाप** जोडितें.

४. 'मुखीं देव उच्चारी' हा **लाभ** व 'प्रपंचासाठीं गुंते' ही **हानि**.

५. संतसमागमानें साम्य पावणें हें **सुख** व विषमभाव बाळगणें हें दुःख.

६. ज्याच्या स्वाधीन बुद्धि त्याला **साधन** घडतें व पराधीनाचा घात होतो.

७. जो जितेंद्रिय आहे तो **मान** पावतो व जो स्त्रीलोलुप आहे तो **अपमान** पावतो.

८. सार ग्रहण करणारा तो **जाणता** व वाद हेंच विद्येचें भूषण करणारा तो **नेणता**.

९. द्रव्य मिळवून जो पितरांना संतोष देतो, गयावर्जन व श्राद्धपक्षादि करतो तो **भला** व परदारासेवनांत व व्यसनांत द्रव्य वेंचतो तो **बुरा**.

१०. गाई ब अतिथि यांचा विभाग काढून जो साक्षिक भोजन करतो तो **सदाचारी** व ग्वाही नसतांच जो एकटाच इंद्रियसुखार्थ जेवतो तो **अनाचारी**.

११. 'ज्याणें भूतीं देव देखिला' त्यानें **स्वहित** केलें असें समजावें व जो अहंभावाचा दास होतो तो स्वतःचें **अनहित** करतो असें उमजावें.

१२. **धन्य** ते कीं जे हरीचे दास होतात व **धिक्** ते कीं जे विषयांचे दास होऊन आयुष्याचा नाश करितात.

१३. जो सिद्धांचीं–संतांचीं–लक्षणें जाणतो तो खरा **पारखी** व वरदळ गोष्टी जाणतो तो **बोंगळ** !

१४. ज्याच्या 'शरीरीं दृढ भक्ति' आहे, तो **बळी** म्ह० शूर

जाणावा व भाव न धरी ह्म. जो अभाविक, तर्कटी आहे तो **गांढ्या** म्हणावा.

१५. जो गुरुवचन चित्तांत धरून बसतो तो **खोल** व 'काय करूं' 'कसें करूं,' हा अष्टाक्षरी मंत्र जपत बसतो तो **उथळ.**

१६. जो देवाचे पायीं जीवभाव ठेवतो तो **उदार** व जो प्रपंच-उपाधींत अहर्निश झटतो तो **कृपण.**

१७. अंतरशुद्ध तो **चांगला** व जो अंतरीं मळिण तो **वागेळ.**

१८. विठ्ठलनाम **गोड** व संसार **कडू.**

हीं सद्गति व अधोगति ह्या दोहींचीं लक्षणें ध्यानांत घेऊन स्वहित आचरावें.

---

## ८ रस्किन व स्त्रीसमाज.

प्रख्यात इंग्रज ग्रंथकर्ता रस्किन यानें 'लिलीज् ऑफ क्वीन्स गार्डन' नामक ग्रंथांत स्त्रीवर्गासंबंधानें पुढील उद्गार काढले आहेत.

स्त्रीपुरुषांमध्यें कोणतें नातें आहे ह्यासंबंधानें तो म्हणतो:—" जें एकाजवळ आहे तें दुसऱ्याजवळ नाहीं; स्त्री व पुरुष एकमेकांना पूर्ण करतात. त्यांच्यांत कोणत्याही विवक्षित बाबतींत समता आहे असें कधींही म्हणतां यावयाचें नाहीं; खरें सौख्य व खरा विकास किंवा पूर्णावस्था हीं त्यांच्यांत " घे वाण दे वाण " हें नातें असण्यावरच अवलंबून आहे. "

रस्किनच्या मतें स्त्रियांना शिकण्यास अयोग्य असें एक शास्त्र आहे, व तें कोणतें म्हणाल तर ब्रह्मविद्या. या शास्त्राखेरीज मुलींचें मुलांच्या शिक्षणाप्रमाणेंच शिक्षण असावें, असें तो म्हणतो; म्हणजे रस्किनच्या मताप्रमाणें पाहतां हिंदुस्थानांतल्या प्राचीन ऋषिवर्यांनीं स्त्रियांनीं वेदाध्ययन करूं नये असा जो निर्बंध ठरविला आहे तो योग्यच आहे असें सिद्ध होतें.

" अर्वाचीन मासिकें व कादंबऱ्या ह्या आपल्या मुलींच्या हातांत देऊं नका, त्यांना एखाद्या निवडक उत्तम ग्रंथांच्या संग्रहालयांत एकटेंच

सोडून द्या, त्यांतून त्या चांगलें स्वतःच निवडून काढतील." हें रस्किनचें म्हणणें अबलोन्नति करूं पाहणाऱ्या सुशिक्षितांनीं लक्षांत ठेवलें पाहिजे.

"पुरुषाचें स्वतःच्या कुटुंबाविषयीं कर्तव्य म्हटलें म्हणजे त्याचें [ कुटुंबाचें ] पोषण करणें, त्याच्या उत्कर्षाविषयीं झटणें व त्याचें संरक्षण करणें हें होय; व गृहिणीचें कर्तव्य, त्याची व्यवस्था, त्याचें सुख व शोभा हीं संपादणें हें होय; व हींच कर्तव्यें विस्तृत केलीं म्हणजे पुरुषांचीं व स्त्रियांचीं स्वदेशाविषयक कर्तव्यें काय हें सहज समजेल. राष्ट्राचा एक घटक या नात्यानें पुरुषाचें कर्तव्य म्हटलें म्हणजे त्याचें पोषण, त्याची उन्नति व त्याचें रक्षण करण्यास मदत करणें हें होय. त्याचप्रमाणें स्त्रियांचें कर्तव्य स्वदेशांत व्यवस्था ( शांतता ) ठेवण्यांत, त्याचें सुख संपादण्यांत व त्यास सुंदर रीतीनें शोभित करण्यास मदत करणें हें होय" असें विवेचन करून आपल्या अधिकाराचा सदुपयोग करणाऱ्या स्त्रीनें कसें असावें याविषयीं तो म्हणतोः—"तिनें सहिष्णु व व पवित्र असावें. स्वभावतः सुज्ञ असावें; पण तें आत्मोन्नतीकरितां नव्हे तर आत्मत्यागाकरितां. आपल्या पतीपेक्षां आपण उच्च प्रतीचे आहोंत असें वाटण्याकरितां नव्हें, तर आपण त्याला केव्हांही सोडणार नाहीं अशी मनोभावना नेहमीं मनांत जागृत ठेवण्याकरितां, अविनीत व प्रेमरहित अशा गर्वानें संकुचित बुद्धि होण्याकरितां नव्हे, तर अनंत रीतीनें उपयुक्त व सौजन्ययुक्त होण्याकरितां."

---

## ९ सदहंकार.

**गुरुः**—माझ्यांत तुला अहंकार दिसतो काय ?

**शिष्यः**—होय, थोडासा दिसतो !

**गुरुः**—त्याचें स्वरूप काय ?

**शिष्यः**—तो आम्हां पामरांच्या उद्धारार्थच महाराजांनीं बाळगलेला दिसतो. [ १ ] देह रक्षण व्हावें म्हणून; [ २ ] भक्तिसुख घोटतां यावें म्हणून; [ ३ ] भक्तसमागमाचें सौख्य भोगतां यावें म्हणून

व [ ४ ] परोपकार करतां यावा म्हणून—ह्या चार कारणांसाठीं आपण अहंकार बाळगला आहे ! आतां केवळ उपकारापुरते उरले आहांत. हा अहंकार आपण देवाची प्रार्थना करून दयेनें आम्हांसाठीं जतन करून ठेवला आहे ! आपण खरोखरीं अहंकारातीत आहांत. नित्य समाधि हें आपलें स्वरूप आहे.

गुरुः—' अहं ' मीं ठेवला आहे असें नसून तो श्रीहरीनेंच ठेवला आहे.

---

## १० कांहीं प्रमुख संस्थानें.

काश्मीर संस्थानचें एकंदर क्षेत्र ८४४३२ चौरस मैल आहे. हैदराबाद ८२६९८, म्हैसूर २९४७५, बिकानेर २३३१५, ग्वाल्हेर २४३८४, जयपूर १५५७९, इंदूर ९००४, भोपाळ व एजन्सींतील इतर किरकोळ संस्थानें ९१५४, बडोदें ८१८२ चौरस मैल. याप्रमाणें निरनिराळ्या संस्थानांचें क्षेत्रफळ आहे. काश्मीर संस्थानचें क्षेत्र सर्वांत मोठें आहे तरी लोकसंख्येसंबंधांत त्याचा बराच खालीं नंबर आहे. तेथील लोकसंख्या ३१५८१२६ आहे. हैद्राबाद व म्हैसूर यांची लोकसंख्या याच्या अनुक्रमें चौपट व दुप्पट आहे. त्रावणकोर संस्थानची लोकसंख्या काश्मीरहून थोडी अधिक आहे व ग्वाल्हेरची काश्मीरहून थोडी कमी आहे. बडोद्याचें क्षेत्रफळ काश्मिरच्या दशांश आहे तरी तेथील लोकसंख्या काश्मीरच्या दोनतृतीयांश आहे.

---

## ११ पंजाबांतील दसरा.

पंजाबमधील व विशेषतः लाहोरमधील दसरा फारच प्रेक्षणीय असतो. दूरदूरचे लोक तो पाहण्याला येत असतात. दहा दिवस गल्लोगल्लीं नवरात्रांचे सार्वजनिक उत्सव चालू असतात. श्रीरामचंद्राच्या बाललीलांचे समारंभ मोठमोठ्या थाटानें मिरवीत नेत असतात. मोठमोठ्या गाड्यांवर माणसांना त्या त्या प्रसंगाचीं सोंगें देऊन बसविलेले असतात

व पाठीमागचा सीन त्या प्रसंगाला अनुरूप केलेला असतो. वनवासी रामाचा सीन दाखवावयाचा असतां गाडीवर झाडें, वेली वगैरे उभारून त्या कृत्रिम जंगलामध्यें सोंगें दिलेले राम, लक्ष्मण, सीता, उभ्या केलेल्या असतात. अशा प्रकारचे सर्व रामायणांतील सीन मोठमोठ्या गाड्यांवर करून वाजतगाजत सर्व शहरभर मिरवीत असतात. नाक्यानाक्यावर स्थानविशेष सुशोभित करून त्या ठिकाणीं विवक्षित राक्षसांच्या विशाल मूर्ति कागदाच्या बनविलेल्या असतात. मिरवणुकीमधील राम या स्थानीं येतो व त्यांना रात्रीच्या समयीं जाळतो.जाळल्याबरोबर आंतून नानाप्रकारें विचित्र दारूकाम सुरू होतें. चक्रें, बाण इत्यादि आंतून निघतात. विचित्र रंगाचे प्रकाश पडतात व अशा रीतीनें एकेक राक्षसाचा अंत होतो. शेवटीं दसऱ्याच्या दिवशीं गांवाबाहेरील विस्तीर्ण मैदानामध्यें पन्नास साठ फूट उंचीचे कागदाचे राक्षस दहाबारा बनविलेले असतात. बाजूला लंकेचा देखावा दाखविलेला असतो व या सर्वांमध्यें उत्तम प्रतीचें दारूकाम भरलेलें असतें. दुपारपासून मिरवीत निघालेली श्रीरामचंद्राची स्वारी संध्याकाळीं येथ येते.प्रथमतः इतस्ततः बाण सोडतात व दारूकामाचे बरेच आवाज काढतात. त्यायोगानें रामरावणांचें युद्ध दाखवितात व नंतर लंकानगरीला आग लागते व त्या भयानक देखाव्यामध्ये विविध प्रकारचें रमणीय दारूकाम सुरू होतें. नंतर एकाएकीं प्रचंड राक्षसास जाळण्यांत येतें; प्रत्येक राक्षसाच्या शरीरामध्यें दारूकामाच्या कारागिरीची कमाल केलेली असते. अशा प्रकारें सर्व राक्षस जाळल्यानंतर रामाची मिरवणूक पुनः शहरांत फिरते व दसऱ्याचा उत्सव संपतो.अशा तऱ्हेचा हा उत्सव महाराष्ट्रांत किंवा इतर हिंदी प्रांतांमध्यें नसतो. फार तर सीमोल्लंघन करून सोनें लुटण्याची पद्धत महाराष्ट्रांत आहे. त्यापेक्षां ह्या उत्सवामध्यें प्रबल वीरश्री आहे यांत शंका नाहीं. उत्सव पाहण्यासाठीं मैदानामध्यें लाख दोन लाख लोक जमत असतात. इतकें या उत्सवाचें महत्व तिकडे गणतात.

---

## १२. रासलीलावर्णन

**राधाकृष्णलीलेचें वर्णन** करणारें पुस्तक बिभत्स असून तें पिनलकोडाच्या २९२ कलमाखालीं येतें कीं नाहीं यासंबंधीं निकाल कलकत्ता हायकोर्टानें केला आहे. स्त्रीपुरुषांच्या मनावर अनीतिकारक व अशुद्ध संस्कार ज्यापासून उत्पन्न होईल तें वाङ्मय बीभत्स होय. राधाकृष्णाच्या लीलांसारखें वर्णन सामान्य स्त्रीपुरुषासंबंधानें केलें असेल तर तें पुस्तक पिनलकोडाचे कलमाखालीं येईल, पण हें लीलावर्णन मनुष्यप्राण्याहून श्रेष्ठ कोटींतल्या व्यक्तीसंबंधानें असले तर तो गुन्हा होत नाहीं; कारण या वर्णनानें अनीतिकारक संस्कार उत्पन्न होत नाहीं असें हायकोर्टानें ठरविलें आहे.

---

## १३. ग्रंथकर्त्यांची किफायत.

१ आपल्या देशांत लेखनकलेमध्यें गुंतलेल्या लोकांची व ग्रंथकारांची दैन्यावस्था पाहिली म्हणजे परदेशीं अशा लोकांची सांपत्तिक स्थिति कशी असेल, हें पहाण्याकडे साहजिकच मनाची प्रवृत्ति होते. त्याप्रमाणें इंग्लंडमध्यें ग्रंथकारास आपल्या एकेक ग्रंथाबद्दल किती किती किफायत झाली, हें आज संक्षेपतः पहावयाचें आम्हीं योजिलेले आहे.

सर वॉल्टर स्कॉट या कादंबरीकाराच्या उदयापूर्वीं इंग्लंडमध्यें कोणत्याही ग्रंथकारास मोठी रक्कम प्रकाशकांनीं कधींही दिली नव्हती. मिल्टनें आपलें Paradise Lost हें पुस्तक केवळ पांच पौंडाला विकलें. आजच्या किंमतीच्या मानानें तेव्हांच्या पांच पौंडांची आज पंधरा पौंड किंमत होईल. ( एक पौंड १५ रुपये ). त्या पुस्तकाच्या १३०० प्रती २० महिन्यांत खपल्या. स्मिथ आणि कंपनी या प्रकाशकांनीं थॅकरे व ब्रान्ट यांचे बहुतेक प्रसिद्ध ग्रंथ प्रसिद्ध केले; व ईलियटचाही एक ग्रंथ प्रसिद्ध केला. मिस ब्रॉन्टेला आपल्या एकेक ग्रंथाला ५००० पौंडांवरच प्राप्ति झाली ! ईलियट्च्या Romola या ग्रंथाबद्दल दहा हजार पौंड द्यावें याबद्दल वाटाघाट होऊन, शेवटीं तिला ७०००पौंडाला आपल्या पुस्तकाचा हक्क अडचणीमुळें विकून टाकणें भाग पडलें !

मिसेस हंफ्रेवार्ड ईस तिच्या कांहीं प्रसिद्ध ग्रंथांबद्दल मिळून १०,००० पौंड मिळाले आहेत. तसेंच कॉरोली व हॉब्बस यांनींही ग्रंथकर्तृत्वानें बरीच संपत्ति मिळविली !

२ याहून अलीकडच्या काळांतही ग्रंथकारांना विलायतेंत मोठाल्या रकमा मिळालेल्या आहेत. लॉर्ड रॉबर्टस् यांच्या Forty-one Years of a Soldier's Life या पुस्तकाबद्दल त्यांस म्याकमिलन आणि कंपनीनें १०,०००पौंड दिले ! तसेंच मि. जॉन मोर्ले यांस ग्लॅडस्टनच्या चरित्राबद्दल त्याच प्रकाशकमंडळींकडून १०,००० पौंड मिळालेले आहेत ! सर स्टॅन्ले यांस एका प्रकाशकाकडून त्यांच्या आफ्रिकेंतील प्रवासाच्या हकीकतीबद्दल एवढीच मोठी रक्कम मिळालेली आहे ! नान्सेन व हेडिल यांना उत्तरध्रुवाकडील हकीकतींच्या पुस्तकांबद्दलही अशीच मोठी रक्कम मिळालेली आहे !

३. हिंदुस्थानांतील अज्ञानी प्रजेस ऐकून आश्चर्य वाटेल कीं, **राजपुत्र रणजितसिंग** यांनीं लिहिलेल्या Jubilee Book of Cricket या अप्रतिम खेळाच्या पुस्तकाबद्दल त्यांस ६०००–७००० पौंड रोख मिळाले आहेत ! 'सन' पत्राच्या एका दिवसाचा (एक) अंक काढिल्याबद्दल वरील रणजितसिंग खेळाडूस आणखी एकदा ३०० गिनी (गिनी = १ पौंड + १ शिलिंग) रोख मिळाले ! त्या दिवशींचा बहुतेक सर्व मजकूर जुळून तयार होता व रणजितसिंग यांस त्याच दिवशीं सकाळीं आपलें काम आटपून परत एका खेळाला हजर रहातां आलें !

४. या व अशा हकीकती वाचून हिंदुस्थानच्या हवेंत अवतीर्ण झालें म्हणजे वाचकांस काय दृष्टीस पडतें ? हिंदुस्थानच्या विलक्षण स्थितीविषयीं व ती तशी विलक्षण असण्याच्या अनेक कारणांविषयीं आणखी केव्हां तरी सविस्तरपणें विवेचन करूं. विलायतेंतील ग्रंथकर्त्यांची किफायत पाहिली म्हणजे, हिंदुस्थानच्या पुरुषांना देखील विलायतच्या बायकांएवढेंही मिळत नाहीं, हें पाहून वाईट वाटणें सहाजिक आहे.

## १४ रंगनाथी पंचक.

( हें पंचक फारच मनोहर आहे. ज्ञान, द्रव्य, वक्तृत्व, सौख्य व कर्म हीं पांचही सर्वांना इष्ट असून त्यांपासून खरी फलप्राप्ति होत नसेल तरी तीं तुच्छ आहेत असें या पंचकांत सांगितलें आहे. ज्ञानाचें मुख्य फल आत्मज्ञान होणें व भूतमात्रीं सदयता उत्पन्न होणें हें होय. व हें जर उत्पन्न झालें नसेल तर मग १४ विद्या व ६४ कला यांत संपादन केलेलें प्रावीण्य व्यर्थ होय! कुबेराच्या बरोबरची संपत्ती असूनही तिचा यज्ञदानादि पुण्यकर्मांत व्यय होत नसेल तर ती तुच्छ होय! बृहस्पतितुल्य वक्तृत्व असून वक्तृत्वानें श्रोत्यांचें हृदय भेदण्याचें सामर्थ्य असेल, पण स्वतः वक्ता दुराचारी असेल व वृत्ति जिंकतां येत नसेल तर त्यांचें वक्तृत्व फोल आहे! क्षुद्रकाम भोगणारा मनुष्य निजसुखाची गोडी जाणत नसेल तर त्याचीं तीं सुखें तुच्छ होत! यज्ञयागादि पुण्यकर्में आचरतो, पण हरिपदप्राप्ति करून देणारें कर्म मात्र आचरींत नाहीं तर त्याचीं तीं कर्मेंही निष्फळ होत! )

१

सकलही वश झाल्या या कला आणि विद्या।
परम चतुर झाला शीकला गद्यपद्या॥
सदय हृदय नाहीं कोण मी हें कळेना।
तरि मग तितुकेंही ज्ञान तें कां जळेना॥ १॥

२

अपर धनद झाला पाहतां या भुलोकीं
धनकनकललामें तें न भोगी न शेखी।
द्विज विबुध न मित्रां दान यज्ञीं मिळेना॥
तरि मग तितुकेंही द्रव्य तें कां जळेना॥ २॥

३

द्वितिय सुरगुरू जो शब्दज्ञानार्थ बोधीं।
दृढ परउपदेशीं सर्वही ग्रंथ शोधी,॥
रत अविहितकर्मी चित्तवृत्ती गळेना।
तरि मग तितुकेंही बोलणें कां जळेना॥ ३॥

४

अगणित घडलीं हीं सांग विध्युक्त कर्में।

शत मख जरि झाले मोहिले ते सकामें ॥
परि हरिपदप्राप्तीलागिं जें आढळेना ।
तरि मग तितुकेंही कर्म तें कां जळेना ॥ ४ ॥
५
गृहसुत धन दारा देहद्वारां अमूपें ।
विषयपर सुखें जीं नश्वरें दुःखरूपें ।
निजसुख निजरंगें जोंवरी आकळेना ॥
तरि मग तितुकेंही सौख्य तें कां जळेना ॥ ५ ॥

---

## १५ दोन पदें.

( १ )

पंढरि नामाचा बाजार । पं० ॥ ध्रु० ॥
नामचि घेतां नामचि देतां । होतो कुलउद्धार ॥ पं० ॥ १ ॥
आषाढि कार्तिकि यात्रा भरते । होतो जयजयकार ॥ पं० ॥ २ ॥
ठाईं ठाईं संत मिळुनियां । गाती ब्रह्मचि सार ॥ पं० ॥ ३ ॥
गोपाळपूरीं काला होतो । लाह्यांचा भडिमार ॥ पं० ॥ ४ ॥
तुका म्हणे हो संतसज्जनीं । पांडुरंग सरदार ॥ पं० ॥ ५ ॥

( २ )

कधिं बा रिकामा होशी रे । कधिं संतांसी शरण जाशी ॥ धृ० ॥
कधिं नाम वाचे घेशी रे । कधिं बा सद्गुरु वंदिसी ॥ १ ॥
येतां जातां न कळे कांहीं । कां बुडतोसी प्रपंचडोहीं ॥ २ ॥
प्रपंच करितां जन्म गेला । माझें माझें म्हणतां मेला ॥ ३ ॥
गुरुसि भजावें भावें रे । रामदासीं रामचि व्हावें ॥ ४ ॥

---

## १६ सत्संगप्रताप.

महानुभावसंसर्गः कस्य नोन्नतिकारकः ।
रथ्याम्बुजान्हवीसंगात् त्रिदशैरपिवन्द्यते ॥

**अर्थ**—महापुरुषांचा संबंध कोणाची उन्नति करीत नाहीं ?—सर्व प्राणिमात्रांची करितो. बोळांतील घाणेरें पाणी गंगाजळाशीं मिळालें म्हणजे तें देवांना सुद्धां वंद्य होतें.

**शिष्य**—महाराज, आपल्या मुखांतूनच मीं हा श्लोक ऐकिलेला आहे कीं

अन्नदानात् परं दानं विद्यादानं ततोधिकम्
अन्नेन क्षणिका तृप्तिर्यावज्जीवं तु विद्यया ॥ १ ॥

तेव्हां आपले मजवर किती तरी उपकार झाले आहेत तें मला सांगतां येत नाहीं. पण मी एवढेंच सांगतों कीं, आपण माझे ' गुरु दत्तात्रय ' आहांत. असो. एक दुसरी शंका आहे.

**गुरु**—अरे विचार काय असेल ती. असा गुटमळतोस काय ? मला जर समाधान करतां आलें तर करीन. तुझेपासून मी कांहीं गौप्य ठेवणार नाहीं—तूं सत्पात्र शिष्य आहेस.

**शिष्य**—आपण वरील दृष्टांतांत सांगितलें कीं, दर एक वस्तूचे चांगला आणि वाईट असे दोन उपयोग असतात, व जसा त्या वस्तूचा उपयोग करावा त्याप्रमाणें त्याच्या उपयोजकास फळ प्राप्त होतें—तर महाराज, अनेक कविवर्यांनीं व संतमंडळींनीं ज्याची इतकी महती गायिली आहे अशा सत्संगास सुद्धां वरील नियम लागू पडतो कीं काय?

**गुरु**—यांत काय शंका ? सत्संगसेवन करणाऱ्या पुरुषामध्यें जर कांहीं महा अवगुण नसतील तरच सत्संगाचें फळ त्यास प्राप्त होईल. ते कोणते दोष म्हणशील तर ऐक. **कायिक**--शरीरापासून उत्पन्न होणारे--चोरी, व्यभिचार व हिंसा; **वाचिक**--वाणीमध्यें उत्पन्न होणारे--परनिंदा, असत्य भाषण व कठोर वचनें बोलणें; आणि **मानसिक**—म्हणजे मनापासून उत्पन्न होणारे--तृष्णा ( तुच्छ पदार्थाची आशा ) चिंता व दोषबुद्धि ( दुसऱ्यांत न्यून बघण्याची बुद्धि ). हे तीन प्रकारचे अवगुण जर टाकिले तरच सत्संगापासून उत्तम फळ प्राप्त होईल.

हें तुझ्या प्रश्नांचें उत्तर झालें. पण हा सत्संग म्हणजे जो सद्विद्या-प्राप्तीचें साधन आहे, त्याची थोरवी मी काय वर्णूं ? वर सांगितलेले तीन प्रकारचे दोषही हळू हळू सत्संगानें नाहींसे होतात. म्हणून दरेक मनुष्यानें सत्संग जोडावा. सत्संगानें महाखळ पुरुष सत्वगुणी होतात, अविद्येचा अस्त होतो, सद्विद्या फळास येते, सद्गुरुचरणारविंदें मानस-सरोवरांत विकास पावतात, पापपंक निघून जातो व स्वच्छ मानस-सरोवराच्या जलांत पडलेलें परमेश्वराचें प्रतिबिंब आपलें आहे असें मनांत बाणलें म्हणजे आपणच परब्रह्मरूप होतों. सत्संगाचा महिमा शेष, शंकर यांनाही वर्णविला नाहीं. मग माझ्यानें काय वर्णवेल ?

## १७ पूर्वजन्माच्या स्मृतींचें अद्भुत उदाहरण !!

संयुक्त प्रदेश, जिल्हा इटावा, तहशील विधूना यांत औतो नामक एका गांवांत पंडित मूलचंदजी दुवे यांना आषाढ शुक्ल १५ संवत् १९६० मध्यें एक कन्या झाली. ही मुलगी चारपांच वर्षांची झाली तेव्हां आपल्या पूर्वजन्मांतील आईबापांच्या गोष्टी आपल्या बालभाषेंत सांगत असे, पण त्यांकडे त्यावेळीं कोणीं लक्ष दिलें नाहीं. मुलगी ७ वर्षांची झाली तेव्हां तिचें बोबडेपण जाऊन ती स्पष्ट भाषेंत बोलूं लागली. तिनें स्पष्ट भाषेंत एक दिवस पुढील गोष्ट आपल्या आईबापांस सांगितली:—

" बरालोकपूर, तहशील व जिल्हा इटावा येथें इंद्रजीत व बंचनलाल नांवाचे माझे दोन पुत्र रहात आहेत ! मी त्यांची पूर्वजन्माची आई आहें. माझ्या घराच्या पुढें एक वटवृक्ष व विहीर आहे. माझा नातू प्लेगाच्या तडाख्यांत सांपडून मरण पावला व त्यामुळें मला अत्यंत शोक झाला. "

त्या मुलीच्या आईबापांनीं ही गोष्ट आपल्या इष्टमित्रांस सांगितली, तेव्हां सर्वजण विस्मित झाले व ही गोष्ट संभवनीय आहे असें म्हणाले. हिंदूंचा पुनर्जन्मावर पूर्ण भरंवसा असतोच. अस्तु. ही गोष्ट खरी कां खोटी याचा निर्णय करण्याचा निश्चय करून त्यांनीं पंडित इंद्रजित यांस आपल्या गांवीं बोलावून आणलें. त्याला पाहतांच त्या मुलीनें त्याला ओळखलें व नांवानें हाक मारिली ! इंद्रजित चकित झाले व ' ही मुलगी कोणाची कोण आहे हें मला ठाऊक नाहीं व मी तिला ओळखलें नाहीं' असें म्हणाले. त्यावर ती मुलगी म्हणाली—" बेटा ! बरालोकपूर येथें प्लेगची साथ उद्भवली होती तेव्हां त्या रोगानें झपाटला जाऊन तुझा मुलगा मेला. त्यानंतर मला-हि प्लेग झाला व त्यांत माझा अंत झाला आणि मग तूं माझें मृत शरीर अइनेया नदींत सोडून दिलेंस. कांहीं दिवसांनंतर मूलचंदजी दुबे त्या नदीतीरावर आले व त्यांच्या घोड्याच्या शेपटीवर बसून

मी औतोगांवीं आलें व त्याच्या उदरीं जन्म घेऊन मी मुलगी झालें आहें!" हें ऐकून पंडित इंद्रिजीत म्हणाले कीं, "ही निःसंशय माझी माता आहे. ही आपल्या वयाच्या ६० व्या वर्षी वारली. त्या गोष्टीस आज सहा वर्षें होऊन गेलीं. ती प्लेगानें मेली व तिचें मृत शरीर अइनेया नदींत टाकून दिलें. बरालोकपूर ह्या नदीच्या किनाऱ्यावर आहे. तेथून औतो २८ मैलांच्या अंतरावर आहे." ह्यानंतर त्या मुलीनें आपल्या पूर्वजन्माच्या पुत्रास पुरलेलें धन सांपडून दिलें. तिनें सांगितलेल्या ठिकाणीं इंद्राजितानें खोदलें तों तिनें सांगितलें तितकेंच धन सांपडलें.

ह्या कन्येचा विवाह पंडित शिवनारायणाचे पुत्र बाबू रामस्वरूप यांच्याशीं ज्येष्ठ शुद्ध ११ संवत् १९६८ मध्यें झाला. पंडित शिवनारायण हे इटावाच्या शाळाखात्यांत शिक्षकाचें काम करीत आहेत. त्यांनीं स्वतः ही गोष्ट प्रगट केली आहे.

---

## १८ शिबिराजाचा स्तंभ.

आमच्या हिंदु पौराणिक कथा म्हणजे कवींचे बुद्धिविलास किंवा कल्पनाकौतुकें होत, त्यांत ऐतिहासिकत्व लेशमात्र नाहीं असें म्हणणारे विद्वान् पुरुष पाश्चात्यांतच नव्हेत तर आम्हां हिंदी लोकांतही आहेत. पण या पौराणिककथांचें यथार्थत्व स्पष्टपणें दर्शविणारे भक्कम पुरावे दिवसेंदिवस उपलब्ध होऊं लागले आहेत, ही भाग्याची गोष्ट म्हटली पाहिजे. ज्यांनीं महाभारत वाचलें असेल त्यांना शिबिराजाची कथा ठाऊक आहेच. या राजानें आपणास शरण आलेल्या कपोतपक्ष्याच्या जीवाच्या रक्षणार्थ त्याच्या भारंभार आपल्या स्वतःच्या शरिराचें मांस कापून दिलें होतें. शरणागताच्या रक्षणार्थ आत्मत्याग केल्याचें इतकें सोज्वळ उदाहरण कोणत्याही इतिहासांत सांपडणें दुष्कर आहे. अशा राजाचा स्मृतिस्तंभ प्रसिद्ध बौद्धधर्मी राजा अशोक यानें उभारला होता. या स्तंभाचा शोध आतां लागला आहे. तो नीट धुऊन पुसून

ब्रिटिश म्युझियम नांवाच्या सुप्रसिद्ध पदार्थसंग्रहालयास भूषित करण्यासाठीं विलायतेस पाठविण्यांत आला आहे असें कळतें ! ज्यांना शिबिराजा कोण याची कांहींच माहिती नाहीं अशा विलायतच्या लोकांना या स्तंभाच्या दर्शनापासून कौतुकापलीकडे काय मोठेसें वाटणार आहे? पण तोच स्तंभ इकडे नीट जतन करून ठेविला असता तर त्या पुण्यश्लोक राजाच्या कीर्तीच्या परिमळानें दुमदुमलेल्या या देशांतल्या असंख्य हिंदुलोकांच्या मनांत या स्तंभाच्या दर्शनानें केवढी सात्विकता, धर्मश्रद्धा आणि भक्तिभाव हीं जागृत झालीं असतीं !

---

## १९ टिटॅनिकबोट.

'टिटॅनिक' नांवाची एक नवीनच बांधलेली फार मोठी आगबोट साउथॅम्टनहून न्युयॉर्ककडे जात असतां, न्यु फाउंलन्डच्या दक्षिणेस एका बर्फाच्या पर्वतप्राय राशीवर ता. १४ एप्रील १९१२ रोजीं आदळून बुडाली. आगबोट नुकतीच बांधलेली होती आणि उतारूंच्या सुखसोयी व वेग या बाबतींत ही आगबोट पहिल्या प्रतीची होती. म्हणून पुष्कळसे धनाढ्य व सुखवस्तु लोक या बोटीनें अमेरिकेस जाण्यास निघाले होते. या आगबोटींत ३५०० उतारूंचा समावेश होण्याइतकी जागा होती. 'टिटॅनिक'ची ही पहिलीच सफर होय. या सफरीच्या वेळीं त्या आगबोटींत उतारू, खलाशी व आगबोटीवरील इतर नोकर मिळून एकंदर २३४० लोक होते परंतु त्या आगबोटीवर ज्या प्राणसंरक्षक बोटी होत्या, त्यांत फक्त ९५० माणसांचाच समावेश होण्यासारखा होता. या बोटीवरील २३४० लोकांपैकीं सुमारें ७५० लोक मात्र वांचले असून ते 'कार्पाथिया' आगबोटींतून न्यूयॉर्क येथें येऊन पोंचले. बाकीच्या लोकांस 'टिटॅनिक' आगबोटीबरोबरच जलसमाधि मिळाली असावी असें दिसते टिटॅनिक आगबोट बांधण्याला ११७५००० पौन्ड खर्च आला होता व त्या आगबोटीचा विमा १०००००० पौन्डांला

उतरलेला होता. टिटॅनिक आगबोटीवर ५० टन रबर होता व जवाहीर सुमारें १०००००० पौंडांचें होतें. उतारूंपाशीं जवाहीर व सामान असेल तें निराळेंच. टिटॅनिक आगबोट बुडाल्या-मुळें केवढें मोठें नुकसान झालें याची वर दिलेल्या माहितीवरून कल्पना येईल. परंतु सांपत्तिक हानीपेक्षां या अनर्थांत झालेली प्राण-हानि फार भयंकर आहे. बोटीवरील उतारू बहुतेक इंग्रज व अमे-रिकन असल्यामुळें इंग्लंडांत व अमेरिकेंत हाहा:कार उडून गेला होता आणि या अनर्थामुळें निराश्रित झालेल्या लोकांस मदत करण्यासाठीं इंग्लंडांत फंड काढण्यांत आला होता. 'रिव्ह्यू ऑफ रिव्ह्यूज' या जगप्रसिद्ध मासिकाचे संपादक व हिंदुस्थानच्या हितासंबंधानें पुष्कळ कळकळ वाळगणारे उदारधी मि. डब्ल्यु. टी. स्टेड हे 'टिटॅनिक' आगबोटीवरील उतारूंत होते.

---